# हिंदी-सुमेरी संस्कृति.



( भारतीय व सुमेरी संस्कृतींचें व त्यांच्या आद्य कालस्थलांचें विवेचन करणारा स्वतंत्र संशोधनात्मक ग्रंथ. )

लेखकः—

दाजी नागेश आपटे,

बी. ए. एल्एल्. बी. बडोदें.

( सुधारणा आणि प्रगति, तत्त्वज्ञानांतील कूटप्रश्न, मिराबाई, पार्लमेंट या पुस्तकांचे कर्ते. )

सन १९२८

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

भारतीय आर्य संस्कृतीचें आद्यस्थान व तिचा कालनिर्णय या विषयावर बऱ्याच वर्षांपासून वाचन व विचार करीत असतां सन १९२५ सालीं सिंधमधील माहेंजोदारो या गांवीं व पंजाबमधील हराप्पा या गांवीं केल्या गेलेल्या उत्खननानें या प्रश्नाला माझ्या मनांत एका नवीन दिशेनें चालना मिळाली लो. टिळकांनीं आपल्या 'सुमेरी व हिंदी वेद' या लेखांत अथर्व वेदांतील कांहीं असंस्कृतव्युत्पन्न शब्दांची यादी देऊन सुमेरी कालांत सुमेर व हिंद या देशांत विचार विनिमय चालू असला पाहिजे असें अनुमान साधार रीतीनें प्रतिपादिलें होते. त्यानंतर उपरिनिर्दिष्ट सिंध व पंजाब येथें भूगर्भांतून निघालेल्या पदार्थसंग्रहाचें वर्णन सर जॉन मार्शल यांनीं प्रसिद्ध केलें, त्यांत सुमेरी व सिंधी-पंजाबी लोकांतील कित्येक आचारविषयक, कलाविषयक, वास्तुविषयक वगैरे साम्ये वर्णिलेलीं वाचनात आली. त्यामुळें या प्रश्नाच्या मूळाशीं जाऊन त्याचा छेडा लावण्याची इच्छा झाली. सुदैवानें ख्रि. पू. साडेचार पांच हजार वर्षांपूर्वींच्या सुमेरी कीलाकृति लिखाणांचें व तदनंतरच्या बॅबिलोनी लिखाणांचें समग्र इंग्रजी भाषांतर हल्लीं उपलब्ध असल्यानें त्या संस्कृतींचें अध्ययन करण्यास सुगमता आली, त्यामुळें शक्य तितक्या कसोशीने व साकल्यानें असें अध्ययन करतां सुमेर व हिंद या दोनहि संस्कृतींमध्यें उभय सहोदरांप्रमाणें संपूर्ण साम्य असल्याचें प्रतीत झालें.या उभय संस्कृतींतील साम्यांचें विस्तृत परीक्षण आजपर्यंत कोठेंहि झालेलें नाहीं. वर वर दिसणारीं व कित्येक प्रसंगीं तर नुसती भासणारीं पण सूक्ष्म विवेचनांतीं असत्य ठरणारीं अशीं साम्यें कांहीं यूरोपिय ग्रंथकारांनीं दर्शविलीं होतीं. परंतु शास्त्रीय चिकित्सेची कसोटी लावून त्यांचें परीक्षण मूळ ग्रंथावरून कोणीहि केलेलें नव्हतें. तें या पुस्तकांत प्रथमतःच केलेलें आढळेल.

या परीक्षणाच्या अंतीं वैदिक व सुमेरी या उभय संस्कृती आर्यवंशीय असून त्या उपर्युक्त देशांत येण्यापूर्वीं उत्तर ध्रुव संनिध प्रदेशीं एकरूप होत्या व त्या ठिकाणीं या उभयतांच्या मातृस्थानीं असलेल्या या मूळ आर्यसंस्कृतीचा आद्यकाळ ख्रि. पू. आठ हजार वर्षें हा होता, त्यानंतर तेथे झालेल्या महाप्रलयामुळें तत्रस्थ आर्यांनीं दक्षिणमार्गानें स्थलांतर केलें, तसें करतां करतां त्यांतील एक शाखा सुमेरमध्यें, व दुसरी इराण व हिंदुस्थान यांत आली असावी, या प्रवेशाचा काल सुमारें ख्रि. पू. पांच हजार वर्षें हा होता, व त्या कालाच्या आगेमागें हिंदी व सुमेरी वेदांचा प्राचीन भाग 'दृष्ट' अथवा 'कृत' झाला, असा निष्कर्ष एकंदरीनें निघतो असें या विस्तृत निबंधांत दाखविलें आहे.

वस्तुतः केवळ भारतीय वेदांच्याच अभ्यासानें हा सिद्धांत कै० लो. टिळकांनीं

आपल्या ' ओरायन व आर्टिक होम इन् दि वेदाज् ' या ग्रंथात आपल्या प्रतिभेनें काढलाच होता. परंतु भूगर्भशास्त्र व ज्योतिषशास्त्र या दोन शास्त्रांवरच मुख्यत्वें त्या सिद्धान्त निष्कर्षाच्या कामीं भार दिल्यानें प्राचीन ऐतिहासिक निर्देशाच्या अभावीं त्याचें ग्रहण करण्यास पाश्चात्य लोक उत्सुक नसत. पण सुमेरी संस्कृतीचा कालनिर्णय भक्कम ऐतिहासिक उल्लेखांवर अवलंबून असल्यानें तो पाश्चात्यांना मान्य झालेला आहे. तेव्हां अशा सिद्ध वस्तूंशीं वैदिक संस्कृतीचें अभिन्नत्व शाबित केल्यानें वैदिक संस्कृतीलाहि तें सिद्धत्व अर्थातच प्राप्त झालें पाहिजे. यासाठीं हिंदी व सुमेरी संस्कृतींचें सर्वांग परीक्षण करून त्या वस्तुतः मूळांत अगदीं एकरुप होत्या असें या निबंधांत दाखविलें आहे.

या निबंधाचा खरा आरंभ म्हणजे १९२८ च्या ' चित्रमय जगत् ' च्या खास जानेवारी अंकासाठीं लिहिलेला सारांशरूप एक लेख होय. पण मग तेवढ्यावरच तें विवेचन न टाकतां संपूर्ण निबंध रूपानें पुरें करण्यास ' चित्रमय जगत् ' च्या संपादकांनीं मला सुचविल्यानें व त्या मासिकाच्या चालकांनीं तें प्रसिद्ध करण्याचें आश्वासन दिल्यानें सहा लेखांत तो निबंध संपूर्ण केला. तोच आतां पुस्तकरूपानें त्यांच्याच कृपेनें प्रसिद्ध होत आहे. याबद्दल ' चित्रमय जगत् ' च्या चालकांचा व संपादकांचा मी फार आभारी आहें.

हा निबंध अनुवादात्मक अथवा संकलनात्मकहि नसून संशोधनात्मक असल्यानें यावर मतभेद उत्पन्न होणें मुळींच अस्वाभाविक नाहीं. तथापि शक्य तितकी शास्त्रीय चिकित्सा मार्मिक विवेचन व तार्किक अनुमान यांत मीं स्वीकारलीं आहेत. तेव्हां मला अशी आशा आहे कीं यांतील निष्कर्षांच्या ग्राह्यतेला प्रत्यवाय येऊं नये.

इतकी प्रस्तावना करून हा प्रयत्न मी विद्वज्जनांच्या हवालीं करितों.

बडोदें. आषाढ वद्य ११
शके १८५० } दाजी नागेश आपटे.

# हिंदी-सुमेरी-संस्कृति.



हुरत्ना ' वसुंधरा ' अशी जी संस्कृतमध्यें म्हण आहे, ती अनेक अर्थांनीं खरी आहे. पृथ्वीच्या अगाध उदरांतून केवळ स्थूल रत्नेंच निघतात असें नव्हे; तर हजारों वर्षेपर्यंत लुप्त झालेल्या वस्तूंच्या ज्ञानाची रत्नेंहि त्या वसुंधरेतून निघतात. पांचभौतिक सृष्टीच्या वस्तूंपासून गुणपरिणामानें मानवी बुद्धि अनेक प्रकारचे नवीन नवीन शोध लावून सृष्टीच्या सुखांत वा दुःखांत भर टाकते. त्याचप्रमाणें भूतकालांतील ज्ञानाचे तुटलेले दुवे सांधूनहि ती ज्ञानसंग्रहांत भर टाकते. गेल्या पन्नास साठ वर्षांत पृथ्वीच्या उदरांतून अशा प्रकारें अत्यंत महत्त्वाची माहिती उद्धृत केली गेली आहे व त्यामुळें हजारों वर्षांपूर्वींपासूनच्या इतिहासाच्या ज्ञानाचें स्वरूप समूळ बदलून गेलें आहे. विशेषतः हिंदुस्थानाच्या पूर्व इतिहासांत तर क्रांतीच घडून आली आहे. त्या एकंदर प्रकारांचें त्रोटक वर्णन देऊन त्यांतील प्रमेयांची मांडणी सुसंगत रीतीनें करून दाखविण्याचें येथें योजिलें आहे.

सुमारें पन्नास साठ वर्षांपूर्वी हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाबद्दल पाश्चात्यांची (आपल्या लोकांनी त्यावेळीं प्राचीन इतिहासाच्या संशोधनास सुरवातच केली नव्हती) कल्पना थोडक्यांत अशी होतीः—हिंदुस्थानांतील सर्वांत प्राचीन वाङ्मयरुप जे वेद ते सुमारे ख्रिस्तपूर्व हजार बाराशे वर्षांचे होत, ते रचणारे लोक हे आर्यवंशाच्या एका शाखेंतील असून ते वर दर्शविलेल्या काळाचे सुमारास कॉकेशस पर्वतावर सर्व आर्यवंशांचें मूलस्थान होतें, तेथून हिंदुस्थानांत आले. तत्पूर्वी हिंदुस्थानांत अगदी रानटी ( aborigines ) लोकांची फक्त वस्ति होती, त्यांना आर्यांनी जिंकलें. त्यांनाच आर्य लोक दस्यु म्हणत. त्यांच्यांत पुष्कळ नरमांसभक्षक जाती होत्या. ते राक्षस होत. या कालाच्या पूर्वी हिंदुस्थानांत संस्कृतीचें मुळींच नांवहि नव्हतें, युरोपांतील सर्व लोक या कॉकेशसपर्वतावरील आर्यवंशांतलेच असून ते त्याच सुमारास युरोपांत शिरले. त्यांची पहिली संस्कृति ग्रीक संस्कृति होय, व तिच्या पूर्वीची सर्वांतील प्राचीन संस्कृति इजिप्त अथवा मिसर देशांतील होय. याप्रमाणें त्यावेळच्या प्राचीनकालविषयक ज्ञानाची मर्यादा होती.

मेसापोटेमिया म्हणतात, त्या देशांत प्रवास करण्यासाठीं म्हणून युरोपांतील जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड वगैरे देशांतील कांहीं गृहस्थ गेले असतां, त्यांना भूगर्भातून अपूर्व शोध लागले. रिख् हा जर्मन, बोत्ता हा फ्रेंच व लायर्ड हा इंग्रज, हे त्या शोधकांतील अग्रणी होत. गेल्या शतकाच्या सातव्या दशकांत रिख् हा जर्मन गृहस्थ त्या देशांत गेला असतां, त्याला एका मोठ्या मातीच्या ढिगाऱ्याखालीं खणतां खणतां कांहीं इमारतींचे अवशेष सांपडले. त्यावरून त्यानें अधिक उत्खनन केलें असतां, त्याला एक शहरासारखा कांहीं भाग आढळला. त्यानंतर बोत्ता या फ्रेंच गृहस्थानें तेंच संशोधनकार्य पुढें चालविलें. या कार्यांत त्याला फ्रेंच सरकारनें पुष्कळ मदत केली. अखेर लायर्ड या इंग्रजी गृहस्थानें तेंच काम पूर्णतेला नेऊन त्यानें मेसापोटेमियांत अनेक ठिकाणीं उत्खनन करून त्यांतून एका मोठ्या साम्राज्याची माहिती उद्धृत केली. तो प्रकार असा.

सांप्रतच्या तुर्कस्थानच्या आग्नेयीस व इराणच्या पश्चिमेस इराणी आखातांत खालचें टोंक उकरलेला असा जो चिंचोळा प्रांत, त्यालाच हल्लींचें नांव मेसापोटेमिया असें आहे. हा प्रदेश म्हणजे युफ्रेटिस व टायग्रीस या दोन नद्यांमधील अंतर्वेदीचा अथवा दुआबचा प्रदेश होय. याच्या उत्तरेस व पूर्वेस डोंगर असून पश्चिमेस सीरिआचा वालुकामय ओसाड प्रदेश आहे. वर सांगितलेल्या दोन नद्या आग्नेयवाहिनी आहेत, व साधारणतः समांतर आहेत. मध्यें फक्त हल्लींच्या बगदाद शहरानजीक त्या जवळ जवळ आल्यानें तो प्रदेश एखाद्या बाटलीच्या मानेप्रमाणें आवळला गेल्यासारखा झाला आहे, व त्यामुळें त्याचे साधारणतः दोन भाग पडल्यासारखे झाले आहेत. येथील जमीन भुसभुशीत व बारिक रेती व माती असलेली—साधारणतः उत्तर गुजराथप्रमाणें आहे, व तिला वरील दोन मोठ्या नद्यांच्या अखंड पाण्याचा लाभ मिळाल्यानें ती अत्यंत सुपीक आहे. येथील माती चिकण असल्यानें ती विटा करण्याला फारच उत्तम असते. असा हा उत्तरेस टॉरस पर्वतापासून तों दक्षिणेस इराणच्या आखातापर्यंतचा प्रदेश जगांतील एका अत्यंत प्राचीन संस्कृतीची जन्मभूमि म्हणून आतां प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील दोन्ही नद्यांच्या प्रवाहाच्या जोरामुळें तेथील माती पुष्कळ वेळां जोरानें वाहून जाते व प्रवाहाचा वेग मंद होईल, तेथें तिचे ढीग बनून जातात. असे अनेक ढीग ठिकठिकाणीं त्या देशांत आढळतात, व अशांपैकींच कांहीं ढीग खणून काढीत असतां वर सांगितल्याप्रमाणें संशोधकांना त्याखालीं हजारों वर्षें गडप झालेल्या अवशेषांचा तपास लागला.

वर सांगितल्याप्रमाणें या प्रदेशांत भूगर्भसंशोधकांनीं खणून अनेक शहरांचे अवशेष काढले, पण त्यांची माहिती कशी समजावी हा प्रश्न त्यांच्यापुढें आला असतां, त्यांना असें आढळलें कीं, भूगर्भांत सांपडलेल्या या सर्व शहरांतील घरांच्या बांधकामास एका विशेष प्रकारच्या विटा लावलेल्या होत्या. या विटा ओल्या असतांना त्यांच्यावर खिळ्यासारख्या अणकुचीदार पदार्थांनीं अक्षरें कोरून अपार ज्ञानभांडार सांटवून ठेविलें होतें. पुढें या विटा उन्हानें भाजून मग त्या भिंतींना लाव-

लेल्या होत्या. त्यांवर लिपीला Cuniform inscriptions अथवा कीललिपि असें नांव संशोधकांनीं दिलें. या कीललिपीची कोरलेली एकेक वीट म्हणजे एक पोथी अथवा ग्रंथच होय. अशा लक्षावधि विटा या शहरांच्या अवशेषांतून सांपडल्या. त्यांचा कित्येक वर्षे अभ्यास करून संशोधकांनीं ती लिपी उकलली व त्या लिपीच्या द्वारेंच जगांतील ज्ञानांत एका फार मोठ्या शोधाची भर पडली. त्या लिपीचा नमुना खालीं दिल्याप्रमाणें आहे. या लिपींतील अत्यंत प्राचीन लेख एक प्रकारच्या चित्रांनीं लिहिले गेले होते, म्हणून त्या लिपीला चित्रलिपि म्हणतात. व नंतरचे लेख एक प्रकारच्या अक्षरलिपीनें लिहिले गेले होते.

यात्रमाणें केलेल्या संशोधनावरून असें निष्पन्न झालें कीं, युफ्रेटिस व टायग्रीस या दोन नद्यांच्या दुआबांत अत्यंत प्राचीन काळीं एक महाप्रबळ अशी संस्कृति असलेली राष्ट्रें विद्यमान होतीं. त्यांतील सर्वांत प्राचीन राष्ट्रास सर्वसामान्यत्वानें सुमेरिया असें नांव देण्यांत येतें. ज्या मानववंशांतील लोकांचें हें राष्ट्र होतें, त्यांचें नांव सुमेरिअन् असें होतें व त्यामुळें त्यांच्या संस्कृतीला सुमेरिअन् अथवा सुमेरी संस्कृति असें नांव रूढ झालें आहे.

त्या प्रदेशाची कल्पना येण्यासाठीं त्याचा नकाशा पुढें दिला आहे:—

या सुमेरिया देशाची राजधानी निप्पुर हें शहर होती. या सुमेरिअन् राष्ट्राचा काल अत्यंत प्राचीन असून तो ख्रिस्तपूर्व सुमारें सात आठ हजार वर्षांपूर्वीपर्यंत पोहोंचतो. ज्या ख्रिस्ती लोकांच्या बायबल या आद्य धर्मग्रंथांत सृष्टीच्या उत्पत्तीचा कालच ख्रिस्तपूर्व ४००४ वर्षे असा दिला आहे, त्यांना या नवीन ज्ञानाची कडू गोळी गिळण्यास किती कठीण गेली असेल, याची कल्पनाच करावी. तथापि नाइलाजानें अखेर त्यांना ती सेवावी लागली. पुढें कांहीं कालानें याच प्रदेशाला खाल्डिया हें नांव प्राप्त झालें व तेथील लोकांचें मानवजातिदर्शक सुमेरिअन् हें नांव मात्र कायम ठेवण्यांत आलें. या सुमेरिअन् अथवा खाल्डियन् लोकांचें या प्रदेशावर अविछिन्न साम्राज्य ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांपर्यंत चाललें होतें. या कालांतील या लोकांचा अत्यंत प्रसिद्ध राजा पहिला सार्गन हा होय. याचा काल ख्रिस्तपूर्व ३८०० वर्षें हा होय. त्यानंतर इराणच्या दक्षिण भागांत रहाणाऱ्या एका जातीच्या लोकांनीं या प्रदेशावर स्वारी करून, आपली राजधानी या दुआबाच्या उत्तर भागास स्थापली व तिला अक्कड असें नांव दिलें; यावरून या लोकांना अक्काडिअन् अथवा अक्कडी असें म्हणतात. या लोकांनीं प्रथमतःच अक्षरलिपीचा प्रचार केला व हीच लिपि सुमेरी लोकांच्या चित्रलिपीच्या ऐवजीं पुढें पुढें विटांवर कोरली जाऊं लागली. यात्रमाणें उत्तरेस अक्कडी लोक व दक्षिणेस सुमेरी लोक, याप्रमाणें हें द्वैतराष्ट्र जवळ जवळ तीनशें वर्षेपर्यंत चाललें. अक्कडी लोकांची संस्कृति मूळच्या सुमेरी संस्कृतीशीं मिसळली जाऊन त्या दोहोंचा परस्परांवर पुष्कळ परिणाम झाला व या मिश्र संस्कृतीसच खाल्डियन संस्कृति म्हणतात.

यानंतर अमोराइट् नांवाच्या एका सेमेटिक मानववंशांतील लोकांनीं या एकंदर प्रदेशावर मोठी स्वारी करुन तो जिंकला व आपली राजधानी बॅबिलोन गांवाच्या शहरीं स्थपली. हें बॅबिलोन शहर अक्कड शहराच्या नैऋत्येस व निप्पूरच्या वायव्येस पश्चिम किनाऱ्याजवळ आहे, हें वरील नकाशावरून दिसून येईल.




या बॅबीलोनी लोकांचा पहिला सार्वभौम राजा हम्मुरब्बी अथवा खम्मुरब्बी या नांवानें प्रसिद्ध असून, त्याचा काल खिस्तपूर्व २१०० वर्षांचा निश्चित केला गेला आहे या हम्मुरब्बीनें आपल्या इकडील स्मृतिग्रंथाप्रमाणें त्या काळीं सर्व कायद्यांच्या एकीकरणात्मक असा एक संग्रहग्रंथ केला आहे. त्याला 'हम्मुरब्बीचें कोड' ( Hammurabi's code ) असें म्हणतात. याच सुमारास याच सेमिटिक वंशा-

पैकीं एका शाखेनें इजिप्त देशावर स्वारी करून तेथे आपलें राज्य स्थापून हिक्सॉस् नांवाचा राजवंश सुरू केला. हे लोक व मूळचे बॅबिलोनी लोक यांचें एक संयुक्त राष्ट्र बनून तें बॅबिलोनिअन् साम्राज्य म्हणून प्रसिद्ध झालें व त्यानें जवळ जवळ दीड हजार वर्षेपर्यंत राज्य केलें. हेंच बॅबिलोनियन् राष्ट्राचें सुवर्णयुग होय त्यानंतर ख्रिस्तपूर्व अकराव्या शतकांत या साम्राज्यावर असीरियन अथवा असुरी लोकांनीं स्वारी करून बॅबिलोनी राज्याचा विध्वंस केला. असुरी साम्राज्याची राजधानी निनेव्हे शहर ही होती. हें शहर फार उत्तरेला असून हल्लींच्या अरबेलाच्या उत्तरेस आहे. यांच्यांतील प्रसिद्ध राजा तिग्लाथ पिलेस्सर हा होय. असुरी लोकांचें साम्राज्य सुमारें दीडशें दोनशें वर्षेंच चाललें व त्यानंतर त्यांना मीडस् व पर्शियन या लोकांनीं जिंकलें व त्यांच्यावर आपलें राज्य स्थापन केलें. तें राज्य ख्रिस्तपूर्व तीनशेंपर्यंत म्हणजे तीनशें वर्षें चालल्यावर मग शिकंदर बादशहानें तें जिंकलें. शिकंदर बादशहानंतरचा इतिहास जरी प्राचीन असला, तरी अति प्राचीन इतिहासापासून तो दुब्वा निराळा पडूं शकतो; म्हणून त्यानंतरच्या इतिहासाचा उल्लेख करण्याचें येथें आपल्याला फारसें प्रयोजन नाहीं. येणेंप्रमाणें अतिप्राचीन काळापासूनचा मेसापोटेमिया देशाच्या इतिहासाचा देखावा कल्पनेच्या चलचित्रपटावर दिसून येतो.

वरील सर्व इतिहास युरोपीय संशोधकांना पूर्वी सांगितल्याप्रमाणें विटांवरील कीललिपीवरूनच प्राप्त झाला त्यावरून असें दिसून येतें कीं, या प्रदेशांतील अत्यंत प्राचीन सुमेरी लोकांच्या चित्रलिपीपेक्षां अक्कडी लोकांची अक्षरलिपि स्वाभाविकच अधिकार्थवाहक होती. धातुकामाची कलाहि त्यांनींच प्रथम आपल्याबरोबर आणली. कालवे खणून पाण्याची सोय व निकाल करण्याची सुधारणाहि त्यांनीं सुरू केली, त्यांच्या भाषेंत अक्कड या शब्दाचा अर्थ पर्वत अथवा डोंगर असा असल्यानें हे लोक मूळ डोंगरी वस्तींतील होते हें उघड दिसतें. हल्लीं ज्याला सुसानियन् अथवा शूशान पर्वत म्हणतात, तेथें त्यांची मूळ वस्ती होती; त्यांनीं ईश्वरस्तुतिविषयक अनेक स्तोत्रें व प्रार्थना रचिल्या होत्या व त्या सर्व एकसारख्या अनुक्रमानें व अनुबंधानें निनेव्हे येथील दोनशें विटांच्या लेखसंग्रहावरून उपलब्ध झाल्या आहेत, व त्यांचा अर्थ हेन्री रॉलिन्सन् व जॉर्ज स्मिथ या पंडितांनीं लावल्यामुळें आतां तो संग्रह सर्वांना समजण्याला सुलभ झाला आहे. त्या संग्रहांतील एका प्रकरणांत प्रार्थना व सूक्तें यांचा समुच्चय केला आहे, दुसऱ्यांत भूतपिशाच्चांविषयींचें विवरण आहे, तिसऱ्यांत रोगांची व औषधांची चिकित्सा आहे. अशा रीतीनें आपल्या इकडील सर्व वेदाप्रमाणें साधारणतः त्या संग्रहाचें स्वरूप आहे. या संग्रहावरून फ्रेंकचा लेनोर मॉ या फ्रेंच पंडितानें एक तद्विषयक सुसंगत ग्रंथ लिहिला आहे.

सुमारें एक हजार वर्षांच्या सहवासानें सुमेरी व अक्कडी लोकांचें अभिन्न मिश्रण बनून गेलें व नंतर त्यांच्यावर हम्मुरबीनें स्वारी करून तें राज्य जिंकल्यावर त्यानें बॅबिलोन अथवा प्राचीन भाषेंत बॅबल नांवाच्या शहरीं आपली राजधानी स्थापल्या-

वर मूळच्या सुमेर व अक्कड या दोन्ही प्रदेशांच्या मिळून बनलेल्या संयुक्त राष्ट्रास बॅबिलोनिया असें नांव दिलें, म्हणून त्या कालच्या संस्कृतीस, सुमेरी खाल्डियन् व बॅबिलोनेयन अशा त्रिविध नांवांनीं उल्लेखिलें जातें.

या संस्कृतीच्या कांहीं विशेषांचें आपण आतां थोडेसें अवलोकन करूं. प्रथमतः तेथील देवत्त्वविषयक कल्पना काय होती तें पाहूं. हें वर्णन L. W. king नांवाच्या लेखकाच्या 'Babylonian religion aud mythology Vol. IV' या ग्रंथाच्या आधारें केलें आहे. विस्तारभयास्तव व मराठी वाचकांना इंग्रजी मूळ उतारे दुर्बोध होऊं नयेत म्हणून ते दिले नाहींत. तथापि त्यांचें भाषांतर शक्य तितकें मूळाला धरून केलें आहे, इतकें वाचकांना आश्वासन देतों.

'या लोकांच्या देवांविषयीं विचार करतां असें दिसून येईल कीं त्यांचे सर्व देव विशिष्टगुणात्मक व प्रकृतिदर्शक असून ते सर्व मानवदेहधारी आहेत. मात्र ते दृष्टिगोचर नसत; तथापि ते स्वप्नांत दर्शन देत. केवळ देहदृष्ट्याच नव्हे तर स्वभावानेंहि ते माणसासारखे असत. ते जगांत येऊन व्यवहार करीत, मानवांशीं संबंध ठेवीत, व युद्धें व प्रेम करीत. जरी मानवांच्या मानानें त्यांचें सामर्थ्य अर्थातच अमर्याद असे, व त्यांच्या जवळ अपूर्व व गूढ शक्ति असे, तरी त्यांच्या विषयींची एकंदर कल्पना मनुष्याप्रमाणेंच असे. पुष्कळ वेळां सृष्टीतील निरनिराळ्या निसर्गशक्तींचींच तीं प्रतीकें असत. नित्य उगवणारे सूर्य व चंद्र, वाहाणारा वायु, पडणारा पाऊस या सर्वांचे अधिष्ठाते देव त्यांच्यांत असत, व निसर्गशक्तीच्या ठिकाणीं असलेली ही त्यांची देवत्त्व कल्पना लाक्षणिक नसून सत्यस्वरूप होती.'

" प्रथमतः एकंदर विश्वाचे त्यांनीं तीन मुख्य भाग कल्पिले आहेत; ते म्हणजे स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे लोक होत. स्वर्गांतील राजा अनु होय, पृथ्वीवरील बेल होय व पाताळांतील इआ होय या पहिल्या श्रेणींतील त्रिमूर्तीनंतर दुसऱ्या श्रेणीत सिन् अथवा चंद्र व शम्श्, अथवा सूर्य हे प्रमुख होत. प्रथम प्रथम सिन्चें महत्त्व अधिक असून पुढें शम्श्ला प्राधान्य मिळालें. शम्श् हा स्वर्ग व पृथ्वी यांचा राजा समजला जाऊं लागला. तो सर्व लोकांचें पापपुण्य अवलोकन करीत असतो. ( सत्यानृतेऽव पश्यन् जनानाम्. ) या दोघांच्याच बरोबरीनें पाऊस व मेघ यांचा अधिष्ठाता रम्मान् हा होय. याला विशेषतः बलदाता समजत असत व लढाईंत प्रबल योद्ध्यांच्या हल्ल्याला रम्मान्च्या हल्ल्याची उपमा देत असत. यानंतर थोड्याच कालांत या रम्मान्चें मर्डुक या देवतेंत एकीकरण झालें व रम्मान्चें महत्त्व कमी होऊन तें मर्डुकला मिळालें. त्या दृष्टीनें रम्मान् व मर्डुक यांची वरुण व इंद्र या वैदिक देवतांशीं तुलना करण्यासारखी आहे. हें मर्डुकला मिळालेलें महत्त्व फार कालपर्यंत अबाधित राहिलें. याला असामान्य बल असून तो फार युद्धप्रिय होता, अशी कल्पना असे. याचा परम मित्र नबू हा नेहमीं त्याच्या बरोबर साहचर्यानें उल्लेखिला जातो या मर्डुकचा सर्वांत मोठा पराक्रम म्हणजे त्यानें केलेला तैमातचा वध हा होय. तैमा-

तला कोठें कोठें साप म्हटलें असून त्याला सात शिरें असल्याचा उल्लेख आहे. या तैमातनें विश्वांतील जलाचा व प्रकाशाचा अवरोध केल्यानें मर्दुकला त्याच्याशीं महायुद्ध करावें लागलें. त्यांत शेवटीं मर्दुकनें तैमातला मारून जल व प्रकाश मोकळे केलें. ' Pages 14 21. ( या हत्वाऽअहिं अरिणात्सप्तसिंधून् - ऋग्वेद. )

त्यांच्या सृष्टिविषयक कल्पनेप्रमाणें सृष्ट्यारंभीं सर्वत्र विश्व जलमय असून तें अंधःकारावृत होतें. या रजोमय ( Chaos ) स्थितीच्या अधिष्ठात्या दोन देवता म्हणजे अप्सु व त्याची बायको तैमात ह्या होत. त्यानंतर हलके हलके इतर देव निर्माण झाले, पण तैमातनें त्यांच्याशीं वैर आरंभलें. तेव्हां अनु वगैरे सर्व देवांनीं मर्दुकला सेनापतित्व दिलें. त्यानें महापराक्रम करून अप्सु व तैमात यांना आपल्या भयंकर वज्रानें ( Thunderbolt ) ठार मारलें व स्वर्गीय जल व प्रकाश यांची मुक्तता केली.



नंतर पृथ्वीला आकार आला, तो अंडार्धाचा होता. पृथ्वीच्यावर स्वर्गलोक असे, तो पालथ्या अंडार्धाप्रमाणें होता, व तो आणि पृथ्वी मिळून एक अंडाकृति गोल होता. हा गोल पातालाच्या आधारावर अधिष्ठित झालेला होता. सर्व पाताल-भर जल असून त्याचाच अधिष्ठाता देव अप्सु हा होय, स्वर्गाच्या गोलार्धाच्याहिवर स्वर्गीय जलाचा ( Eather ) चा पुंज असून त्याला दोन दरवाजे असत. त्यांपैकीं एकांतून शम्स् अथवा सूर्य येऊन पूर्वेस असलेल्या उदयागिरीवर आरूढ होई व दुसऱ्या पश्चिमेकडील दरवाजांतून निघून मानवसृष्टीच्या दृष्टीआड होई. सकाळीं व संध्या-काळीं सूर्याबरोबर त्याची पत्नी ' ऐ ' ही असते. पातालांतील जलसंचयांत एक मोठी पोकळी आहे व तेथें अराल्लु नांवाची दरी आहे, तींत सर्व मृतांचे आत्मे

जातात. या प्रदेशाचा राजा 'नेरगाल' हा आहे. याला मदत करण्यास 'बेलित्सेरी' नांवाचा अधिकारी असतो. हा त्या यमधर्माच्या आज्ञा लिहून घेऊन त्या दरेक प्राण्याच्या खात्यांत लिहून ठेवतो. स्वर्ग व पाताल या दरेकाचे प्रत्येकीं सात सात भाग आहेत, व या दरेकांत योग्यतेच्या दृष्टीनें कमीअधिक असलेले देव रहातात. पातालाचेंच नांव 'उरुगूला' असें आहे.

स्त्रीदेवतांसंबंधानें पहातां त्यांचें एक मुख्य रूप इश्तार या नांवाचें आहे. सर्व जगाची माता म्हणून ही प्रसिद्ध आहे. ती ज्या वेळेस राक्षसांशीं भयंकर युद्ध करिते, त्यावेळेस तिच्या रूपाचें नांव अनुनितु असतें व सौम्य रूपानें ती नना म्हणून प्रसिद्ध असते.

या मुख्य देवांशिवाय 'अनुनाकी' व इगिगि म्हणून अर्धदेवांच्या कोटींतील देवता असतात, त्या ( Spirits of the Heaven ) म्हणून प्रसिद्ध आहेत.

या सुमेरिअन लोकांचें एक महापुराण आहे, त्याचा नायक गिलगमेश हा होय. हा सूर्याचा उपासक असून त्यानें अचाट पराक्रम केल्याचें वर्णन या ग्रंथांत केलेलें आहे. याचा मुलगा उरुआस अथवा उरुआस्व ( सं. हर्यश्वः ) यानेंच प्रथम राजवंश सुरू केला, असें वर्णन केलें आहे. या गिलगमेशजवळ एक सोनेरी मेंढा होता, तो एकदां देवांनीं त्याजजवळून पळवून नेला, तेव्हां तो आणण्यासाठीं तो गेला. तो प्रथम त्याला एका स्त्रीयुक्त पुरुषाजवळ आढळला. त्याच्या जवळून घेऊन परत येतांना त्याला एक मोठा थोरला बैल आडवा आला, तेव्हां त्याच्याशीं मोठें युद्ध करून तडाक्यांतून सोडवून तो घेऊन आला.

पुढें तो 'माशु' या अस्तागिरीवर येऊन पोचला. अशा अर्थाचें गिलगमेशाच्या पराक्रमाचें वर्णन या ग्रंथांत केलें आहे.

याप्रमाणें सुमेरी लोकांची देवता, धर्म, पुराण वगैरेंची माहिती आहे. यानंतर त्यांच्यांत काव्यवाङ्मयादिकांची वाढहि उत्तम झालेली होती. तसेंच कलाकौशल्याच्या बाबतींतहि त्यांचें ज्ञान पुष्कळच श्रेष्ठ होतें. सुमेरियांत चिकण मातीचा सुकाळ व दगडाचा दुष्काळ असल्यानें तेथील सर्व इमारती विटांच्या असत. देवांचीं मंदिरें भव्य व प्रशस्त पण ओबडधोबड असत व त्यांना बाजूंनीं भिंतीच्या पुस्त्या दिलेल्या असत पावसाचें पाणी जाण्यासाठीं पन्हळ केलेले असत. विटांचा उपयोग करीत असल्याने विटांचे केलेले खांब भिंतीपासून अलग असत व इमारतीस मिन्याचीं वोलें वापरीत. भिंतींना फार सुंदर रंग दिलेले असत. ते लोक मातीचीं फार सुंदर भांडीं बनवीत असत व त्यांवर मिन्याची वेलबुट्टी व चित्रें काढीत असत. कांचेची बनावटहि त्यांना साधलेली होती. तसेंच रत्नें गुंफून त्यांच्या मालाहि ते तयार करीत. धातूंच्या पत्र्याचे शिक्के ते बनवीत व त्यावर आकृतींचें व चित्रलिपीचें लिखाण कोरीत असत.

येथें सुमेरीयांतील लेखनपद्धतीची थोडी माहिती दिली पाहिजे. पूर्वी सांगितलेंच आहे कीं, प्रथम प्रथम तेथे शब्दांच्या ऐवजीं चित्रें वापरीत असत, व मग

अक्कडी लोकांच्या स्वारीनंतर त्यांनीं अक्षरपद्धति आपल्याबरोबर आणल्यानंतर चित्रें व अक्षरें यांची मिश्रलेखनपद्धति सुरू झाली. याच पद्धतीनें तेथील बहुतेक लिखाण विटांवर कोरलेलें आहे. अणकुचीदार खिळ्यानें ओल्या विटांवर हे लिखाण करीत, त्यामुळें त्यांत साधारणतः उभ्या रेघा अधिक असत, व वर्तुळें अथवा वेलांट्या कमी असत. आकड्यांची संख्या लहान आडव्या सरळ रेषांनीं दाखवीत.

अक्षरांच्या चिन्हांबरोबरच जीं चित्रें त्यांत वापरलेलीं असतात: त्यांत गाईचें व बैलाचें चित्र फार वापरण्यांत येतें. त्याकाळची मुख्य संपत्ति गाईबैलांचीच असल्यानें त्या जनावरांना तेव्हांपासूनच महत्त्व व पावित्र्य प्राप्त झालेलें होतें. त्याचप्रमाणें माशाच्या आकाराचीं चित्रेंहि पुष्कळ सांपडतात. किंबहुना आपल्याइकडील मत्स्यावताराप्रमाणें त्यांच्या देवाचेंहि एक रूप मत्स्याचें आहे. सुमेरियन भाषेंत पिश् हा धातु मत्स्यत्वदर्शक आहे, व त्यांच्यांतील देवाच्या मत्स्यरूपाला 'सुखा' म्हणजे उडता मासा हें नांव असून त्याचा अर्थ 'बाय-इश्' म्हणजे महामत्स्य असा आहे. या शब्दांतील इश् शब्द मूळच्या पिश् या सुमेरिअन शब्दाचा अपभ्रंश आहे.

सुमेरिअन मत्स्यदेवतेचें चित्र त्यांच्या ग्रंथांतून खालीलप्रमाणें दिलेलें आढळतें.



त्याचप्रमाणें म्हशीचें व रेड्याचेंहि चित्र आढळतें. सिंहाचें चित्र तर फार प्रसिद्ध आहे. याप्रमाणें सुमरियन लिपीचें स्वरूप आहे.

त्यांच्या दंतकथांमध्यें सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीं झालेल्या जलप्रलयाची कथा सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्यावेळीं एका नावेंत कांहीं प्राण्यांचें संरक्षण करण्यांत आल व त्यापासूनच सृष्टीची पुढें पुनरुत्पत्ति झाल्याची कथा ही सुमेरिअन वाङ्मयांत सांपडते.

ही आख्यायिका हिब्रू, ग्रीक, अरबी, ख्रिस्ती, हिंदु वगैरे सर्व वाङ्मयांत आढळते, हें सर्वांना माहीत आहेच.

सुमेरियांत व त्यानंतर बॅबिलोनियांत फल-ज्योतिषशास्त्र फार महत्पदाला पोंचलें होतें. तेथील पुरोहित ताऱ्यांचे वेध घेत, ते मुख्यतः कुंडली वर्तविण्यासाठीं होत. यांतील कांहीं भाग पहिल्या सारगन राजाच्या वेळीं म्हणजे ख्रिस्तपूर्व ३८०० च्या सुमारास लिहिलेले आहेत. त्या काळीं फलज्योतिषावरून निघणारें पुढील गोष्टींचें भविष्य राजाला वेळोवेळीं विदित केलें जात असे. ज्योतिष्यांच्या जागांवर असलेले लोक उच्च दर्जाचे असत व त्यांच्या जागा वंशपरंपरेनें चालत. त्यांचीं भविष्यें उत्तरेस-

अक्कड व दक्षिणेस निप्पूर येथेंहि प्रसिद्ध करण्यांत येत व तीं धांवत्या जासुदाबरोबर पाठविलीं जात. दिल्बत, निप्पूर व बुरशिप्पा अशा शहरांतून हे अहवाल जात असल्यानें राजाला सर्व ठिकाणची माहिती मिळे.

या लोकांच्या महिन्याचा आरंभ चंद्रदर्शनाच्या सायंकाळापासून होत असे. दर महिन्याचे सात सात दिवसांचे चार आठवडे केलेले असत. दर आठवड्याच्या शेवटच्या दिवसास सुमेरी भाषेंत साब्बाथ हें नांव होतें. ( ख्रिस्ती धर्मांत रविवाराला साब्बाथ म्हणण्याचा प्रघात स्पष्टपणे यावरूनच असल्याचें उघड होतें. ) सिन् म्हणजे चंद्र या शब्दावरूनच ' सिनीवाली ' हा शब्द संस्कृतांत आला असला पाहिजे ( लो० टिळकांनीं खाल्डियन भाषेंतील कित्येक शब्द, उ० तैमात, अप्सु, वगैरे संस्कृतांत आल्यावरून वेदकालीन संस्कृताचा खाल्डियन भाषेशीं संबंध असल्याचें विवेचन केलें आहे, त्याचा उल्लेख पुढें येईलच. तथापि येथें इतकेंच नमूद करावयाचें आहे कीं, त्यांनीं दिलेल्या शब्दांत ' सिनीवाली ' शब्द नाहीं. तो मला नवीनच सुचला आहे. अमरकोशांत पौर्णिमेची ' सा दृष्टेंदुः सिनीवाली ' अशी व्याख्या दिली आहे. म्हणजे ज्या रात्रीला सिन् अथवा चंद्र पूर्णत्वानें दिसतो ती सिनीवाली. हा शब्दहि अप्सु, तैमात वगैरे शब्दांप्रमाणें उघड रीतीनें परभाषेंतील दिसतो. ) शम्श् म्हणजे सूर्य. अरबी भाषेंतहि सूर्याला शम्श् हाच शब्द आहे. उमुन्पाहु=गुरु, दिल्बत्=शुक्र ( फारशी भाषेंत शुक्राला हाच शब्द आहे. ) कैमनु=शनि, गुदुद्=बुध व मुस्तबर्रु=मंगळ, हे सात मुख्य ग्रह असून दरेक वार एकेक ग्रहाच्या नांवानें नेमलेला असे. बारा मास मिळून एक वर्ष होत असे. वर्षारंभ मात्र सौर असून संपातावर होत असे. दरेक दिवसाच्या बाराव्या भागास ( २ तासाला ) १ कस्बू असें म्हणत व अशा सहा कस्बूंचा ( सं. होऱ्यांचा ) मिळून दिवस व सहा कस्बूंची मिळून रात्र होत असे, व हे दोन्ही भाग वसंतसंपातीं म्हणजे वर्षारंभीं समसमान असत. वर्षाचे तीनशें साठ दिवस, चारचार महिन्यांचे तीन काल, ३५४ दिवसांचें चांद्रवर्ष तीनशें पासष्ट दिवसांचें सौरवर्ष, हीं सर्व प्रमाणें बॅबिलोनियन ज्योतिषांत उपलब्ध आहेत.

अशा उच्च स्थितीला पोंचलेल्या ज्ञानानें पूर्ण अशा या संस्कृतीचा शोध लागल्यानें सर्व जगताचा प्राचीन इतिहास पालटला, हें उघड आहे. तथापि त्याचा हिंदुस्थानाशीं अगर त्याच्या प्राचीन इतिहासाशीं कांहीं संबंध असेल, ही कल्पनाही अर्थातच त्या वेळीं कोणास शिवली नाहीं. परंतु सत्य हें केव्हां तरी बाहेर पडतेंच, या नियमाला अनुसरून सन १९०७ सालीं हल्लींच्या तुर्कस्थानाचा पूर्व भाग, जो पूर्वीं कॅपेडोशिया म्हणून म्हटला जात असे, व ज्यांत फार प्राचीन काळीं हिटाइट नांवाच्या राजवंशांतील राजे मिटानी नांवाच्या भागांत राज्य करीत असतां, तेथील राजधानीचें शहर बोगाझकोई येथें, कीललिपीनें खोदलेल्या कांहीं विटा ह्युगो विंक्लर या जर्मन गृहस्थास सांपडल्या, त्या ख्रिस्तपूर्व १६ व्या शतकांतल्या आहेत.

त्यांत मिटानीच्या राजांचीं कांहीं नांवें दिलीं आहेत, त्यांत, इंद्र, मित्र, वरुण, नासत्य, अपांनपात, हीं शुद्ध वैदिक नांवें आढळलीं. अर्थात् यापूर्वीं हिंदुस्थानचा या प्रदेशाशीं संबंध असून वरील नांवें वैदिक वाङ्मयावरूनच घेतलीं असल्याचें सिद्ध झालें. यानंतर हा शोधाच्या साखळींतील पुढचा फार महत्त्वाचा दुव्वा लो० टिळक यांनीं शोधून काढला. आर्यावर्ताच्या इतिहासाचें प्राचीनत्व सिद्ध करण्याच्या कार्यांत एका आर्यपुत्रानें प्रमुख श्रेय मिळवावें, हा योगायोग तर विलक्षण खराच, परंतु त्याबरोबर त्यामुळें लो० टिळकांची अलौकिक बुद्धिमत्ताहि व्यक्त होते. आपल्यांतील वेदांचा कालदृष्ट्या, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद, असा पूर्वापार क्रम लागतो, हें त्यांनीं दाखविलेंच आहे, ऋग्वेदाचा काल ख्रिस्तपूर्व ४५०० वर्षेपर्यंत, यजुर्वेद ख्रि. पू. ३५०० वर्षेपर्यंत, सामवेद साधारणतः उभयतांचा समकालीन व अथर्ववेद हा मागूनचा असून तो ख्रि. पू. २५०० च्या सुमाराचा आहे, असें त्यांनीं संपाताच्या गतीचीं जी गमकें वेदांत सांपडतात, त्यावरून ठरविलें होतें. त्यांपैकींच्या अथर्ववेदाचा अभ्यास करितांना त्यांना कांहीं शब्द त्यांत असे आढळले कीं, ज्यांची व्युत्पत्ति संस्कृतासारखी दिसेना. त्यांतील कांहीं श्लोक खालीलप्रमाणे आहेतः—

असितस्य तैमातस्य बभ्रोरपोदकस्य च ॥
आलिगी च विलिगी च माता च पिता च ॥
उरुगूलाया दुहिता जाता दास्यसिक्न्या ॥
ताबुवं न ताबुवं धेत्त्वमासि ताबुवम् ॥

यांतील तैमात, उरुगूला हे शब्द उघड उघड परकीय आहेत. असेंच दुसरे शब्द, अप्सु, ताबुव, आलिगी, विलीगी, किमिदिनि हे होत. याप्रमाणें त्यांना हें शब्द परकीय असल्याची शंका आली होती, पण तिच्या निराकरणाचा रस्ता त्यांना सांपडला नव्हता. पण जेव्हां त्यांच्या वाचनांत खाल्डियन अथवा सुमेरिअन वाङ्मयाचें इंग्रजी भाषांतर आलें, त्या वेळेस त्या शंकांचें निरसन होऊन सुमेरी व हिंदी राष्ट्राचा परस्परसंबंध त्यांना स्पष्ट प्रतीत झाला. विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, सुमेरी वाङ्मयांतील अर्वाचीन भागाचा ख्रिस्तपूर्व २८०० हा काल युरोपियन लोकांनीं निश्चित केला आहे, त्या सुमारास हिंदी-सुमेरी राष्ट्रांचा संबंध असण्याच्या उपपत्तीनेंच या शब्दांच्या विनिमयाचा उलगडा होण्यासारखा असल्यानें, अथर्ववेदाचा लो० टिळकांनीं ठरविलेला काल ग्राह्य मानणें फार सुलभ झालें.

यांच्याहिपेक्षां एक अत्यंत महत्त्वाचा पुरावा सुमेरी वाङ्मयावरून उपलब्ध होत आहे, तो लोकमान्य टिळकांच्या ध्यानांत आलेला दिसत नाहीं, परंतु तो पुरावा गणितविषयक असून, त्यानें तर लो० टिळकांच्या बुद्धिमत्तेचा कस बावनकशी असल्याचें सिद्ध होतें. त्यांनीं वेदांचा काळ ठरविण्यास जें गणितात्मक गमक

घेतलें त्याचा पाया संपाताची भ्रमणगति होय, हें आतां सिद्ध आहे. या संबंधानें श्री. न. चिं. केळकरकृत टिळक चरित्राच्या ६२९ पृष्ठावर याबद्दलचें सुंदर संकलित विवेचन दिलें आहे, तें येथें उद्धृत करतों:—

" सूर्य नेहमीं डोक्यावरून जात नाहीं, कधीं तो दक्षिणेकडून व कधीं उत्तरेकडून जातो, ही साधी गोष्ट सर्वांस माहीत आहे. सूर्य बरोबर डोक्यावरून जातो, अशा वेळा वर्षांत सहा सहा महिन्यांच्या अंतरानें दोन येतात. एकीस, म्हणजे जेथून सूर्य उत्तरेकडे जातो, त्या वेळेस, वसंतसंपात म्हणतात व दुसरीस, म्हणजे जेथून पुढें सूर्य दक्षिणेकडे वळतो तिला, शरत्संपात म्हणतात. हा वसंतसंपात हल्लीं रेवती नक्षत्रापासून अठरा ( अथवा तेवीस ) अंश मागें आहे, म्हणजे हल्लीं वसंतसंपाताचे वेळीं सूर्य रेवती नक्षत्रापासून तितकें अंश मागें असतो. "

" या वसंतसंपाताचे वेळीं सूर्य ज्या नक्षत्रांत असतो, तीं अगदीं सूक्ष्म गतीनें बदलत असतात. ही संपातचलनाची गति किंवा अयनगति ज्योतिषांनीं ठरविली आहे. व तिजवरून गणित करून वसंतसंपात अमुक वर्षांपूर्वी अमुक नक्षत्रांत होता असें सांगतां येतें. किंवा उलट, वसंतसंपात हा अमुक नक्षत्रांत आहे, असा एखाद्या ग्रंथांत उल्लेख मिळाल्यास, तो ग्रंथ किती वर्षांपूर्वीचा आहे, हेंहि गणित करून काढतां येतें. ' वेदांग ज्योतिषा'चे वेळीं हा संपात भरणी नक्षत्रांच्या पुढें दहा अंश होता, म्हणून त्याचा काल गणितानें ख्रि. पू. १३०० चा ठरतो. तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें कृत्तिका नक्षत्रांत वसंतसंपात होता असा उल्लेख आहे, त्यावरून त्याचा काल ख्रि. पू. २५०० चा असावा असें ठरतें. ऋग्वेदांत हा संपात मृगशीर्ष ( वैदिक आग्रहायणी किंवा ग्रीक ओरायन ) या नक्षत्रांत असल्याच्या उल्लेखावरून त्याचा काल ख्रि. पू. ४५०० असावा. याच्याहि पूर्वी पुनर्वसूंत वसंतसंपात असल्याचीं गमकें आढळतात. तो काल ख्रि. पू. ६००० वर्षांचा ठरतो. "

याप्रमाणें नक्षत्रांतील वसंतसंपाताच्या उलट गतीवरून हें गणित लो. टिळकांनीं बसविलें आहे व त्यांत वेदकालाची अत्यंत प्राचीन मर्यादा संपात पुनर्वसूंत असल्याची दिली आहे. हिंदुस्थानचा ग्रीक लोकांशीं संबंध येईपर्यंत आपल्याला राशी माहीत नव्हत्या, पण त्या ग्रीकांपूर्वी फार प्राचीन काळीं खाल्डिया अथवा सुमेरियांत माहीत असल्याचा उल्लेख वर दिलाच आहे. या राशींच्या गणनेप्रमाणें पुनर्वसु नक्षत्र हें मिथुन राशींत येतें. ' आर्द्रा पुनर्वसु त्रयं मिथुनः ' अर्थात् पुनर्वसूंत संपात होता, म्हणजेच तो मिथुनेंत होता. **हेंच गमक सुमेरी वाङ्मयांत दंतकथेच्या रूपानें दिलेलें आहे. हें जगांतील बुद्धिसाम्याचें एक अत्यंत आश्चर्यकारक उदाहरण होय,** वर सुमेरियन वाङ्मयांतील महापुराणांचा नायक गिल्गमेश यानें सोनेरी मेंढा परत आणल्याचा उल्लेख केलाच आहे. हा सोनेरी मेंढा म्हणजेच वसंत संपात होय ! कारण त्याच वेळीं थंडीचे दिवस संपून वसंतऋतूचा सुवर्णप्रकाश पडूं लागतो. ' परोक्षप्रिया हि वै देवाः ' म्हणजे वैदिक कथा या दंतकथेच्या लाक्षणिक

रूपानें दिलेल्या असतात, हा नियम सर्व ठिकाणीं सारखाच लागूं असतो. हा सोनेरी मेंढा प्रथम अगदीं दूर अशा ठिकाणीं एका स्त्रीसहवर्तमान बसलेल्या पुरुषाजवळ होता, म्हणजे त्या काळीं संपात मिथुन राशींत होता. कारण मिथुन राशीचें वर्णनच ' नृमिथुनं सगदं सवीणम् ' असें बृहज्जातकांत केलेलें आहे. तेथून गिल्गमेश तो मेंढा घेऊन येत असतां, वाटेंत त्याला भेटलेला भयंकर बैल म्हणजे ' वृषभ ' राशी होय ! त्याच्याशीं भयंकर युद्ध करून तो त्यानें सोडवून आणला. अर्थात् वृषभेच्या पूर्वी व मेषेच्या अखेर म्हणजे कृतिका नक्षत्रांत संपात असण्याचा हा काळ आहे. हा काल गणितानें ख्रि. पू. २८००-२५०० च्याच सुमारास येतो. व त्या काळींच या ग्रंथाची उत्पत्ति झालेली आहे, हें पाश्चात्यांनींहि आतां स्पष्ट ठरविलें आहे. अर्थात् सुमेरियांतील हें कालगणितहि संपाताच्या गतींवरूनच ठरविलें आहे, हे लो. टिळकांना माहीत नसूनहि त्याच मार्गानें त्यांच्या स्वतंत्र बुद्धीनेहि वेद-कालनिर्णयाचें ध्येय गांठलें ही किती अभिमानाची व भूषणाची गोष्ट होय ! हा नवीन शोध फार महत्त्वाचा आहे, व त्याचा पंडितांनीं अवश्य विचार करावा अशी नम्र विनंति आहे.

अर्थात् या विचारसरणीनें ऋग्वेदांतील अत्यंत प्राचीन काळ हा सुमेरियाच्या आद्यकालाशीं समकालीन होता, व तो काल सुमारें ख्रि. पू. ७००० ते ६००० वर्षें हा होय हें सिद्ध होतें. त्यामुळें उभयतांच्या वाङ्मयात, धर्मग्रंथांत, आख्यायिकांत कल्पनांची व शब्दांची अदलाबदल झाली असली पाहिजे हें उघड आहे. मागील विवेचनांतील सुमेरिअन देवतांपैकीं सिन्‌ची चंद्राशीं, शम्श्‌ची सूर्याशीं, रम्मान्‌ची वरुणाशीं, मर्डुकची इंद्राशीं, तैमातची वृत्राशीं, अप्सूची पातालाशीं, इश्तारची दुर्गेशीं बेलित्‌सेरीची चित्रगुप्ताशीं असलेली साम्यता इतकी विलक्षण आहे कीं, त्याविषयीं अधिक लिहिण्याची जरुरीच नाहीं. जलप्रलयाची कथा, इंद्रवृत्र युद्धाची कथा या कथाहि दोहोंत सारख्याच आहेत. फलज्योतिष दोघांचेंहि सारखेंच आहे. या सर्व साम्यावरून या दोन संस्कृतींचा दृढसंबंध असावा, हा तर्क फार वरच्या कोटीवर जाऊन पोंचला.

परंतु ईश्वराच्या मनांत हा सिद्धांत केवळ तर्कप्रतिष्ठच ठेवावा असें नसून त्याची ' प्रत्यक्षपरीक्षणैर्व्यक्ति ' करावी असें होतें, असें दिसतें. कारण जणूं काय त्याच्या संकेतानुरूप सन १९२५ सालीं पंजाब व सिंध येथें प्राचीन वस्तुशास्त्रासाठीं उत्खनन केलें जात असतां, फार विलक्षण शोध लागला. तेथें नवीन शहरेंच्या शहरें सांपडलीं. या स्थळांची प्रत्यक्ष कल्पना येण्यासाठीं या खालीं एक स्थूल नकाशा पुढें दिला आहे.

अधिक खोल खणतांना भूगर्भांत एकाखालीं एक असे अनेक थर सांपडले. त्यांचें सविस्तर व सुसंगत वर्णन मराठींत असलेलें माझ्या पाहण्यांत नसल्यामुळें व या जगत्क्रांतिकारक शोधाची माहिती मराठी वाचकांना असणें जरूर वाटल्यानें,

तीं मी सर जॉन मार्शल यांच्याच शब्दांच्या भाषांतरानें खालीं देत आहे. ' लंडन टाइम्स् ' वर्तमानपत्राच्या फेब्रुवारींत सन १९२६ च्या अंकांतून ही माहिती Journal of Indian History या नियतकालिकाच्या Vol. V :Part I serial No. 13 या अंकांत १०२ पृष्ठावर घेतली आहे, ती येणेंप्रमाणें:—

" पंजाबांतील हराप्पा या ठिकाणीं श्रीयुत साहनी यांनीं व सिंध मधील माहेंजो–दारो येथें श्रीयुत के. एन दीक्षित यांनीं केलेल्या प्राथमिक स्वरूपाच्या उत्खननावरून हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर अत्यंत महत्त्वाचा प्रकाश पडण्यासारखा आहे. स्थूल मानानें रावी नदीच्या पात्राच्या ओघानें संशोधन केल्यास किती अपूर्व साधनसंपत्ति मिळण्याचा संभव आहे, याची कल्पना या दोन ठिकाणच्या शोधांवरून येते.

हराप्पा येथील जागेपेक्षां माहेंजो–दारो येथील सांपडलेली जागा आकारानें लहान असली, तरी तींत अधिक वस्तुलाभ झाला आहे. आजूबाजूच्या सपाट मैदानावर सरासरी एक चौरस मैलाच्या आकाराचा व सपाटीपासून सुमारें चाळीस फूट उंचीचा एक मातीचा ढीग येथें होता. या ढिगाच्या चारी बाजूंनीं चर खणले असतां त्याखालीं एक उत्तम सुंदर बांधणीचें शहर सांपडलें, त्याचा काल खि. पू. ३००० वर्षें हा होय. त्याच्याहि खालीं खणतांना त्यांहून प्राचीन कालचे अवशेष सांपडले आहेत. त्यांत सांपडलेल्या इमारतीचे साधारणतः दोन वर्ग करतां येतात; एक मंदिरें अथवा देवालयें, व दुसरा खासगी राहण्याचीं घरें. तीं विटांचीं बांधलेलीं असून, त्यांच्या पायांत घालण्यासाठीं उन्हांत तापवून वाळविलेल्या विटा वापरल्या असून भिंतींना भट्टींत भाजलेल्या विटा लावल्या आहेत. देवालयें उच्च चौथऱ्यावर बांधलेलीं असून त्यांचे गाभारे लहान असून भिंती फार जाड आहेत. त्या देवळांतून मूर्तींची पूजा होत असे किंवा नाहीं, हें निश्चित सांगण्यास साधन नाहीं. कारण त्या मूर्ती सांपडल्या नाहींत. एका निळ्या इष्टिकाफलकावर एक आकृति एका सिंहासनावर मांडी घालून बुद्धाप्रमाणें बसल्यासारखी काढलेली असून तिच्या दोन्ही बाजूस दोन पूजक गुडघे टेकलेले दाखविलेले आहेत व मुख्य आकृतीच्या मागें नागाची फणा दाखविलेली आहे, व तिच्या मागील बाजूस तत्कालीन लिपींत कांहीं हकीगत कोरलेली आहे. राहत्या घरांत सामानसुमान फारसें आढळून येत नाहीं, परंतु त्यांची बांधणी अप्रतिम असून फार सोयीची केलेली होती. त्यांतील विहिरी, स्नानगृहें, पाणी जाण्याच्या पक्क्या मोऱ्या, विटांची फरशी या सर्वांवरून तेथील लोक संपन्न असून सुखवस्तु असल्याचें सिद्ध होतें. रोजच्या उपयोगासाठीं दगडी सुऱ्या असत, परंतु सधन कुटुंबांतून, तांबें, रुपें, सोनें व शिसें या धातूंची भांडीं व उपकरणेंहि आढळतात. रत्नांना पैलू पाडून त्यांना वेजें पाडणें, सोन्याचा उत्तम मुलामा करणें, विटांना पॉलिश देणें व धातूंचे शिक्के कोरणें, वगैरे सर्व कला त्यांना येत असत. या सर्व वस्तू दरेक घरांत सांपडल्या आहेत. विशेषतः

ब्राह्मणवर्गाला पूज्य असलेल्या गाईंचीं व बैलांचीं चित्रें विशेष प्रमुखत्वानें दिसतात, व तीं फार प्रमाणबद्ध आहेत, त्यावरून आज, पूर्वी पांच हजार वर्षांच्या काळींहि या जनावरांची निपज हल्लीं सारखीच सुंदर होती असें दिसतें. दुसऱ्या एका चित्रांत




पिंपळाचें झाड दाखविलें आहे अर्थात् या अश्वत्थ वृक्षाचें पावित्र्य फार प्राचीन आहे. त्याचप्रमाणें इतर चित्रांत, वाघ, हत्ती, गेंडे व इतर प्राणी दाखविले आहेत फक्त त्यांत घोडा हा प्राणी दिसत नाहीं. इतर वस्तू म्हणजे, रत्नें, भांडीं, सोन्या-चांदीचे दागिने, माळा, वगैरे होत.

हराप्पा येथील सांपडलेल्या वस्तूहि साधारणतः माहेंजो–दारो येथील वस्तूं-प्रमाणेंच आहेत. पण तेथें एक प्रचंड इमारत आढळली आहे, ती मात्र माहेंजो-दारो येथील इमारतीहून अगदीं भिन्न स्वरूपाची आहे.

माहेंजो-दारो व हराप्पा या दोन्ही ठिकाणीं प्रेतें जाळण्याची चाल प्रचलित असे. मात्र तेथें आपल्यां इकडील सन्याशांच्या समाधीसारख्या बांधलेल्या कांहीं

जागांतून हाडकें सांपडलीं आहेत, पण अशा जागा थोड्या आहेत. माहेंजो-दारो येथें कांहीं सबंध हाडांचे सांगाडे मात्र उत्तम स्थितींत राहिलेले आढळले आहेत. तांब्याचीं हत्यारें, रंगाचे मणी, धार लावण्याचे दगड या वस्तूहि आढळल्या आहेत.

या सर्व वस्तू जरी मेसापोटेमियांत सांपडलेल्या वस्तूंसारख्या असल्या तरी या प्रदेशांत असलेली संस्कृति मेसापोटेमियाच्या संस्कृतीची केवळ उपशाखा नसून, ती एक स्वतंत्रच संस्कृति होती असें अधिकाधिक सिद्ध होत आहे. आर्य लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी ज्या लोकांची येथें वस्ती होती, व ज्यांना आर्य लोक असुर असें म्हणत, त्यांच्या संस्कृतीचे हे सांपडलेले अवशेष होत, असें म्हणण्यास आतां हरकत दिसत नाहीं. आर्य लोकांनीं ख्रिस्तपूर्व तिसऱ्या अगर चौथ्या सहस्रकांत या संस्कृतीचा नाश केला. माहेंजो-दारो येथून उकरून काढलेल्या माणसांच्या डोक्यांचें परीक्षण करतां, तीं रुंद आकाराच्या ( Brachy-ceplhalic) अरुंद कपाळाच्या, रुंद नाकाच्या, जाड व लठ्ठ ओठांच्या व दाढी असलेल्या माणसांची असल्याचें दिसून आलें आहे, यावरून ही संस्कृति द्रविडी लोकांची असावी, असेंच बळकट अनुमान होतें.

अशा अपूर्व स्वरूपाचे हे नवे शोध आहेत. त्यांची पूर्ण चिकित्सा करून त्यांतील लिपि उकलून, तिचा अर्थ लावण्याचे यानंतरचें कार्य एल्. ए. वॅडेल या गृहस्थांनीं केलें आहे व त्यांनीं आपला तद्विषयक ग्रंथ " Indo Sumerian seals deciphered " हा प्रसिद्ध केला आहे. त्यांतील नांवें, लिखाण वगैरे पहातां तर हिंदी-सुमेरी संस्कृतीचा प्रत्यक्ष संबंध असल्याचा उरलेला सर्व संशय नाहींसा होऊन,

भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥

अशी स्थिति होते. या दोन देशांच्या परस्परसंबंधावरून युरोपिअनाच्या देहस्वभावानुसार हिंदी संस्कृति सुमेरीची शाखा होय व सर्व प्राचीन हिंदी वीरपुरुष, ऋषी वगैरे सुमेरियांतीलच होत, असाच निष्कर्ष वॅडेल साहेबांनीं काढला आहे. तो खरा असो, वा सुमेरियांतील लोकच तेथें हिंदुस्थानांतून गेलेले असोत; निदान ख्रि. पू. सहा हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत एक श्रेष्ठ संस्कृति होती, व ती वैदिक आर्यसंस्कृतीची पूर्वगामी संस्कृति होती, इतकी गोष्ट उघड्या डोळ्यांनीं दिसून आली, इतकें सिद्ध झालें.

आतां माहेंजो—दारो व हराप्पा येथें सांपडलेल्या शिक्क्यांचें व त्यावरील लिखाणाचें थोडें विवेचन करूं. हे शिक्के सपाट पृष्ठभागाचे चौरस अथवा तशासारखें असून त्यावर चित्रें व अक्षरें कोरलेलीं आहेत. यांत शाई भरून उठविण्यासाठीं ते तयार केलेलें होतें. यावरून कागदासारख्या कांहीं तरी पदार्थावर ( parchment) त्या काळीं लिखाण होऊं शकत असे, असें ठरतें, हे शिक्के हस्तिदंत दगड, व

चिकणमातीच्या गिलाव्याचे तयार केलेले असत. या शिक्क्यांचे दोन वर्ग आहेत, एक सरकारी व दुसरा खासगी, बहुतेकांवर गाईचीं व बैलांचीं चित्रें आहेत. सुमेरिअन भाषेंत ‘ गु ’ या शब्दाचा गाय अथवा बैल हा अर्थ होतो; तसाच वसति, घर अथवा गांव असाहि अर्थ होतो. याचेच अनुवाद संस्कृत गो, इंग्रजी कौ, पाली गा ( मो ) व तुर्की ( कोई ) हे होत. या गाईबैलांशिवाय इतर जनावरेंहि त्यांत कोरलेलीं आहेत. त्या सर्वांचीं तोंडें पश्चिमाभिमुख आहेत. त्यांपैकीं कांहींचें आकार व वर्णन खालीलप्रमाणें आहे:—



**नंबर १**

खुलासा:—

वाचन-खा–अस् आस्सि- अस् बर् उ - गु एदिन् अस्.

**अर्थः**–एदिनचा पुरोहित भृगु ऋषि ( याचा शिक्का. )

| Seal | Sumerian | Phonetic |
|---|---|---|
| | | KHA, HA |
| | | AŠ |
| | | AŠŠI |
| | | AŠ |
| | | BAR, MAŠ |
| | | U. |
| | | GU, HAR, GA |
| | | EDIN |
| | | AŠ |

### नंबर २



| Seal | Sumerian | Phonetic |
|---|---|---|
| | | KAN, GAN |
| | | BAR |
| | | AMA |
| | | WA, WI, WE |

खुलासा:—

वाचन—कण्व-वार्-अम्म-व

अर्थ:—कण्व ब्राह्मण, ( ईश्वराचा ) कर्ण. ( कान )

### नंबर ३



| Seal | Sumerian | Phonetic |
|---|---|---|
| | | KAN, GAN |
| | | WE(ME), ŠIB |
| | | AŠ |
| | | KHA, ḪA |
| | | ITI |
| | | SIG |
| | | TAB |
| | | E(DIN) |
| | | (AŠ) |

खुलासा:—

वाचन—कण्व-वे-अस्-खा-इति-सिग्-तब्-एदिन्-अस्.

**अर्थ**—एदिन् येथील खेतिसिग्चा मंत्रपुरोहित कण्व.

नंबर ४

| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
| | | ŠU |
| | | ŠE |
| | | EN |
| | | A, UMUN |
| | | ZAG, SAG |
| | | GU, GA, TU |
| | | ŠA, AG |
| | | DU |
| | | (AŠ) |



खुलासा:—वाचन—-सुषेण्—अ-सग्-गु-अग-डु-अस्—

**अर्थ**—अगडूचा राजा सुषेण.

नंबर ५

| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
| | | TAX, TAKH, LAX. |
| | | ,, ,, ,, |
| | | SA, SIR, GAL |
| | | GUNU, GANA |
| | | GU, GA, HAR |
| | | AG, ŠA |
| | | DU |
| | | AŠ |



खुलासा:—वाचन—तक्ष-स-गर-गु-अग-डु-अस्.

**अर्थ**—अगडु ( अयोध्ये ) चा राजा सगर याचा मंत्री तक्ष.

याप्रमाणें नमुन्यादाखल पांच शिक्के व त्यांचे खुलासे दिले आहेत. यांपैकीं पहिल्यांतील एदिन् हें नांव सिंधुनदाच्या प्रदेशांतील भागास दिलेलें होतें, हें या खालीं दिलेल्या नकाशावरून दिसून येईल. दुसऱ्यांत ब्राह्मणा ( वर्णाचा ) चा स्पष्ट उल्लेख आहे. अर्थात् ऋग्वेदांतील पुरुषसूक्त या पूर्वीचें आहे व त्यावेळीं चातुर्वर्ण्य-पद्धति रूढ झाली होती हें स्पष्ट होतें. कण्व हा मोठा कुलपति होता. मुनीनां दशसाहस्रं योऽन्नदानादिपोषणात् । अध्यापयति विप्रर्षिरसौ कुलपतिः स्मृतः ॥ अशी कुलपतीची व्याख्या केलेली आहे. तिसऱ्यांतील खैतिशिंग या शब्दाचा अर्थ मुख्य पुरोहित असा आहे. चौथ्यांत अगडु शहराचा उल्लेख आहे. अगडूचा अर्थ अयोध्या आहे. आपल्या इकडील पुराणांतूनही अयोध्येच्या सूर्यवंशीय राजांच्या वंशावळींत सुषेण याचें नांव दिलेलें आहे. सगर राजाचा उल्लेख पांचव्या शिक्क्यांत आहे, हा राजा स्वर्गांतील भागीरथी नदी भूलोकावर आणण्याबद्दल पुराणांत उल्लेखिलेला आहे. अशा रीतीनें पुराणांत प्रसिद्ध असलेल्या प्राचीन पुरुषांचे उल्लेख या शिक्क्यावर आलेले आहेत.

या एकंदर विवेचनाचा निष्कर्ष सामान्यतः असा निघतो कीं, ख्रिस्तपूर्व सहा सात हजार वर्षांपासून हिंदुस्थानांत एक प्रकारच्या सुसंस्कृत लोकांची वस्ती होती. त्या लोकांना विटांचीं उत्तम घरें बांधतां येत. त्यांना उत्तम प्रकारचें स्थापत्य कलेचें ज्ञान होतें. तांबें, शिसें, रुपें, सोनें, वगैरे धातु त्यांना चांगल्या माहीत असून त्यांचे अलंकार ते करीत, त्यांवर खोदकाम करीत, प्रथम प्रथम ते आपलें लिखाण एक प्रकारच्या चित्रलिपीनें करीत, व पुढें पुढें एक प्रकारची अक्षर लिपीहि ते वापरूं लागले होते. निरनिराळीं रत्नें त्यांना माहीत असून त्यांचे ते हार, माळा वगैरे करून वापरीत असत, चाकू, सुऱ्या वगैरे पदार्थ त्यांना परिचित होते. याहून विशेष महत्त्वाचा शोध तर नुकताच महिना पंधरा दिवसापूर्वींच प्रसिद्ध झाला आहे कीं, माहेंजो–दारो येथें कांहीं कापसाचें विणलेलें कापड सांपडलें होतें. तें खरोखर हल्लीं ज्याला आपण कापूस म्हणतों, याचेंच आहे किंवा दुसऱ्या एखाद्या वनस्पतीच्या तंतूंचें विणलेलें आहे, यांचें बारीक संशोधन करून युरोपियन तज्ञ संशोधकांनीं सरकारी रीतीनें प्रसिद्ध केलें आहे कीं तें हल्लींच्याच कापसाचें केलेलें होतें; यावरून ते लोक कापसाचीं वस्त्रें वापरीत असत हेंहि सिद्ध होतें, त्यांचीं मोठमोठालीं शहरें वसलेलीं होतीं. याप्रमाणें सुमारें ख्रि. पू. ३५०० अथवा चार हजार वर्षेपर्यंत त्यांचींच राज्यें हिंदुस्थानांत चालत होतीं. त्यानंतर या देशांवर आर्य लोकांनीं स्वारी केली व एतद्देशीय लोकांना त्यांनीं जिंकलें. हे एतद्देशीय लोक, रुंद डोक्याचे, अरुंद कपाळाचें, बसक्या नाकाचे, व जाड ओठांचे असत. अर्थात् ते द्रविड वंशीय होते. बलुचिस्थानांतील ब्रहुई भाषा ही द्रविड वंशीय भाषाच आहे, हें अलीकडील भाषाशास्त्रज्ञांचें प्रमाणहि याच सिद्धांताला पुष्टि देतें. जेत्या आर्यांनीं आपला सृष्टिस्तुतिपर वेद रचिला व नंतर त्याचीच परिणति यज्ञयागादिपर धर्मांत झाली. हा त्यांचा धर्म स्वाभाविकच जित द्रविडांनीं क्रमाक्रमानें स्वीका-

रला, परंतु त्याबरोबरच त्या लोकांत असलेल्या गाईबैलांची पवित्रता, आश्वत्थवृक्षाची पूज्यता, वगैरे कल्पना आर्यांनींहि उचलल्या व अशा रीतानें त्या दोघांची एक मिश्र संस्कृति बनली. सामाजिक दृष्ट्याहि या दोन्ही समाजांत लग्नकार्यें होऊन कालांतरानें त्यांचें एकीकरण झालें. परंतु हे आर्य लोक येण्यापूर्वींच्या द्राविड लोकांचे सुमेरियाशीं उत्तम प्रकारें दळणवळण होतें. हिंदुस्थानांतून सुमेरिअन लोक सुमेरियांत गेलेले असोत, अथवा सुमेरियांतून हे द्राविड लोक हिंदुस्थानांत आलेले असोत, हें ठरविण्यास अजून निश्चित प्रमाण उपलब्ध झालें नाहीं. ते कांहीं असलं तरी, आर्य लोक आल्यानंतर या उभय समाजांतील व उभय देशांतील ब्राह्मण ग्रंथकालीन संस्कृतींत अत्यंत साम्य आहे व त्यामुळेच सुमेरियांतील मिटानीं येथील राजांचीं नांवें इंद्र मित्र, वरुण वगैरे ठेविलीं गेलीं, व उलटपक्षीं सुमेरियन वाङ्मयांतील अप्सु, तैमात आलिगी, विलिगी; सिनीवाली, वगैरे शब्द इकडील वाङ्मयांत प्रविष्ट झाले, अशा रीतीनें हा क्रम चालू होता.




इतिहाससंशोधनाचा पल्ला सिंध व पंजाब येथील उत्खननानें येथवर आणून पोंचविला आहे, व हिंदुस्थानच्या इतिहासाला ख्रि. पू. सहासात हजार वर्षें मागें नेऊन सुस्थित केलें आहे. ही सर्व हकीगत हिंदी लोकांना अभिमानास्पद आहे. या संबंधानें मि. वॅडेल म्हणतातः—

"The discoveries herein recorded, should therefore appeal to the hearts and stir the religious and patriotic feeling of all educated Hindus who desire to know the first-found scientific proofs for the veracity of their Vedas and Ancient Epics ( the Puranas), and to learn

that their ancestral Vedic Kings and sages were famous historical emperors, Kings and priest-Kings with multitudinous monuments still existing to the present day. It must also be gratifying to the modern Hindus to find, that the Vedic and Epic tradition which their ancestors preserved and transmitted down through the centuries, and in which they have steadfastly believed, is now substantially proved true, and has become a chief means of identifying the Aryan and summerion civilizations."

म्हणजे- या नवीन लागलेल्या शोधांनीं हिंदु लोकांचीं अंतःकरणें उचंबळून यांचीं व त्यांची धार्मिक भावना व देशभक्ति जागृत व्हावी, असें त्यांचें महत्त्व आहे, कारण त्यांच्या वेदांबद्दल व पुराणांबद्दल प्रत्यक्ष व प्रथम ऐतिहासिक पुरावे त्या शोधामुळें मिळाले आहेत. त्यांचे वैदिक पूर्वज सुप्रसिद्ध राजमहाराजे, पुरोहित व ऋषी हे सर्व ऐतिहासिक पुरुष होते. व त्यांनीं बांधलेल्या इमारती आज मित्तीसहि उपलब्ध आहेत, हें ज्ञान त्या शोधामुळें झालें आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या वेदांतून व पुराणांतून जी राजवंशांची व ऋषिकुलांची परंपरा वर्णिली आहे व जिच्यावर त्यांची पूर्ण श्रद्धा आहे, ती वस्तुतः सत्य आहे व तिच्यामुळेंच सुमेरियांत व हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या संस्कृतींचें ऐक्य निश्चित करण्यास महत्त्वाची मदत झाली आहे.

येथपर्यंत आलेलें हें संशोधन येथून पुढें हिंदी लोकांनींच विशेष चालवून आपल्या प्राचीन परंपरेविषयींच्या सहानभूतीच्या दृष्टीनें आपल्या राष्ट्राचा सुसंगत इतिहास बनवावा, अशी आशा आहे.

# हिंदी व सुमेरी इंद्र.





सिंध व पंजाब या प्रांतांतील भूगर्भशोधमानें आविष्कृत केलेल्या अत्यंत प्राचीन हिंदी संस्कृतीचें स्वरूप दाखवून, प्राचीन सुमेरियन संस्कृतीशीं तिचें किती निकट साम्य आहे, याचें दिग्दर्शन ' चित्रमय जगत् ' च्या जानेवारीच्या खास अंकांत केलें आहे. या दोन्ही प्रदेशांतील इमारती, चित्रें, पुतळे, अलंकार, हत्यारें, शिक्के, त्या शिक्क्यांवरील लिपि, त्या लिपीच्या वाचनानें प्राप्त झालेल्या माहितीवरून कळून आलेली त्यांची सामाजिक, राजकीय व धार्मिक स्थिति, त्यांचें गणित व फलित या दोन्ही शाखांतील ज्योतिषविषयक ज्ञान व त्यांच्यांतील दैवतात्मक ज्ञान, इत्यादि अनेक बाबतींचा अभ्यास करतांना या दोन्ही संस्कृति समकालीन असल्या पाहिजेत हें उघड होतें, असें त्या लेखांत दाखविलें होतें. हा काल अधिकांत अधिक ख्रिस्तपूर्व सहा सात हजार वर्षांपूर्वीपर्यंत जाऊन पोहोंचतो असें अंतर्गत उल्लेखांवरून निष्पन्न होतें, व हेंच अनुमान भारतीय वेदांबद्दल कै० लो० टिळकांनीं काढलें होतें, असेंहि त्या लेखांत दाखविलें होतें. ज्या लोकांत या दोन्ही संस्कृतींचा प्रचार चालू होता, ते कोण होते ही जिज्ञासा पुढें ओघानेंच प्राप्त होते. तिचें उत्तर मि. वॅडेल यांनीं असें देण्याचा प्रयत्न केला आहे कीं "The Indo-Aryans who conquered, colonized and civilized India...... were those leading sea-going branches of the Aryan sumerians." या लोकांचा वंश सुमेरियांत असून पुढें तिचीच शाखा हिंदुस्थानांतील आर्य, ही होय; अर्थात् सुमेरिअन संस्कृति त्यांतल्या त्यांत प्राचीन व आर्यसंस्कृति तिची शाखा, म्हणून अर्वाचीन, हें मि. वॅडेल यांचें अनुमान युरोपिअन लोकांच्या देहस्वभावानुसार केलेलें आहे, असें मी मागील लेखांत म्हटलें आहे. वस्तुतः युरोपिअन लोकांची प्रवृत्ति आर्यसंस्कृति शक्य तितकी अर्वाचीन ठरविण्याची असते, ही गोष्ट अनेकांनीं अनेक ठिकाणीं नमूद केलेली असतां, मागील लेखांतील माझ्या विधानांत कांहीं जणांना युरोपिअन लोकांच्या प्रयत्नांबद्दल नुसता कृतज्ञताभावच नव्हे, तर उपहासाहि असल्याचा भास झाला. पण तो भास चुकीचा आहे. कारण मी जें विधान केलें आहे, त्याला चमत्कारिक रीतीनें सर जॉन मार्शल यांचीच पुष्टि मिळाली आहे. ता. ४ जानेवारीच्या ' टाइम्स् ' च्या अंकांत मार्शलसाहेब म्हणतातः--

" Owing to its close connection with the Sumerian civilization of Mesopotemia, the prehistoric civilization revealed at Mohenjo-daro and Harappa has hitherto been designated by the name ' Indo-sumerian. ' With the progress of exploration, however, it has become evident, that the connection with Mesopotemia was due **not to actual identity of culture,** but to intimate commercial or other intercourse between the two countries. For this reason the term ' Indo-Sumerian ' has been discarded and ' Indus ' adopted in its place. " ( मेसापोटेमियांतील सुमेरिअन संस्कृतीचें पंजाब व सिंधमधील संस्कृतीशीं असलेल्या निकट साम्यावरून या संस्कृतीस ' इंडो-सुमेरिअन ' असें नांव आजपर्यंत उपयोजिलें होतें. परंतु हिंदुस्थानांतील उत्खनन जसजसें अधिक अधिक होत जात आहे, तसतसें हें अधिक सिद्ध होत आहे कीं, या दोन्ही संस्कृतींत **तादात्म्य** नसून फक्त व्यापारादि संबंधामुळें अत्यंत **साम्य** प्रतीत होतें, इतकेंच; व याचसाठीं इतउत्तर हिंदुस्थानांतील संस्कृतीला ' इंडो-सुमेरिअन ' या संज्ञेनें न संबोधितां सिंधु ( नदप्रांतीय ) असें संबोधण्यांत येईल. ) अर्थात् या मार्शल्साहेबांच्या अभिप्रायानें वॅडेल्साहेबांचें अनुमान बाधित होतें, हें उघड आहे, व म्हणूनच त्या विधानावर आम्ही आक्षेप घेतला होता. अर्थात् या आक्षेपांत कृतज्ञताभाव अथवा उपहास वगैरेंचा भास कल्पणें चुकीचें होय. असो.

आमच्या मतें मि. वॅडेल यांचें विधान चुकीचें आहे व सर जॉन मार्शल यांचें विधान हें अर्धसत्य आहे. वॅडेल्साहेबांच्या मतें सुमेरिअन लोकांच्या ज्या शाखेनें हिंदुस्थानावर स्वारी करून आपली शाखा हिंदुस्थानांत स्थापिली; त्या शाखेनें ख्रि. पू. ७०० च्या सुमारास ही स्वारी केली; पुढें याच लोकांत उपनिषदें, स्मृति वगैरे ग्रंथ त्यानंतर झाले, व त्याच लोकांत भारतीय युद्ध त्यानंतर झालें. अर्थात् हें विधान चुकीचें आहे, हें सांगण्यास फारशी हरकत येण्यासारखी नाहीं. मार्शल्साहेबांचें विधान इतक्यापुरतें सत्य आहे कीं, हिंदुस्थान व मेसापोटेमिया या दोन देशांत ख्रि. पू. चवथ्या व तिसऱ्या सहस्रकांत दोन भिन्न संस्कृति होत्या; एक दुसरीची शाखा नव्हती. परंतु त्यांच्यांतील साम्य व्यापारादि निकट संबंधामुळेंच आलेलें होतें, हें मार्शल्साहेबांचें विधान बरोबर नसून, वस्तुतः मेसॉपोटॅमिया व हिंदुस्थान यांच्यांतील संस्कृतिसाम्य असण्याचें खरें कारण या दोन्ही शाखा उत्तर ध्रुवप्रदेशीय एका संस्कृतीच्याशाखा आहेत, व त्यामुळें त्यांच्यांत हें विलक्षण साम्य दिसून येत आहे. या उपपत्तीच्या समर्थनार्थ या लेखांतील विवेचन योजिलें आहे.

लो० टिळक यांनीं आपल्या ' आर्टिक होम इन् दि वेदाज् ' या ग्रंथाच्या आरंभींच म्हटल्याप्रमाणें " कोणत्याहि राष्ट्राच्या पूर्वपीठिकेचा मागोवा काढतां काढतां अखेर आपण त्या राष्ट्राच्या पौराणिक आख्यायिका व दंतकथापर्यंत जाऊन पोहोंचतों,

व त्या आख्यायिका व दंतकथांतच त्या राष्ट्राचा प्राचीनतम इतिहास सांठविलेला असल्यानें त्यांच्या सत्य अर्थप्रतीतीनेंच तो उपलब्ध होतो." प्राचीन ज्ञानप्राप्तीचा हा दंडक यथार्थ आहे व तो लावूनच आजपर्यंत अनेक देशांच्या इतिहासाचीं कोडीं उलगडतां आलीं आहेत. तो दंडक भारतीय वेदकथांना लावून आर्यवंशाच्या इतिहासाचा छेडा लावण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला आहे. भारतीय वेदकथांत इंद्रकथांना अत्यंत महत्त्व देण्यांत आलें आहे, व तसेंच इंद्र या देवतेला सर्व देवतांत प्राधान्य देण्यांत आलें आहे. इतर सर्व वैदिक देवतांपेक्षां इंद्रविषयक सूक्तांची संख्या कितीतरी पट अधिक आहे! इंद्र ही भारतीयांची राष्ट्रीय देवता होय. अनेक सूक्तांतून इंद्राचें वर्णन केलेलें आहे. त्यांत त्याची उत्पत्ति, बाळपण, रूपवर्णन, गुणवर्णन व त्याचा मुख्य पराक्रम जो वृत्रवध, त्याचें वर्णन केलें आहे. या इंद्रविषयक कथेचा अनेकांनी अनेक रीतीनें अर्थ करून भारतीयांच्या इतिहासाबद्दलच्या आपल्या उपपत्ति कल्पिल्या आहेत. त्यांचपैकींच्या पूर्वींच्या सर्व उपपत्तींचा विचार करून त्या कशा असमाधानकारक आहेत, हें लो० टिळकांनीं दाखविलें आहे, व उत्तरध्रुवदेशीय आर्यवस्तीच्या उपपत्तीनें या कथेचा समर्पक खुलासा कसा होतो, हे आपल्या ग्रंथांत दाखविलें आहे.

अर्थात् ही इंद्रविषयक कथा जर सुमेरिअन् वाङ्मयांत अगदीं तंतोतंत एकसारखी आढळली, व इंद्रविषयक सर्व गोष्टींचें प्रतीक जर त्या सांस्कृतिक वाङ्मयांत आढळलें, तर अर्थात् दोन्ही संस्कृतींचा मूळ एक उद्गम असला पाहिजे हें उघड होतें. पुढें ध्रुवप्रदेशीं ख्रि. पू. अजमासें आठ हजार वर्षांपूर्वीं हिमप्रलय झाला, तेव्हां तेथून आर्यलोकांनीं स्थलांतर केलें व त्यांच्यांतील कांहीं लोक सुमेरियांत गेले व कांहीं हिंदुस्थानांत आले. हिंदुस्थानांतील सिंध व पंजाब येथील लोकांवर आर्यांनीं स्वारी केली व त्यांच्या व आपल्या चालीरीतींचा परस्पर-विनिमय केला. ही गोष्ट ख्रि. पू. सुमारें चार हजार वर्षांपूर्वी झाली, व आर्यावर्तांतील मूळचे लोक व आर्यलोक यांच्या संसर्गाचाच परिणाम नवीन उत्खननांत दिसून येत आहे. या उत्खननांतील शहरांचा काळ मार्शल साहेबांनींच ख्रि. पू. ३५०० वर्षांचा ठरविला आहे, तो बरोबरच आहे. त्यापूर्वी कांहीं शतकें आर्यलोक हिंदुस्थानांत आले होते. अर्थात् हा काळ मृगनक्षत्रीं वसंतसंपात असल्याच्या वैदिक उल्लेखांशीं अगदीं मिळतां येतो. याच्याहि पूर्वींच्या काळाचा—पुनर्वसूत संपात असल्याच्या काळाचा उल्लेख वेदांत प्राचीन म्हणून केलेला आहे. म्हणजे संपातांत दोन नक्षत्रांइतका फरक पडलेला आहे. इतका फरक पडण्यास, दर नक्षत्रास अजमासें ९५० वर्षे याप्रमाणानें, १९०० अथवा दोन हजार वर्षांचा काळ जावा लागतो. अर्थात् वेदांचा अगदीं आद्योद्गम ख्रि. पू. सहा साडेसहा हजार वर्षांपूर्वींचा आहे. त्या काळीं भारतीय आर्य व मेसॉपोटेमिअन् अथवा सुमेरियन् आर्य उत्तरध्रुवाजवळ रहात होते, व त्यांच्यांत त्या काळीं ज्या देवतात्मक दंतकथा होत्या, त्या स्वाभाविकच त्यांनीं आपल्याबरोबर आणल्या. अशी ही एकंदरीनें आमची विचारप्रणालिका आहे. तिचा प्रपंच आतां करावयाचा आहे.

संस्कृत व्युत्पत्तीला परकीय भासणारे व म्हणून उघड परकीय दिसणारे व शोधाअंतीं सुमेरी भाषेंतले सांपडणारे असे ' तैमात, अलिगी, विलिगी, सिनीवाली ' वगैरे शब्द आढळल्यानें सुमेरी व हिंदी संस्कृतीचा विनियम झाल्याची कल्पना प्रथम लो. टिळकांना सुचली, परंतु त्या वेळीं सुमेरी वाङ्मय हल्लीं आहे त्याप्रमाणें इंग्रजी कवितारूपानें उपलब्ध झालें नसेल म्हणून म्हणा, अथवा त्यांच्या स्वतःच्या अनेक व्यवसायांमुळें त्यांना वेळ मिळाला नसेल म्हणून म्हणा, परंतु कोणत्याहि कारणानें असो या वृत्रकथेचा संपूर्ण संदर्भेतिहास लो. टिळकांनीं संशोधिला नाहीं. तो तसा संशोधण्याकरितां प्रथम सुमेरी कथा साकल्यानें अभ्यासणें जरूर होतें, व त्यानंतर ऋग्वेदांतील तत्संबद्ध उतारे काढण्यासाठी त्याचाहि अभ्यास करणें अवश्य होतें. तसा केल्यानंतर या दोहोंत अपूर्व साम्य साद्यन्त असल्याचें मला आढळून आलें, व त्याच्या स्पष्टीकरणासाठींच खालील विवेचन केलें आहे.

हें विवेचन करितांना संदर्भासाठीं घेतलेलें सुमेरियन् व भारतीय असे दोन्ही प्रकारचे आधार अगदीं मूळरूपानें घेतले आहेत. भारतीय आधारांसाठीं ऋग्वेदीय सूक्तांतील उतारे शब्दशः घेतले आहेत. सुमेरी आधार माझ्या पहिल्या लेखांत सांगितल्याप्रमाणें त्या काळीं ओल्या विटांवर कीलाकृति लिपीचें जें लिखाण कोरलेलें आहे, त्याचें इंग्रजी कविताबद्ध भाषांतर केलें आहे, त्यांतून घेतले आहेत. ही कीललिपी उकलण्याचें प्रमुख श्रेय मि. जॉर्ज स्मिथ, ह्यूगो, वुइंक्लर वगैरे ग्रंथकारास आहे. या शिवाय ख्रि. पू. चवथ्या पांचव्या शतकांत बेरोसस् नांवाच्या एका खाल्डियन् धर्मगुरूनें सुमेरी दंतपुराणकथांचा संग्रह केला होता. त्याचें पुढें ग्रीक भाषेंत भाषांतर करण्यांत आलें. तें भाषांतर सांप्रत उपलब्ध नाहीं. पण त्यांतील उतारे अलेक्झँडर पॉलिहिस्टर यानें एकत्रित केले आहेत, व त्यावरून युसेबिअस् नांवाच्या ग्रंथकारानें ' क्रानिकॉन ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्या ग्रंथांतील मजकुरानें जॉर्ज स्मिथच्या लिपीवाचनाला संपूर्ण रीतीनें पुष्टि मिळाल्यानें स्मिथच्या भाषांतराचा आधार मूळाइतकाच विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. त्यांतूनच सुमेरी आधार घेतले आहेत. कोठें कोठें अभिप्रायात्मक गद्य आधार घेतले आहेत, ते किंग या ग्रंथकाराच्या तद्विषयक ग्रंथांतून घेतले आहेत.

या सुमेरी आधारांवरून पहातां सुमेरी देवतांसंबंधानें किंगनें जें विवेचन केलें आहे, तें तंतोतंत भारतीय वैदिक देवतांप्रमाणेंच आहे. तो म्हणतोः—"या देवता म्हणजे सृष्टींतील निरनिराळ्या शक्तींचीं रूपें होत. जगतांत नित्य प्रतीत होत असलेल्या शक्तींच्या व त्यांच्या परिणामांच्या घडामोडींसच त्यांनीं देवत्व दिलें आहे. त्या कालच्या लोकांनीं प्रत्यहीं सूर्याचा अस्तोदय पाहिला, चंद्राच्या कलांचें निरीक्षण केलें निरनिराळ्या ताऱ्यांचें अवलोकन केलें, निरंतर मंदगतीनें वाहणारा वायु व प्रलयकर्ता झंझावात यांचा अनुभव घेतला, परंतु हे सर्व प्रकार सृष्टीच्या शक्तींचे स्वाभाविक परिणाम आहेत, ही जाणीव त्यांना न झाल्यानें या परिणामांच्या ठायीं त्यांनीं देवांची कल्पना केली, व अनुकूल प्रतिकूल परिणामानुसार त्या देवांचे शुभाशुभ वर्ग पाडले.

हें करितांना त्यांच्या मनानें त्या देवांचें अस्तित्व लाक्षणिक रूपानें कल्पिलेलें नसून तें वास्तव रूपानें होतें. " अशा या देवतांमध्यें भारतीय दृष्ट्या इंद्र ही देवता मुख्य आहे.

भारतीय वेदांत ज्याप्रमाणें इंद्राला प्रमुख स्थान आहे, त्याप्रमाणें सुमेरियन् वाङ्मयांत आद्यस्थान असलेली देवता **मर्डुक** ही होय. वस्तुतः वेदांच्या अगदीं आद्य काळीं हें प्रमुखपद वरुण या देवतेला होतें. वरुण हा " उदारधी, श्रीमान्, शांत, पुण्यपावन व सर्वांवर प्रभुत्व गाजविणारा असा आहे. " वरुणाला ' तूं सर्वांचा राजा आहेस ' ( त्वं विश्वेषां वरुणासि राजा । ऋ. ), ' तो सर्व भुवनांचा राजा आहे ' ( तेन विश्वस्य भुवनस्य राजा । ऋ. ). ' तो गंभीर, पराक्रमी, क्षत्रिय व अस्तित्वांत असलेल्या सर्व वस्तूंचा राजा ' ( गंभीरशंसो रजसो विमानः सुपारक्षत्रः सतो अस्य राजा । ऋ. ) असें म्हटलें आहे. त्या काळीं वरुण हा राजा व इंद्र त्याचा सेनापति मानला जात असे. ' त्या विभ्राजमान इंद्र व वरुणांना नमस्कार करा; त्यातला पहिला वज्रानें वृत्राला मारतो व दुसरा विप्र हा घरीं बसतो ' ( ता गृणीहि नमस्येभिः शूषैः सुम्नेभिः इंद्रावरुणा चकाना । वज्रेणान्यः शवसा हंति वृत्रं सिषक्त्यन्यो वृजनेषु विप्रः ऋ. ) पण पुढें वरुणाचें हें सम्राट्पद इंद्राकडे आलें. ( ' सत्यानृते अवपश्यन् जनानाम् ) जनांचें सत्यासत्य अवलोकन करणाऱ्या वरुणापेक्षां पराक्रमानें वृत्राचा नाश करणारा इंद्रच त्या कालच्या विजिगिषु आर्यांना अधिक पटला. याचें प्रत्यंतरहि वेदांत दिसून येतें. ऋग्वेदांतील एका सूक्तांत अग्नि हा असें म्हणतो कीं, ' पुष्कळ वर्षें मी माझ्या पूर्वींच्या धन्याला ( वरुणाला ) सोडलें असून, माझा हल्लींचा धनी इंद्र आहे. ' ( बह्वीः समा अकरमंतरस्मिन् इंद्रं वृणानः पितरं जहामि । ऋ. ) इंद्राच्या पराक्रमामुळें हतप्रभ झालेल्या वरुणाला त्याचे परिजनहि सोडून जातात, हा प्रकार मुद्राराक्षस नाटकांतील राक्षसानें काढलेल्या उद्गाराप्रमाणेंच आहे. तो म्हणतोः—

उच्छिन्नाश्रयकातरेव कुलटा गोत्रांतरं श्रीर्गता ।
नामेवानुगता गतानुगतिकास्त्यक्तानुरागाः प्रजाः ॥

" हतबल झालेल्या राजाला त्याची श्रीच केवळ सोडून गेली, असें नव्हे; तर तिच्या मागून अनुरक्त असलेले प्रजाजनहि सोडून गेले. "

अथवा इंग्रजी कवि टेनिसन्नें आपल्या मॉर्ट ड आर्थर या काव्यांत म्हटल्याप्रमाणें

Authority forgets a dying king, laidw idowed
Of the power in his eye, that bowed the will.

नुसत्या डोळ्यांतल्या चमकेनें दुसऱ्यांचीं शिरें नमविण्याचें सामर्थ्य नष्ट झालेल्या दुर्बल राजाला अधिकारश्रीहि सोडून जाते.

हाच प्रकार सुमेरी वाङ्मयांत दिसून येतो. फार प्राचीन काळीं बेल् या देवते-

कडे जगताचें साम्राज्य मानलेलें असे. अनेक शतकें या देवतेला असलेलें प्राधान्य पुढें मर्डुक या देवाकडे संक्रामित झालें.

किंग म्हणतो:-Traces of his original subordinate character at the time when Babylonia was still unknown, may be seen in the fact that he was never regarded as the oldest of the Gods, nor as endowed from the beginning with his later attributes; he was conceived as having won his power and supremacy by his own valour and by the services he rendered both to Gods and to mankind.

( मर्डुकची योग्यता पूर्वकाळीं दुय्यम होती. त्या काळीं बॅबिलोनचें अस्तित्वहि नव्हतें. मर्डुक हा प्राचीन देव नव्हे, तो तरुण आहे व त्यानें आपलें प्रमुखपद स्वपराक्रमानें व स्वावलंबनानें व त्यानें देवांना व मनुष्यांना केलेल्या सहाय्यामुळें संपादन केलें आहे. '

असेंच वर्णन इंद्राबद्दल आढळतें. ( इंद्रं अजुर्यम् ), ( युष्मस्य ते वृषभस्य स्वराज उग्रस्य यूनः ). ( अजरं युवानम् ) इत्यादि सूक्तांनीं इंद्राचें तारुण्य व्यक्त होतें. तसेंच त्याच्यांत सर्व देवांचें पौरुष, बळ व शहाणपण एकवटलें आहे. ( तस्मिन् नृम्णमुतक्रतुं देवा ओजांसि संदधुः ) त्याची मदन व दानशूरता प्रकाशाप्रमाणें पसरली आहे ( ज्योतिर्न विश्वमभ्यस्ति दक्षिणा ), इत्यादि उल्लेख वरील अर्थाचेच आहेत.

अशा प्रकारें वैदिक इंद्र व सुमेरी मर्डुक यांना प्रथमतः गौण स्थान असून नंतर त्या उभयतांना श्रेष्ठ पदवी मिळालेली आहे. त्यांचा इतिहास आतां साम्यत्वानें वर्णावयाचा आहे. तो अधिक स्पष्टतेनें नजरेंत भरण्यासाठीं दोन कोष्टकांत एकासमोर एक देत आहे. यांत डाव्या कोष्टकांत मर्डुकविषयक सुमेरी वाङ्मयाच्या इंग्रजी भाषांतरांतील मराठीसह उतारे देऊन उजव्या बाजूच्या कोष्टकांत तदर्थक फक्त ऋक्—वेदांतील इंद्रविषयक उतारे मराठी भाषांतरासह दिले आहेत, व अशा रीतीनें ही कथा साद्यंत वर्णिली आहे. भारतीय इंद्रकथेंत इंद्राचा जन्म, त्याचा पराक्रम, वृत्राची उत्पत्ति, त्यानें केलेलें जलबंधन, त्यानें सर्व विश्वाला दिलेला ताप, त्यामुळें देवांना वाटलेली भीति, त्यांनीं वृत्रवधासाठीं इंद्राला दिलेलें सेनापत्य, त्याची वृत्रावर स्वारी, व नंतरचा वृत्रवध, त्यामुळें मुक्त झालेले जलप्रवाह व प्रकाश, त्यावेळीं सर्व देवांनीं केलेली इंद्रस्तुति, मग इंद्रानें केलेली विश्वाची पुनर्रचना व अखेर भक्तांना दिलेलें आश्वासन, इतके भाग प्रमुखतः येतात. अत्यंत आश्चर्यजनक रीतीनें हेच भाग मर्डुकच्या कथेंत येतात. तेथें वृत्र याचा प्रतिनिधि ' तैमात ' होय. हाच विदेशी तैमात पुढें भयंकर सर्प म्हणून, अथर्ववेदांत ' असितस्य तैमातस्य बभ्रोरपोदकस्य च । ' या ऋचेंत समाविष्ट झाला आहे.

## सुमेरी कथा.

Marduk the son of Ea, the God of lower Earth

मर्डुक हा इआ या पृथ्वी देवतेचा मुलगा होता.

Marduk then created the Earth and the green herbs and cattle and the beasts of the field and creeping things and men.

मर्डुकनें मग पृथ्वी, तिच्यावरील वनस्पति, चतुष्पाद, सरीसृप व मनुष्यें निर्माण केलीं.

परंतु इंद्राचा जन्म होण्यापूर्वीं—

When in the height heaven was not named
And the Earth beneath did not yet bear a name.
Chaos ruled, its waters were mingled together
Then were created the Gods. ( all of them ).

तथापि मूळच्या तमोऽव्रत पाण्यांत—

There were Apsu the primeval who begot them
And chaos, the mother of them.
Who was the great Dragon
Taimat was the great Dragon.
Fifty Kasbus is his length and one Kasbu his breadth
And he wallowed in the water and lashed his tail.

पूर्वीं अप्सु व तैमात हे दोघे अस्तित्वांत होते. तैमात हा महाभयंकर सर्प होता. त्याची लांबी ५० कस्बू होती. ( कस्बू म्हणजे दोन तासांत चालून जातां येईल इतकें अंतर ) व रुंदी १ कस्बू होती. तो पाण्यावर अधिष्ठित झाला असून त्यावर आपलें शेंपूट जोरानें आपटीत होता.

यानंतर तैमातच्या भीतीनें सर्वांची उडालेली गाळण कवि वर्णितो:—

The cities sighed and groaned aloud
And men uttered lamentations.
The God Anu was unable to go against her
Nudimmud was afraid and turned back.

सर्व लोक दुःखानें गांजून जाऊन शोकोद्गार काढावयास लागले. प्रत्यक्ष अनु देवहि तैमातसमोर जाऊं शकला नाही व नुदिम्मद देव भीतीनें पळून आला.

देव म्हणाले:—

Oh Marduk, thou art our avenger
We give thee sovereignty over the whole world.
Thou art chiefest among the great Gods.

हे मर्डुक, आमच्या अपमानाचा सूड उगव. आम्हीं तुला सर्व जगाचें साम्राज्य देतों. सर्व देवांचा तूंच राजा आहेस.

याप्रमाणें देवांनीं प्रार्थना करून मर्डुकची तैमातशीं लढण्याकरितां सेनापतिस्थानीं नेमणूक केल्यावर मर्डुकनें युद्धासाठीं शस्त्रधारणादि तयारी केली:—

He made ready the bow, he girded his weapon upon him,
He slung a spear upon him and fastened it,
The bow and quiver he hung at his side,
He set the lightening in front of him,
Then the Lord raised the thunder bolt, his mighty weapon.

त्यानें आपलें धनुष्य तयार केलें व शस्त्रें धारण केलीं. त्यानें आपल्या खांद्यावर भाला घेतला. धनुष्य व बाणांचा भाता त्यानें आपल्या बाजूस लटकावला व मग आपलें उग्र व मुख्य शस्त्र जें वज्र तें उगारलें.

नंतर—

He mounted the chariot an object unequalled for terror
He harnessed four horses and yoked them to it
All ferocious, high of courage and swift of pace
Followed by the seven winds.
Marduk set out for the fight.

मर्डुक आपल्या अप्रतिम अशा भयंकर रथावर आरूढ झाला; त्याने त्या रथाला चार घोडे जोडले. ते सर्व भयंकर, तडफांचे, तेजस्वी व अत्यंत चपल होते. मर्डुकने आपल्या बरोबर सात वायू घेतले होते.

अशा रीतीनें सज्ज होऊन मर्डुक निघाला असतां, त्याला तैमात आणि अप्सु—

Apsu the primeval and chaos,
Taimat their waters mingled together.

पृथ्वीच्या खालीं असलेल्या प्रलयकालीन जलांत आढळले.

याप्रमाणें हे शत्रू एकमेकासमोर आल्याबरोबर तैमातनें—

She uttered loud angry cries,
She was like one possessed, she lost her senses
She trembled and shook to her very foundations.

रागानें मोठी गर्जना केली. पिशाच्चानें आवेशल्याप्रमाणें तैमातचें भान नाहींसे झालें व ती रागानें कंपायमान झाली. व—

She recited an incantation, she pronounced her spell.

तैमातनें मंत्र म्हणून आपली जादू ( माया ) इंद्रावर पसरण्याचा प्रयत्न केला.

मग—

Then advanced Taimat and Marduck,
To the fight they came on, to the battle they drew nigh
And the Gods of the battle cried out for their weapons.

अखेर त्या युद्धांत मर्डुकनें—

He drove in the evil winds & the terrible winds filled her body,

He siezed the spear and broke through her belly,
He severed her parts, he pierced her heart,
He overcame her and cut off her life.
He cast down her body, he stood upon it,
Her might was broken, her force was scattered.



मर्डुक-तैमात युद्ध.

[ यांत तैमात हा ( वेदांत अहि या शब्दानें वर्णिला आहे, त्याप्रमाणें ) मोठा भयंकर सर्प असल्याचें दाखविलें असून मर्डुक हा आपल्या हातांतील वज्रानें त्याचा वध करीत असल्याचा व त्याच्या शरीरावर उभा असल्याचा देखावा दाखविला आहे. ]

आपल्या बरोबर आणलेले वायू तैमातच्या तोंडांत भरून तैमातला बेजार केलें व मग आपल्या शस्त्रानें त्यानें तैमातचें पोट फोडून तिला ठार मारलें, व तिचें शरीर फेंकून देऊन त्यावर तो उभा राहिला. अशा रीतीनें तैमातचें बल त्यानें नष्ट करून टाकलें.

मग—

The lord stood upon Taimat's hinder parts,
With his merciless club, he smashed her skull,
He split her up like a flat fish into two halves,
He bade the waters to come forth.

मग मर्डुक तैमातच्या शरीराच्या मागल्या भागावर उभा राहिला व त्यानें आपल्या गदेनें तैमातचें मस्तक चूर्ण केलें. मग त्यानें तैमातला एखाद्या माशाप्रमाणें चिरून त्याचे दोन तुकडे केले व त्यानें कोंडलेल्या जलांना बाहेर सोडले.

याचबरोबर त्यानें प्रकाशाची मुक्तता केली. कारण किंग हा ग्रंथकार म्हणतोः—

" The creation of light is then recorded, when Taimat was vanquished by Marduck; for he overcame the monster in his character as a solar God.

मर्डुकनें तैमातचा पराभव केल्यावर प्रकाश निर्माण केला, कारण मर्डुकनें प्रकाशाची देवता या नात्यानें हा पराभव केला होता.

यानंतर मर्डुकनें पुनः सर्व सृष्टीची स्थिरप्रतिष्ठा केली.

He created the heavens and formed the Earth,

He made the stations for the great Gods,
The stars, their images and the constellations he fixed.
In the midst thereof he fixed the zenith.
He opened great gates on both sides ( of the firmament ).
For shamsh the Sun God who every day



[ बॅबिलोनचा राजा नबू-पाल-इदिन् हा शम्स या सूर्यदेवाची आराधना करीत असल्याचा देखावा या चित्रांत दाखविला आहे.]

Journeyed from one to the other across the world,
He made this daily journey across the sky in a chariot.



[ या चित्रांत सुमेरिअन सूर्यदेव शम्स हा स्वर्गाच्या पूर्व द्वारांतून प्रवेश करीत असल्याचा देखावा चित्रित केला आहे. ]

त्यानें स्वर्ग व पृथ्वी निर्माण केली, व सर्व देवांचीं निवासस्थानें निश्चित केलीं; त्यानें तारे, ग्रह यांना स्थापलें. त्यानें स्वर्गाला दोन दरवाजे ( दोन बाजूस ) सूर्याला येण्याजाण्यासाठीं ठेवले. त्यांतून रोज रथांत बसून सूर्य पर्यटण करतो.

त्यानंतर—

The moon God he caused to shine forth
He appointed him, a being of the night, to determine the days,
Every month without ceasing, with the crown he covered him,

Saying—

At the beginning of the month
Thou shalt command the horns to determine six days
And on the seventh day to divide the crown.

अशा रीतीनें तैमातला मारून मर्डुकनें सर्व स्थिरस्थावर केल्यामुळें सर्व देवांनीं त्याची स्तुति केलीः—

The Gods addressed Marduk their deliverer by every conceivable name and title of honour. They called him, 'the life of all Gods,' 'the lord of hearing and Mercy,' 'the creator of abundance and Mercy, who establishes plenteousness and increases all that is small.'

याप्रमाणें देवांनीं केलेल्या स्तुतीनें संतुष्ट होऊन मर्डुक अखेर भक्तांना आश्वासनपर आशीर्वचन देतोः—

Towards thy God, thou shalt be pure of heart
For that is the glory of the God head,
Prayer and supplication and bowing low to the earth,
Early in the morning thou shalt offer unto him,
The fear of God begets mercy, offerings increase life.
He that fears the Gods.........shall have a long life.

ईश्वराविषयीं आपल्या अंतःकरणांत शुद्ध भाव ठेवा, कारण तें देवांचें वैभव आहे.

दररोज प्रातः काळीं भक्तिनम्र होऊन तुम्ही देवांची प्रार्थना व स्तुति करा.

देवांची भीति बाळगण्यानें त्यांच्या अंतःकरणांत तुमच्याविषयीं करुणा उत्पन्न होते, व त्यांना दिलेल्या हविर्भागानें आयुर्दाय वाढतो.

जे देवांना भितात, त्यांना दीर्घायुष्यप्राप्ति होईल.

अखेर—

The wise are bidden to ponder on the story, the father is to teach it to his son, and the prince or ruler is to listen to its recital.

With such an ode to Marduk the great poem fitly concludes.

सर्व प्राज्ञजनांनीं या मर्डुकच्या कथेचें मनन करावें, पित्यानें ही कथा आपल्या मुलांस शिकवावी, व राजानें तिचें भक्तीनें श्रवण करावें असें सांगून हें महापुराण समाप्त झालें आहे.

## वैदिक कथा.

उभा पितरामहयन्न जायत द्यावापृथिवी ।

द्यौः ( आकाश ) व पृथिवी या दोन्ही पितरांपासून इंद्र व अग्नि हे उत्पन्न झाले व म्हणून कवि त्यांना म्हणतो,

समानो वां जनिता भ्रातरा युवम् ॥

( तुमचे मातापिता एकच असल्यानें तुम्ही दोघे भाऊ आहांत. )

इंद्रः जनिता दिवो जनिता पृथिव्याः ।

इंद्र हा स्वर्ग व पृथिवीचा जनिता आहे.

( या ठिकाणीं पृथ्वी म्हणजे पृथ्वीवरील वस्तू असा अर्थ आहे. )

इंद्र ओषधीरसनोदहानि वनस्पतीं रसनोदरिक्षम् ।

ज्या इंद्रानें औषधी वनस्पती वगैरे निर्मिल्या.

गिरीरजाँ अपः स्वर्वृषत्वता ( दाधार )

ज्यानें पर्वत, क्षेत्रें, पाणी व स्वर्ग यांना आधार दिला.

तम आसीत्तमसा गूढमग्रे ।
अप्रकेतं सलिलं सर्वमा इदम् ॥

प्रथमारंभीं फक्त अंधःकार सर्वत्र पसरलेला होता व त्या अंधकारानें आवृत असें जल एकमिश्रित झालेलें, एवढेंच कायतें अस्तित्वांत होतें. मग–

कस्विद्गर्भं प्रथमं दध्र आपः ।
यत्र देवा समगच्छन्त विश्वे ॥

त्या जलांत बीजाधान होऊन तेथें सर्व देव एकत्र ( उत्पन्न ) झाले.

वृत्रस्यनिण्यं विचरंति आपः ।
दीर्घं तमः आशयदिंद्रशत्रुः ॥

वृत्राच्या वस्तिस्थानाभोंवतीं पाणी खेळत होतें व तें गाढ अंधकारानें आवृत होतें. तेथें हा इंद्र शत्रु होता.

समप्सुजित् इंद्र सत्पते ।

इंद्र हा अप्सूचा जेता आहे.

अहिं यद् अपो वव्रिवांसम् जघान ।

पाण्याभोंवतीं हा सर्प ( तैमात ) वेष्टन घालून राहिला होता.

अपो वृत्रं वव्रिवांसं पराहन् ॥

पाण्याभोंवतीं वेष्टन घातलेल्या सर्पाचा ( तैमाताचा ) उल्लेख यांत आहे.

अभिप्रदद्रुर्जनयो ।

सर्व लोक पळाले. त्याचप्रमाणें देव भीतीनें पळाले असें वर्णनहि केलेलें आहे.

एवा त्वामिंद्र वज्रिन् विश्वे देवास सुहवास ऊमाः ।

महामुभे रोदसी वृद्धमृष्वं निरेकामि वृणते वृत्रहत्ये ॥

सर्व देव वृत्रापुढें उभे राहण्यास भीत असल्यानें त्यांनी इंद्राला वृत्रहननास पाचारण केलें.

सम्राडन्यो स्वराडन्यो उच्यते वां महांतौ इंद्रा वरुणौ महावसू ।

अस्माकमिंद्रावरुणौ भरेभरे पुरोयोधा भवतं ।

इंद्र राज्ञां त्व माधि राजो भव ।

हे इंद्रा तूं आमचा सम्राट् आहेस. तूं आमचा युद्धांतील मुख्य सेनापति हो. तूं सर्व राजांचा अधिराजा हो.

स उग्रधन्वा प्रतिहिताभिरस्ता । अभ्यक्ता त इंद्र ऋष्टिरस्मै ।

स इषुहस्तैर्निषंगिभिः वशी । शतब्रध्न इषुस्तव ।

शंभर सूर्यांच्या तेजाइतका, हे इंद्रा तुझा बाण दीप्तिमान् आहे.

तक्षन् त्वष्टा वज्रं पुरुहूत द्युमन्तम् । त्वष्टा अस्मै वज्रं स्वर्यं ततक्ष । हस्तावज्रं हिरण्ययम्

त्यानें आपल्या हातांत उग्र धनुष्य धारण केलें, ऋष्टि ( भाला ) घेतला, बाणांचा भाता घेतला व त्याच्यासाठीं त्वष्ट्यानें खास बनविलेलें सोन्याचें चकचकीत वज्र हातांत धारण केलें.

हें वज्र लोखंडाचें असल्याचेंहि कोठें वर्णन आहे.

मह्यं त्वष्टा वज्रमतक्षदायसम् ।

इंद्र म्हणतोः—त्वष्ट्यानें माझ्यासाठीं लोखंडाचें वज्र तयार केलें आहे. त्याला शंभर ठिकाणीं प्रखर धार होती.

वज्रेण शतपर्वणा । अधत्वष्टाते मह उग्रवज्रं । सहस्र भृष्टिं व वृतच्छताश्रिम् ।

तक्षन् रथं सुवृतं विद्मनापः तक्षन् हरी इंद्रवाहा वृषण्वसू ।

रथं हिरण्यवंधुरम् आस्थाथो दिविस्पृशम् ।

तं स्मा रथं मघवन्प्राप सातये जैत्रं यं ते अनुमदाम संगमे ।

आ यस्मिन्हस्ते नर्या मिमिक्षुरा रथे हिरण्यये रथेष्ठाः ।

आ रश्मयो गभस्त्योः स्थूरयोरा ध्वन्नश्वासो वृषणो युजानाः ।

आ त्वां वहंतु हरयो इंद्र त्वासूरचक्षसः ।

आ त्वा मदच्युता हरी श्येनं पक्षेव वक्षतः ।

इह त्या सधमाद्या हरी हिरण्यकेश्या । वायविंद्रश्च सरथं ।

त्वष्ट्यानें इंद्राचा सुंदर रथ घडविला, तसेंच इंद्राला नेण्यासाठीं त्या रथाला जोडण्यासाठीं घोडे निर्माण केले. तो रथ आकाशाला जाऊन पोंचेल असा होता व त्यांतील बसण्याची जागा सुवर्णाची केलेली होती. लढाईत त्या रथांत बसणाराला जयच मिळे तो रथहि सोन्याचा होता. घोड्याचे लगाम सूर्याच्या किरणाप्रमाणें होते. त्या घोड्यांचे डोळे सूर्याप्रमाणें तेजःपुंज होते, त्यांची आयाळ सोन्याची होती. एखादा श्येन पक्षी आपल्या पखांच्या साह्यानें ज्याप्रमाणें अत्यंत जलद गमन करितो, त्याप्रमाणें तो रथ उन्मत्त घोड्यांच्या साह्याने इंद्राला नेतो. त्याच्या बरोबर वायू त्याच रथावर असतात.

अपः वृत्वी रजसो बुध्नमाशयत् ॥

रजोऽवृत अशा पातालांत पाण्याला वेष्टन घालून तो महा सर्प ( वृत्र बसला होता )

वृत्रेण यदहिना बिभ्रदायुधा समस्थिथायुधये शंसमाविदे ।

विश्वे ते अत्र मरुतः सह त्मनावर्धन्नुग्र महिमानमिंद्रियम् ॥

नास्मै विद्युन्न तन्यतुः सिषेध नयां मिहमकिरद्ध्रादुनिं च ।

इंद्रश्च यद्युयुधाते अहिश्च ।

ज्या वेळीं इंद्र व तो महासर्प ( वृत्र ) एकमेकाशीं लढूं लागले, त्या वेळा तो सर्प विद्युल्लता व मोठी गर्जना यांच्या साह्यानें स्वरक्षण करण्याचा प्रयत्न करतो.

अहिमोहानप आशयानम् ।

प्र मायाभिर्मायिनं सक्षदिंद्रः ॥

मायी म्हणजे मायेचा आश्रय करणाऱ्या व पाण्यावर निजलेल्या त्या अहीला इंद्रानें मायेनें पराभूत केलें.

अथ द्यौश्चित्ते अपसानु वज्राद्धितानमद्भियसास्वस्य मन्योः ।

इंद्र व वृत्र यांचें युद्ध इतकें भयंकर व तुमुल झालें कीं, त्यामुळें आकाश, पृथ्वी व इतर सर्व विश्व हालून गेलें.

त्वष्टा चित्तव मन्यव इंद्रं वेविज्यते भिया ।

ज्या त्वष्ट्यानें तें वज्र निर्माण केलें तोहि त्याच्या आघातानें भीतिग्रस्त होऊन मूर्च्छित झाला.

अमीत्वां जहति पुत्र देवाः ।

हे इंद्रा इतर देव तुला सोडून पळून गेले.

विचिद्वृत्रस्य दोधतोवज्रेण शतपर्वणा शिरोबिभेद वृष्णिना ।

वावृधानो मरुत्सखा विवृत्र मैरयत् ।

अयमिंद्रो मरुत्सखा विवृत्रस्याभिनत् शिरः ।

इंद्रानें आपल्या सहस्रधार असलेल्या वज्रानें वृत्राचें मस्तक तोडून टाकलें.

मरुत्सखा ( वायूंचा मित्र ) अशा त्या इंद्रानें वृत्राला आपल्या शस्त्रानें तोडून टाकलें व त्याचें मस्तक छेदलें.

त्वं अप्सुजित् मरुत्वान् इंद्र सत्पते ।

हे इंद्रा मरुतांनीं युक्त होत्साता तूं अप्सूलाहि जिंकलेंस.

त्वं वृत्रं शवसा जघन्वान्सृजः सिंधून् अहिना जग्रसानान् ।

वृत्रं जघन्वानसृजाद्विसिंधून् ।

त्वमिंद्र स्रवितवा अपस्कः परिष्ठिता अहिना ।

वाश्रा इव धेनवः स्यंदमानाः ।

अंजः समुद्रमवजग्मुरापः ॥

हे इंद्रा तूं वृत्राला ठार मारून ( कोंडलेले ) जलप्रवाह मोकळे केलेस. ते प्रवाह त्या महासर्पानें गिळून टाकले होते. याप्रमाणें इंद्रानें मोकळे केलेले जलप्रवाह ज्याप्रमाणें दावें सोडलेलीं वत्सें गायांकडे धांवत जातात, त्याप्रमाणें समुद्राकडे धांवत गेले.

हनो वृत्रं जया स्वः ।

मसानात्वां उतसूर्यं ससानेंद्रः ।

वृत्रम् यदिंद्र शवसावधीरहिम् ।

आदित्सूर्यं दिवि आरोहयः दृशे ॥

जघन्वाँ उ हरिभिः संभृतक्रतो विंद्र वृत्रं मनुषे गातुयन्नपः ।

अयच्छथा बाह्वोर्वज्रमायसं अधारयन्दिव्या सूर्यं दृशे ॥

हे इंद्रा, वृत्राला मारून प्रकाश जिंकून आण.

इंद्रानें ( वृत्राला जिंकून ) सूर्यहि परत मिळवून आणला.

ज्या वेळेस इंद्रानें वृत्राला मारलें, त्यावेळीं त्या लोकांना दिसण्यासाठीं सूर्याची आकाशांत स्थापना केली.

यः पृथिवीं व्यथमानामदृंहत् ।

यः पर्वतान् प्रकुपिता नरम्णात् ॥

योऽन्तरिक्षं विवमे वरीयो ।

यो द्यामस्तभ्नात् स जनास इंद्रः ॥

यः सूर्यं उषसं जजान ।

त्वं सूर्यं तेजोभिर्दीपयः ।

सूर्यं धारितवानसि ।

यदा सूर्यममुं दिवि शुक्रं ज्योतिरधारयः ।

इंद्रानें, कंपायमान होणाऱ्या पृथिवीला स्थिर केली, कोपलेल्या पर्वतांना शांत केलें. त्यानें अंतरिक्षाची व्यवस्थापना केली, व द्यौः ( आकाशाला ) धारण केलें.

त्यानें सूर्याला व उषेला निर्माण केलें.

त्यानें सूर्याला व शुक्राच्या ताऱ्याला उत्पन्न केलें.

षडस्तम्ना विष्टिरः ।

त्यानें सहा दिशा निश्चित केल्या.

दिशः सूर्यो न मिनाति प्रदिष्टाः ।

सूर्याला दिशा नेमून दिल्या.

मासां विधान मदधा अधिद्यवि त्वया विभिन्नम् ।

तूं महिन्यांची व्यवस्था करून दिलीस

त्वं चकर्थ मनवे स्योनान्पथो देवत्रांजसेव यानान् ।

देवांचा मार्ग तूं मोकळा करून दिलास.



[ सुमेरिआंतलि ऊर नांवाच्या शहरचा राजा ऊरगुर हा सिन् या चंद्रदेवतेची आराधना करीत असल्याचें चित्र दाखविलें आहे. ( याचा काल खि. पू. २५०० च्या पूर्वीचा आहे. ) ]

विश्वे देवासो अधवृण्यानि तेऽवर्धयन् सोमवत्या वचस्यया ।

भूरि पक्षेभिर्वचनेभिर्ऋक्वभिः ।

सख्येभिः सख्यानि प्रवोचत ॥

त्वं सुराणां प्रवरः ।

नत्वा आवामन्यो अमृत त्वदस्ति ।

महो दिवः पृथिव्याश्च सम्राट् ।

संजग्मिरे पथ्याः ३ रायोऽस्मिन् समुद्रे न सिधवो यादमानाः ।

सर्व देवांनीं अनेक भक्तियुक्त ऋचांनीं प्रेमानें त्याची स्तुति केली. ' तूं सर्व देवांत श्रेष्ठ आहेस, आमच्यांत तुझ्यासारखा दुसरा ( श्रेष्ठ ) कोणीहि नाहीं, तूं मोठ्या स्वर्गाचा व पृथ्वीचा सम्राट आहेस, ज्याप्रमाणें सर्व नद्या समुद्राला मिळतात, त्याप्रमाणें संपत्तीचे सर्व मार्ग तुझ्या ठिकाणीं एकत्र होतात, ' इत्यादि प्रकारें देवांनीं त्याची स्तुति केली.

फार काय, पण—

अत्राह ते हरिवस्ता उ देवी रवोभिरिंद्र स्तवंतः स्वसारः ।

अहीच्या तडाक्यांतून मुक्त आलेले स्वर्गंगांचे प्रवाहहि इंद्राचा स्तुतिपाठ गाऊं लागले.

अहं दां गृणते पूर्व्यं वस्वहं ब्रह्म कृणवं मह्यं वर्धनम् ।
अहं भुवः यजमानस्य चोदितायज्वनः साक्षि विश्वस्मिन् भरे ॥
अहं तदासु धारयन् यदासु न देवश्चन त्वष्टा धारय द्रुशत् ।
अहं भुवं यजमानस्य राजनि प्रयद्भरे तुजये न प्रियाधृषे ॥

माझी भक्ति करणाराला मी द्रव्य, ज्ञान, पराक्रम, आयुष्य वगैरे सर्व देतो. असे या सूक्तांत इंद्रानें सांगितलें आहे.

यो रध्रस्य चोदिता यो ब्रह्मणो नाधमानस्य कीरेः ।
श्रदस्मैधत्त स जनास इंद्रः ॥

जो समृद्धाला व स्तुति करणाऱ्या भक्ताला धन देतो, त्या इंद्रावर श्रद्धा ठेवा.

यः पचन्तं यः शंसतं यः शशमानमूति ।
यस्य ब्रह्मवर्धनं ॥

जो इंद्र हविर्भाग देणारांचें व प्रार्थना व स्तुति करणाराचें संरक्षण करितो.

यः सुवन्ते पचते दुध्र आचिद्वाजं दर्दर्षि स किलासि सत्यः ।
वयं त इंद्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमावदेम ॥

हे इंद्रा, तूं प्रार्थना करणारांना व हवि देणारांना बल देतोस. तो तूं सत्य आहेस हें निश्चित आहे. म्हणून आम्ही आशा करितों कीं आम्ही तुला सर्वदा प्रिय असावें व आमच्या वीरपुत्रपौत्रासह तुझीं स्तोत्रें गात रहावें.

अशा प्रकारच्या या अद्भुतरम्य सुमेरी व आर्य इंद्रकथांत अत्यंत विलक्षण साम्य आहे, हें आतांपर्यंत आपण अवलोकिलें आहे. हिंदुस्थानांत वेद हे फार प्राचीन काळापासून मुखोद्गत करण्याचा व परंपरेनें स्वरवर्णाक्षराचाहि फरक न होतां जसेच्या तसे संक्रमित होण्याचा परिपाठ असल्यानें त्यांचें प्राचीनतमरूप आज आहे तसेंच होतें. सुमेरी कथांच्या इष्टिकालेखनालाहि सुमेरियन दंतकथांचा अत्यंत प्राचीन आधार आहे. किंग म्हणतो:—To what date we are to assign the beginning of Sumerian influence in Babylonia, it is quite impossible to say: though such a date as six or seven thousand years before christ is not an extravagent estimate for the foundation of the earliest religious centres in the country.

( बॅबिलोनमध्यें सुमेरिअन् संस्कृतीचा जो पगडा आहे, त्याचा आरंभ निश्चित रीतीनें कधीं झाला हें सांगणें जरी अशक्य आहे, तरी ख्रिस्तापूर्वी सहा सात हजार वर्षांपूर्वी सुमेरी संस्कृतीचा आद्यकाल नेणें म्हणजे कांहीं अत्युक्ति होणार नाहीं. )

अर्थात् खिस्तपूर्व सहा सात हजार वर्षांपूर्वीचा काळ हाच पुनर्वसूत वसंतसंपात असल्याचा प्राचीन काळ असल्याबद्दल ऋग्वेदांतील संदर्भ दाखवितात. तेव्हां अर्थात् या कालसाम्यानें दोन्ही वाङ्मयांतील इंद्रकथेंत वर वर्णन केलेलें वृत्तसाम्य सहज प्रतीत होतें. केवळ व्यापारादि दळणवळणानें असें विलक्षण साम्य येणें अशक्य आहे; एकाच ठिकाणीं वास करीत असलेल्या एकजातीय समाजामुळेंच त्यांच्या नंतर विभागलेल्या भागांत तें येऊं शकलें. या दृष्टीनें बॅबिलोनिअन् लोकांचे पूर्वगामी सुमेरी आर्य व वेदांतील भारतीय आर्य हे एकच होते व ते एकाच ठिकाणीं रहात असले पाहिजेत हे अनुमान सहज निघतें. तथापि हें विधान केवळ अनुमाननिष्ठच न ठेवितां त्याचा प्रत्यक्षात्मक पुरावा आपल्याला मिळाला असतां आपलें विवेचन निश्चयात्मक होईल, म्हणून वरील कथेंत तसा पुरावा काय मिळतो याचें आतां आपण परीक्षण करूं.

वृत्रहननाच्या कथेला वैदिक वाङ्मयांत इतकें विलक्षण महत्त्व दिलेलें आढळतें कीं तिच्या तुलनेलाहि दुसऱ्या कोणत्या कथा राहूं शकत नाहींत. यावरून तो प्रसंग म्हणजे वैदिक ऋषींना अत्यंत महत्त्वाचा वाटत होता हें उघड आहे, व म्हणून त्याचा खरा अर्थ आपण लक्षांत घेतला पाहिजे. आतां प्रथमारंभीं ही कथा म्हणजे एक तर यथोक्ति आहे अथवा रूपक आहे, असे तिच्या अर्थाचे दोन भाग पडतात. त्यांपैकीं पहिली कल्पना कथेवरूनच उघड उघड असंभाव्य ठरते. इंद्र म्हणून कोणी तरी आर्यांचा प्राचीन वीरपुरुष असेल व त्यानें वृत्रासारख्या एखाद्या आर्यशत्रूला मारलें



[ एदिन् ( सिंधुनदप्रांत ) चा राजा हर्यश्व याचा मुख्य प्रधान मुद्गल याची अधिकारमुद्रा. ( काल खि. पू. ३१०० वर्षे ) अशाच प्रकारचा एक शिक्का सुमेरियांतही सांपडला आहे. त्यांत मुद्गल असें नांव आहे. ]

असेल व त्यामुळें त्याचा अपूर्व गौरव या कथारूपानें केला असेल हें मानणें, त्यांतील ऋतुमानविषयक उल्लेखांवरून अशक्य आहे. अर्थात् हें एक रूपक आहे, असें निष्पन्न होतें. तर मग या रूपकाचा अर्थ काय? या प्रश्नाचें उत्तर खि. पू. १००० च्या सुमारास झालेल्या निरुक्तकार यास्काचार्यांपासून तों तहत आतांपर्यंत, देण्याचा प्रयत्न

अनेकांनीं अनेक रीतींनें केला आहे. यास्काचार्य स्वतः म्हणतात, " हा वृत्र म्हणजे कोण आहे ? नैरुक्त म्हणतात, तो मेघ आहे, ऐतिहासिक लोक म्हणतात, तो एक असुर होय मंत्र व ब्राह्मण यांत तो एक महासर्प आहे असें म्हटलें आहे. आकाशस्थ जल व विद्युल्लता यांचे मिश्रणाचा जो परिणाम तो लक्षणेनें या कथेंत वर्णिला आहे. " वरील मतांपैकी ऐतिहासिकांचें मत चुकीचें आहे. तेव्हां यास्कांनीं दिलेला खुलासा बरोबर आहे किंवा नाहीं तें आतां पाहिले पाहिजे. या एकंदर रूपकाचें परीक्षण लो० टिळकांनीं आपल्या Arctic home in the Vedas या ग्रंथाच्या ' The captive waters ' या प्रकरणांत केलें आहे. ते म्हणतात, वृत्रयुद्धविषयक एकंदर वैदिक वाङ्मय तपासतां वृत्राशीं झालेल्या इंद्राच्या युद्धाचे जे मुख्य परिणाम झालेले आढळून येतात, त्यांत इंद्रानें वृत्राला मारून जलांची मुक्तता केली हा जसा परिणाम वर्णिला आहे, त्याचप्रमाणे प्रकाशाची मुक्तता हाहि दुसरा परिणाम वर्णिला आहे. पहिला परिणाम हा यास्काचार्यांनीं विचारांत घेतला. हिंदुस्थानचें ऋतुमान एका विशेष प्रकारचें आहे. येथील वर्षाचे साधारणतः उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे तीनच भाग पडतात. त्यापैकीं उन्हाळ्यांत भयंकर उष्मा होऊन देश अगदीं त्रस्त होऊन जातो. अन्न हें पर्जन्यवृष्टीवर अवलंबून असल्यानें व ती पावसाळ्याशिवाय होत नसल्यानें, पावसाकडे लोकांचे डोळे लागून राहिलेले असतात. उन्हाळ्याच्या अखेरीस मेघ येऊं लागतात; परंतु पावसाळ्याच्या तोंडीं जेव्हां त्याच्यांत विद्युल्लता उत्पन्न होऊन गडगडाट होऊन मोठी घनचक्कर होते, तेव्हां कोठें पाऊस पडतो ! अर्थात् मेघांनीं आकाश व्याप्त होऊन सर्वत्र अवर्षण पडतें कीं काय अशी भीति वाटते, त्याच स्थितीचें वर्णन रूपकानें वृत्रानें जल कोंडून ठेवल्याच्या कथेंत केलें आहे, व जेव्हां सोसाट्याचा वारा सुटून, वीज चमकून पाऊस पडतो, तेव्हां जलदेवता जो इंद्र त्यानें मरुतांच्या साह्यानें हातांत विद्युल्लतारूपी वज्र घेऊन वृत्रहनन केलें, असें मानण्याच्या स्वरूपाचा या कथेचा उत्तरार्ध आहे.

परंतु हा खुलासा टिळकांच्या मतें बरोबर नाहीं. प्रतिवर्षी पाऊस हा पडतोच अगदीं अनेक वर्षांनीं एखादे वेळेस अवर्षण पडते, तेव्हांच पाऊस पडण्याचे अपूर्व महत्त्व असेल. शिवाय अवर्षणाच्या वर्षीं अगदीं बिलकूल पाऊस पडत नाहीं, असें थोडेंच होतें ? कमी पडतो, एवढेंच. तेव्हां काही झालें तरी पावसाळ्याच्या आरंभाच्या थोड्या दिवसांच्या तापांतून होणाऱ्या मुक्ततेस इतकें महत्त्व दिलें गेलें असणें शक्य नाहीं. पण हा पराक्रम तर अपूर्व म्हणून वेदांत वर्णिला आहे. किंबहुना महाभारतांत त्याविषयीं असें म्हटलें आहे कीं,

' इंद्रो वृत्रवधेनैव महेंद्रः समपद्यत ।
महेंद्रं प्रग्रहं लेभे लोकानां चेश्वरोऽभवत् ॥

वृत्रवधामुळेंच इंद्राला महेंद्र ही संज्ञा प्राप्त झाली, व त्याबरोबरच तो त्रैलोक्याचा राजा झाला. तेव्हां या उपपत्तीनें हवा तो खुलासा होत नाहीं.

याशिवाय या मेघाच्या उपपत्तीनें हा खुलासा सोडवितांना आणखी एक अड-चण उत्पन्न होते. ती ही कीं इंद्रानें वृत्रवध करून जेव्हां जलप्रवाह मोकळे केले, त्याच-वेळीं त्यानें प्रकाशाची मुक्तता केली, असें वेदांत वर्णन आहे. वृत्राची गुहा पाताळांतील



XI

| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
| | | ŠAR, GAD |
| | | SA, GAL |
| | | KHA ḪA |
| | | BAR |

[वाचनः—सर-गाधी गाल्र-ह-भृगु.
अर्थः—गांधी वंशांतील गालव भृगू ( चा शिक्का. )]

अंधकारयुक्त मिश्रित ( प्रकाशाभावामुळें ज्यांतील प्रवाहभेद दिसून येत नाहीं, अशा स्थितींत ) जलांत होती. ' असूर्ये तमसि ' ' तमसा परिवृतम् ' असें त्या स्थळाचें वर्णन आहे. तेथें इंद्रानें वृत्रास मारलें व त्याबरोबरच जलाचा व प्रकाशाचा मुक्तता केली, हें वर दिलेल्या उताऱ्यांवरून सहज दिसून येईल. आतां प्रतिवर्षाकाळच्या



VII

| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
| | | SAG, ZAG |
| | | ARA |
| | | TUB, DUB |
| | | GA, TU |
| | | AG. ŠA |
| | | DU, (KI) |
| | | AŠ |

[ वाचनः—सगर–डुबू–गु–अगड्ड–अरस.
अर्थः—अगड्डचा ( राजा ) सगर ( याची ) मुद्रा ( ही ) असे. ]

उपपत्तींत प्रकाश व सूर्य लुप्त झाले असण्याचें व पाऊस पडल्याबरोबर ते मुक्त होत असण्याचें कांहींच कारण नाहीं. अर्थात् ही अडचण वादळाच्या कल्पनेनें सुटण्यासारखी नाहीं, व म्हणून जलप्रवाह व प्रकाश हीं दोन्हीं एकाकाळीं बद्ध असून पुढें मुक्त होतील असा खुलासा होईल अशी जी उपपत्ति असेल तीच ग्राह्य मानली पाहिजे.

याशिवायहि आणखी दोन परिणाम वृत्रहननाबरोबर घडून येतात असें वैदिक कथेवरून दिसून येतें. ते परिणाम ( १ ) उषेची प्राप्ति व ( २ ) गाईंची प्राप्ति हे होत. परंतु या ठिकाणीं या विषयाचें सवंध विवेचन करावयाचें नाहीं, कारण मूळ प्रतिपाद्य विषय तो नाहीं. सुमेरी व हिंदी कथांत जितकें साम्य दिसून येत आहे तेवढ्याचें विशदीकरण करण्याचाच ह्या लेखाचा मुख्य हेतु असल्यामुळें वर नमूद केलेल्या शेवटच्या दोन परिणामांसंबंधानें येथें विवेचन करण्याचें कारण नाहीं. म्हणून फक्त पहिल्या दोन परिणामांसंबंधानें पाहूं लागलों. तर हिंदी व सुमेरी दोन्ही कथांत पूर्ण साम्य असल्याचें दिसून येतें. वृत्र मारल्याबरोबर जलप्रवाह मोकळे झाले व सूर्याद्वारा प्रकाशाची प्राप्ति झाली हें जसें भारतीय कथेंत स्पष्ट रीतीनें दिलें आहे, त्याचप्रमाणें तैमातला मारल्याबरोबर मर्डुकनें जल मोकळें केलें व प्रकाशहि मुक्त केला, असें सुमेरी कथेंतहि दिलें आहे. तेव्हां याचा खुलासा कसा होतो तें पाहिलें पाहिजे. या संबंधानें, कै० टिळक यांनीं अशी उपपत्ति बसविली आहे कीं, उत्तरध्रुवापाशीं वस्ति असणाऱ्या लोकांसंबंधानेंच हे चमत्कार वर्णिले आहेत. ख्रि. पू. सुमारें आठ हजार वर्षांपूर्वी उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांतील हवा मनुष्यवस्तीला रहाण्याला लायक अशी होती. त्या ठिकाणीं पृथ्वीभोंवतीं फिरणारा सूर्य आपल्याप्रमाणें एका बाजूच्या क्षितिजावर उगवून डोक्यावरून जाऊन दुसऱ्या बाजूकडे सायंकाळीं मावळतो, असा प्रकार



XII

| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
|  |  | ŠA, ŠAB |
| | | TAR |
| | | ...... |
| | | EDIN-AŠ |

वाचनः—सवितर-एदिन्-अस्स.

अर्थ–एदिन् ( सिंधुनदप्रांत ) चा सविता ( याची मुद्रा ही ) आहे.

घडून येत नसून तो वर्षांतून कांहीं महिने आकाशांतच चक्राकार फिरत रहातो, व इतर महिन्यांतून पृथ्वीखालीं तसाच चक्राकार फिरतो. ज्या महिन्यांत तो आकाशांत वाटोळा फिरतो, त्या महिन्यांत तो दिवसाचे चोवीसहि कलाक दिसत असतो. हल्लींहि नॉर्वेसारख्या उत्तर सीमेवरील प्रदेशांत हा चमत्कार दिसून येतो व म्हणून त्या देशाला Land of the midnight-sun ' मध्य रात्रींच्या सूर्याचा देश ' असें म्हणतात.

याच्या उलट सूर्य ज्या महिन्यांत पृथ्वीखालीं असतो, त्या महिन्यांत सूर्य चोवीस तासांत केव्हांहि दिसत नाहीं. त्या वेळीं तेथें पहांटेच्या प्रकाशासारखा aurora Borealis नांवाचा एक प्रकारचा प्रकाश असतो, व त्यांतच सर्व व्यवहार चालू असतात. ध्रुवाच्या कमीअधिक नजीकपणाच्या मानानें हें महिन्यांचे प्रमाण कमी अधिक असतें तेव्हां ज्या वेळीं महिनेच्या महिने सूर्य दिसूंच शकत नाहीं, व त्याचा स्वच्छ प्रकाश व त्याची जीवनदायी उष्णता उपलब्ध होत नाहीं, त्या वेळेस तत्रस्थ लोकांना त्याची फार खंत वाटूं लागते व त्यासाठीं ते अत्यंत उत्कंठित होतात व अखेर ज्या वेळेस इतके महिने वाट पाहिलेला सूर्य वर येऊं लागतो, त्या वेळेस ते आनंदानें उत्फुल्ल होतात, व सूर्यप्रकाश मिळाल्याबद्दल कवनें करितात. त्याचप्रमाणें जे जलप्रवाह मोकळे केले जातात असे म्हटलें आहे तेहि टिळकांच्या मतें खरे पाण्याचे प्रवाह नसून पृथ्वीगोलाच्या रिकाम्या अवकाशांत जो एक पाण्याच्या वाफेसारखा ( Ether ) सारखा पदार्थ भरून राहिला आहे, त्यालाच तत्कालीन लोकांनीं जल म्हटलें आहे, व हें जल अंधकाररूपी वृत्र कोंडून ठेवितो, खालून वर व वरून खालीं त्याला मोकळेपणानें फिरूं देत नाहीं, अशी त्यांची समजूत झाली होती. तें जल मोकळें झालें, तेव्हां त्याच्याच प्रवाहाबरोबर खालचा सूर्यहि जणूं काय वर ढकलला गेला. अर्थात् हे दोन्ही परिणाम समकालीन होत. तेव्हां टिळकांच्या उपपत्तीप्रमाणें उत्तर ध्रुवदर्शी महिनेच्या महिने टिकणारा अंधकार हाच वृत्र, त्याने कोंडून ठेवलेलें जल म्हणजे अवकाशस्थ ईथर, व वृत्राचा नाश म्हणजे या परिस्थितीचा अंत व त्याचेच परिणाम सूर्याची व प्रकाशाची उपलब्धि आणि जलांची मुक्तता हे होत.

या उपपत्तीला पोषक अशा भारतीय वृत्रकथेला समानार्थक अशीच सुमेरी कथा आहे, तैमात हा सर्प अंधकारमय पाण्यांत होता, तो मारल्यानें ते जल मुक्त झालें व प्रकाशहि मोकळा झाला आणि ' मर्डुकनें तैमातचा हा पराभव प्रकाशाचा देव या नात्यानें केला ' असा जो सुमेरी कथेसंबंधानें किंग या ग्रंथकारानें दिलेला अभिप्राय वर नमूद केला आहे, त्यावरून सुमेरी व हिंदी कथांची एकच उपपत्ति आहे हें सिद्ध होतें.

अशा रीतीनें हिंदी व सुमेरी वाङ्मयांतील ही अद्भुत व रम्य कथा आहे, तिचें विवेचन येथपर्यंत केलें आहे. त्यावरून ' हिंदी-सुमेरी संस्कृति ' या लेखांत केलेल्या विवेचनास पुष्टिच मिळत आहे. या पुढील लेखांत गिल्गमेश या सुमेरी वाङ्मयांतील महाकाव्याचें दिग्दर्शन करणार आहे.

# गिल्गमेश महाकाव्य,

## लेखांक तिसरा.

[ सुमेरी वाङ्मयांतील मर्डुक-तैमातयुद्धाची जवळ जवळ भाषांतर असल्यासारखी वैदिक वाङ्मयांतील इंद्र-वृत्र युद्धाची कथा गेल्या लेखांकांत आम्हीं दिली आहे. आजपर्यंत प्राच्य अथवा पौरस्त्य पंडितांपैकीं कोणालाहि ही कल्पना सुचलेली नाहीं, व म्हणून अर्थातच तिचें विवेचनहि कोणी केलेलें नाही. फक्त लो. टिळकांनीं आपल्या 'Chaldean and Indian Vedas' या लेखांत ही कल्पना 'तैमात' या शब्दाचें विवेचन करितांना सुचविली आहे; परंतु तिचा प्रपंच त्यांनीं पुढें केला नाहीं. त्या सूचनेच्या अनुरोधानें प्रथमतचः आम्हीं त्या दोन्ही वाङ्मयाचें परीक्षण करून या कथेचें तुलनात्मक विस्तृत विवेचन गेल्या अंकांत केलें आहे. ]



मेरीयाचें अत्यंत प्राचीन कीलाकृति लिपीनें कोरलेलें वाङ्मय व भारतीय आर्यांचे आद्यग्रंथ वेद यांच्यांतील उताऱ्यांवरून मर्डुक तैमातयुद्ध व इंद्रवृत्रयुद्ध या दोहोंतील अत्यंत आश्चर्यकारक साम्य मागील लेखांत दाखविलें आहे. या दोन कथांपैकीं सुमेरिअन कथा मागील लेखांत दिल्याप्रमाणें संगतवार रीतीनें विटांवर कोरलेली आहे. पण तत्समानार्थक वैदिक उतारे हे ऋग्वेदांच्या दहाही मंडळांत विखरलेले आहेत. ते अर्थानुसंधानानें काढून कथादृष्ट्या संगतवार रीतीनें जुळवावे लागले. तसे ते जुळवितां, सुमेरिअन कथेशीं ते शब्दशः समानार्थक आहेत असें प्रतीतीला येतें. यानंतर या लेखांत गिल्गमेश या प्राचीन सुमेरी महाकाव्याची कथा वर्णावयाचें योजिलें आहे.

या महाकाव्याचा नायक जो गिल्गमेश, तो सुमेरी वाङ्मयांत अत्यंत प्राचीन कालीं होऊन गेलेला वीरपुरुष म्हणून मानला गेलेला होता. हल्लीं उपलब्ध झालेल्या इष्टिकालेखांच्याहि पूर्वी हल्लींच्या फोनोग्राफच्या बांगड्याप्रमाणें असलेल्या नळकंड्यासारख्या मातीच्या पदार्थांवर गिल्गमेशच्या कथेचें आद्यस्वरूप कोरून ठेवलेलें सापडलें आहे. मॅकेंझी या ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें:—

Like Hercules, Gilgamesh figured chiefly in legendary narrative as a mighty hero. He was of very great antiquity as his exploits

were depicted on cylinder seals of the Sumerian period ( about 4000. B. C. )

( गिल्गमेश हा अत्यंत प्राचीन काळापासून चालत आलेल्या दंतकथांतून वीरपुरुष म्हणून वर्णिलेला आहे व सुमारें खिस्तपूर्व ४००० वर्षांपूर्वींच्या नळकांड्याच्या आकाराच्या शिक्क्यांवर त्याच्या पराक्रमाचें वर्णन कोरून ठेवलेलें आहे. ) या नंतरच्या काळांत तीच कथा विस्तृत स्वरूपानें सपाट विटांवर कोरलेली आहे.

अशाप्रकारच्या या कथेच्या लिखाणाच्या बारा मोठाल्या विटा आहेत. त्यांपैकीं एका विटेचा फोटो प्रत्यक्ष कल्पना येण्याकरितां पुढें दिला आहे

या विटांपैकीं कांहींच्या थोड्याशा भागाचे तुकडे पडून गेलेले आहेत. त्यावरील नष्ट झालेले भाग संदर्भानें जुळविले होते, परंतु हीच कथा आणखीहि इतर विटांवर कोरलेली सांपडल्यानें, ते संदर्भ संगतवार लागले आहेत. हे लेख प्रथम सांपडले, त्या वेळीं त्यावरील लिखाण अर्थातच अगदीं अज्ञात होतें. तें उकलण्याचें श्रेय मुख्यतः जॉर्ज स्मिथ या इंग्रज गृहस्थास आहे. हा लिपिवाचनाचा प्रकार अद्भुत असल्यानें, तो थोडा विस्ताराने वर्णन केल्यास मनोरंजक वाटेल, असें वाटल्यावरून तो देत आहे.



सुमेरी कीललिपि कोरलेली एक वीट.
अशा विटांवरच सर्व सुमेरी वाङ्मय कोरलें आहे

जॉर्ज स्मिथ हा एका लोहाराचा मुलगा असून त्याचा जन्म सन १८४० सालीं

केल्सी गांवीं झाला होता. त्याच्या घरची स्थिति अगदीं गरीबीची होती. चौदा वर्षांच्या वयाचा तो झाल्यावर, त्याच्या बापानें त्याला एका खोदकाम करणाऱ्या कारागिराच्या हाताखालीं उमेदवार म्हणून काम शिकण्यासाठीं ठेवला. मूळापासून ह्या मुलगा फार चौकस व बुद्धिमान् होता. त्याच सुमारास मेसापोटेमियांतील उत्खनन चालूं होतें व त्याच्या हकीगती वेळोवेळीं प्रसिद्ध करण्यांत येत होत्या. त्यांकडे स्मिथचें लक्ष कुतूहलपूर्वक वेधलें गेलें. मेसापोटेमियांतून खणून काढलेले अवशेष लंडन येथील ब्रिटिश म्यूझियम् मध्यें आणून ठेविले जात होते. तेथें दररोज जाऊन तो तासचे तास ते तपासण्यांत घालवी. या त्याच्या कृत्यामुळें मेसापोटेमियांतील खननकार्याचे सुपरिंटेंडेंट सर हेन्री रॉलिन्सन् यांच्या नजरेस तो आला. त्यावरून त्याच्या विषयीं चौकशी करितां, रॉलिन्सन् यांचा ग्रह स्मिथविषयीं इतका अनुकूल झाला की, त्यांनी त्याला आपल्या अभ्यासाच्या खास खोलींत बसून सुमेरी लिखाणाचा अभ्यास करण्याची परवानगी दिली. त्याबरोबर स्मिथचा अभ्यास जोरानें चालूं झाला व केवळ आपल्या अक्कलेनें त्यानें त्या लिखाणाची गुरुकिल्ली शोधून काढली. त्यामुळें सन १८६७ सालीं ब्रिटिश म्यूझिअम्च्या असीरिअन विभागावर सुपरिंटेंडेंट म्हणून त्याची नेमणूक करण्यांत आली. त्यानंतर थोड्या काळांतच मेसापोटेमियांतून सुमेरी वाङ्मयांतील महाप्रलयाच्या दंतकथा कोरलेल्या विटा लंडन येथें पाठविण्यांत आल्या होत्या, त्यावरील लिखाण त्यानें उकलून वाचलें. या त्याच्या हुशारीवरून " डेली टेलिग्राफ " या वर्तमानपत्राचा त्या वेळचा संपादक प्रख्यात कवि व वाङ्मयसेवक सर एड्विन आर्नोल्ड यानें आपल्या वर्तमानपत्राच्या खर्चानें त्याला अधिक संशोधन करण्यासाठीं मेसापोटेमियांत पाठविलें. याप्रमाणें तो सन १८७३ त तेथें गेला असतां, त्यानें असंख्य लिखाणें संपादन केलीं. पुढल्या वर्षी पुन्हां त्यानें एक वेळा याच कार्यासाठीं प्रवास केला. याच कार्यासाठीं त्याची शेवटची सफर सन १८७६ मध्यें केली गेली, व याच सफरींतून परत येत असतांना त्याला दीर्घ तापाचा विकार होऊन, वयाच्या ३६ व्या वर्षी अलेप्पो शहरीं त्याचा अंत झाला! अर्थात् त्याचे कार्य अनेक युरोपिअन देशांतील संशोधकांनीं पुढें चालविलें; तथापि त्या सर्वांचा अग्रणी होण्याचा मान स्मिथलाच आहे!

या लिखाणांतील मजकुराला इतरत्र मिळालेल्या प्रत्यंतरी पुराव्यावरून, पाश्चात्य संशोधकांनीं मेसापोटेमियांतील निरनिराळ्या वंशांच्या कारकीर्दीचे काळ आतां खालील प्रमाणें निश्चित केले आहेत. ते ध्यानांत ठेवणें अवश्य आहे; कारण त्या निश्चित काळावरून तत्सदृश संस्कृतिदर्शक कल्पना असलेल्या भारतीय संस्कृतीच्या टप्प्यांचे काळ ठरवितां येतात. अर्थात् भारतीय वेदांचा काळ ठरविण्याची ही एक पद्धत आहे; तिच्या शिवाय स्वतंत्र रीतीनें त्यांचा काळ लो. टिळकांनीं संपात गतीवरून ठरविला आहे, हें प्रसिद्धच आहे. परंतु पाश्चात्यांना निश्चित रीतीनें कबूल झालेल्या काळ निर्णयावरूनहि तोच सिद्धांत निघतो, असें दाखविल्यानें अर्थातच त्या निर्णयाला अधिक बळकटी येते. यासाठीं सुमेरियन् काळनिर्णय देत आहों.

( १ ) सुमेरिअन वाङ्मय काळ खिस्तपूर्व ६००० ते ३००० पर्यंत
( २ ) बॅबिलोनिअन् साम्राज्याचा काळ. खि. पू. ३०००–१७५० पर्यंत
( ३ ) असीरियन् वर्चस्वाचा काळ खि. पू. १७५० ते ७००
( ४ ) पर्शिअन् साम्राज्याचा काळ. खि. पू. ७०० नंतर—

हें कालखंड स्थूलमानानें भारतीय वाङ्मयसंस्कृतीचे पडतात, हेंहि साम्य अत्यंत आश्चर्यकारक आहे. ते असेः—

१ ऋग्वेद पूर्वकाल व ऋग्वेदकाल खि. पू. ६००० ते ३०००
२ यजुर्वेदकाल व ब्राह्मण ग्रंथकाल खि. पू. ३००० ते १५००
३ उपनिषत्काल व वेदांगकाल खि. पू. १५०० ते ७००
४ शिशुनाग वंशापासूनचा ऐतिहासिक काळ खि. पू. ७०० नंतर—

या सुमेरिअन् कालखंडापैकीं अगदीं पहिल्याच कालखंडांतीहि प्राचीन काळीं म्हणजे सुमारें खिस्तपूर्व ८००० पूर्वीच्या लिखाणांत गिल्गमेशची कथा वर्णिली आहे, ती येणेंप्रमाणेंः—

फार प्राचीन काळीं सुमेरिया देशात इरेक नांवाचें शहर होतें. तें मोठ्या भर-भराटीच्या स्थितींत होतें. एके दिवशीं रात्रीं त्या शहराच्या पहारेकऱ्यांना एक मूल टाकून दिलेलें सांपडलें. तेव्हां त्या पहारेकऱ्यांनीं तें उचलून दूर फेंकून दिलें. परंतु तें जमिनीवर दूर जाऊन पडण्यापूर्वीच आकाशांतून एका गरुड पक्ष्यानें भरारी मारून तें आपल्या पाठीवर झेलून धरलें व नंतर त्याला नेऊन अलगद जमीनीवर ठेवलें. हाच मुलगा गिल्गमेश होय, तो मोठा पराक्रमी झाला. इरेक शहराच्या पहारेकऱ्यांनी त्याला फेंकून दिल्याची हकीगत त्याला पुढें समजली, व त्यावरून इरेक विरुद्ध त्यांच्या अंतःकरणांत वैराग्नि उत्पन्न झाला. पुढें त्यानें आपल्या पराक्रमानें साथीदार मिळवून शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन इरेक शहराला वेढा घातला. त्याचा घोर परिणाम इरेक शहरांतील पशु, पक्षी, मनुष्यें व देव या सर्वांना जाचूं लागला, ते सर्व हैराण झाले. कवि म्हणतो, त्यावेळीः—

" The she-asses tread down their young
Cows turn upon their calves
Men cry aloud like beasts
And maidens mourn like doves
The Gods of strong-walled Erech
Are changed to flies, and buzz about the street
The spirits of strong-walled Erech
Are changed to serpents and glide into holes.
For three years the enemy besieged Erech
And the doors were barred and the bolts were shot.
And the Goddess Istar did not raise her head against the foe.

**भाषांतरः**—गर्दभी आपल्या वत्सांना तुडवूं लागल्या, गाई आपल्या पाडसांना

लाथाडूं लागल्या. मनुष्यें गुरांप्रमाणें ओरडूं लागलीं, व कुमारिका पक्ष्यांप्रमाणें केविलवाण्या होऊन गेल्या. इरेकच्या भरभक्कम प्राकारांचें संरक्षण करणाऱ्या देवता या माशा होऊन इकडून तिकडे भणभण करीत फिरूं लागल्या. त्या शहरांतील रक्षक यक्षगंधर्व वैगरे सर्प होऊन बिळांत जाऊन लपूं लागले. अशा तऱ्हेनें सर्वत्र हाहाःकार उडाला. तो वेढा तीन वर्षेपर्यंत चालू होता, तोंपर्यंत त्या शहराचे सर्व दरवाजे बंद केले होते. फार काय, पण इश्तर देवीच्यानेंहि डोकें वर करवलें नाहीं.

या ठिकाणीं रामायणांतील युद्धकांडांतील लंकेच्या वेढ्याचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं:—

**रुद्धां तु नगरीं श्रुत्वा जातक्रोधो निशाचरः ।**
**विधानं द्विगुणं कृत्वा प्रासादं चाप्यरोहत ॥**
**स ददर्शावृतां लंकां सशैलवनकाननाम् ।**
**असंख्येयैर्हरिगणैः सर्वतो युद्धकांक्षिभिः ॥**
**राक्षसा विस्मयं जग्मुः त्रासं जग्मुस्तथापरे ।**
**कृत्स्नं हि कपिभिर्व्याप्तं प्राकारपरिखांतरम् ॥**
**ददृशू राक्षसा दीना प्राकारं वानरीकृतम् ।**
**हाहाःकारमकुर्वन्त राक्षसा भयमागताः ॥**

**अर्थः**—लंका नगरीला वेढा दिलेला ऐकून लंकापति रावण दुप्पट बंदोबस्त करून लंकेच्या तटावर चढला, तों त्याला असें दिसलें कीं, पर्वत, वन, कानन इत्यादींनीं युक्त अशी ती लंकानगरी सर्व बाजूंनीं युद्धतत्पर अशा असंख्य वानरांनीं वेढिलेली आहे. नगरींतील कित्येक राक्षस विस्मित होऊन गेले आहेत, तर दुसरे कित्येक अगदीं त्रस्त झाले आहेत. तटाभोंवतीं सर्वत्र वानरांचा गराडा पडलेला पाहून सर्व राक्षस अगदीं दीन होऊन गेलेले व हाहाःकार करीत असलेले दिसले.

याप्रमाणें तीन वर्षें वेढा देऊन गिल्गमेश यानें इरेक शहर हस्तगत केलें. व त्यावर तो राज्य करूं लागला. परंतु इरेकच्या प्रजेनें त्याच्या वर्चस्वापासून आपली मोकळीक करून घेण्यासाठीं रात्रंदिवस स्वर्गस्थ देवांची प्रार्थना आरंभली. तेव्हां अरुरु देवतेनें प्रसन्न होऊन त्यांना वर दिला व गिल्गमेशाला प्रतिस्पर्धी उत्पन्न करण्याचें त्यांना आश्वासन दिलें. तें पूर्ण करण्यासाठीं अरुरु देवतेनें आपले हात पाण्यानें स्वच्छ धुवून त्या हातांनीं जवळ पडलेल्या विटेचा एक तुकडा मोडून दूर टाकून दिला, त्यापासून **इआ-बनी** नांवाचा एक विचित्र पुरुष उत्पन्न झाला. विचित्र म्हणण्याचें कारण कीं, त्याचें शरीर सर्वस्वीं मनुष्याचें नव्हतें. त्याचें मस्तक, कमरेपर्यंतचें शरीर व हात हे मनुष्याचे होते; पण कमरेखालचा भाग पशूचा होता. इआ-बनीच्या शरीराचें वर्णन त्या काव्यांत खालीलप्रमाणें दिलें आहे:—

The whole of his body was covered with hair,
He was clothed with long hair like a woman
The quality of his hair was luxuriant like a Corn-God

He knew not the land and the inhabitants thereof.
He was clothed with garments as the God of the field.
With the gazelles he ate herbs
With the beasts he slaked his thirst
With the creatures of the water his heart rejoiced.

**भाषांतरः**—त्याचें सर्व शरीर केसांनीं भरलेलें होतें, व ते केस लांबसडक व दाट होते. तो जेथें उत्पन्न झाला तेथील लोकांविषयीं अथवा त्या प्रदेशाविषयीं तो पूर्ण अजाणता होता. तो हरणाबरोबर गवत खात असे, व त्यांच्याच बरोबर आपली तृषा शमन करीत असे, व जलस्थ प्राण्यांबरोबर क्रीडा करून तो मजा करीत असे.

लवकरच आपल्याला इआ-बनी हा अत्यंत बलवान् प्रतिस्पर्धी, निर्माण झाल्याची हकीगत गिल्गमेशला समजली, त्यावरून त्यानें सैदु नांवाच्या आपल्या जवळील एका शिकाऱ्याला इआ-बनीला पकडून आणण्यासाठीं पाठविलें. इरेक शहरच्या अधिष्ठात्या देवतेच्या मनांत इआ-बनीनें गिल्गमेशीं युद्ध करण्यासाठीं यावें असें होतें, परंतु गिल्गमेशनें आधींच सावध होऊन त्यांना चकित करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें सैदू हा शिकारी इआ-बनी रहात होता त्या डोंगरांत जाऊन दबा धरून बसला. तेथें राहून, इआ-बनी हा तीन दिवस दररोज ओढ्यावर पाणी पिण्यास जात असे, तें तो पहात असे; परंतु इआ-बनी आपल्यापेक्षां सामर्थ्यानें फार जबरदस्त असल्याची सैदूची खात्री झाल्यानें त्याला पकडण्याची त्याची हिंमत होईना. तेव्हां तो इरेक शहरीं परत आला व त्यानें गिल्गमेशला सर्व हकीकत निवेदन केली. इआ-बनीला पहातांच आपली स्वतःची भीतीनें कशी गाळण उडाली व त्याला पकडण्यासाठीं आपण ठेवलेल्या सर्व चापांचा व युक्त्यांचा त्यानें कसा नाश केला, हेंहि सांगितलें. सैदु म्हणालाः—

He rangeth over all the mountains.
Regularly with the beast he feedeth
Regularly his feet are set towards the drinking place
But I was afraid. I could not approach him.
He hath filled up the pit which I digged
He hath destroyed the nets which I spread
He hath caused the cattle and the beasts of the field
To escape from my hands:
And he doth not let me make war upon him.

**अर्थ**—इआ-बनी सर्व पर्वतभर भटकतो; नित्यनेमानें इतर पशूंबरोबर तो चरतो, व त्यांच्याच बरोबर पाणी पिण्यास जातो. तथापि माझ्यानें त्याच्या जवळ जाववेना. त्याला पकडण्यासाठीं मी खाडा खणला तो त्यानें भरून काढला, व जाळें पसरलें, तें त्यानें तोडून टाकलें. रानांतील सर्व जनावरें त्यानें माझ्या तावडींतून सोडवून नेलीं, व तो आपल्यावर मला हल्ला करून देत नाहीं.

ही हकीगत ऐकूनहि गिल्गमेश निराश झाला नाहीं. त्यानें इआ-बनीला

पकडण्याची दुसरीच एक युक्ति काढली. तो म्हणाला " इश्तर देवतेच्या देवळांत त्या देवीला वाहिलेल्या भाविणींपैकीं उखात नांवाची एक सुंदर स्त्री आहे, तिला बरोबर घेऊन तूं इआ-बनीकडे जा, ज्या वेळेस इआ-बनी पाणी पिण्यास जाईल, त्या वेळेस उखातनें आपलीं सर्व वस्त्रें सोडून टाकावीं व नग्न होऊन तिनें इआ-बनीसमोर हावभाव करून नर्तन करावें. असें करतांच इआ-बनीचें चित्त एकदम आकर्षिलें जाईल व मग इआ-बनीचे सर्व वनचर मित्र त्याचा त्याग करतील ! " गिल्गमेशच्या या आज्ञेप्रमाणें सैदूनें केलें. तीन दिवसांचा प्रवास केल्यानंतर सैदु शिकारी व उखात असे इआ-बनीच्या निवासस्थानीं येऊन पोहोचले. नित्यक्रमाप्रमाणें इआ-बनी पाणी पिण्यास जातांना दिसल्याबरोबर सैदूनें उखातला सांगितलें " उखात, ती पहा इआ-बनी. आतां त्वरकर त्याच्या जवळ जा, आणि आपलीं वस्त्रें सोडून टाक. मनांत लज्जा अथवा भीति बाळगूं नकोस. तुला पाहिल्याबरोबर इआ-बनी तुझ्याकडे धांवत येईल. तेव्हां आपलें उत्तरीयहि टाकून देऊन त्याला आलिंगन दे व त्याला स्त्रीधर्मानें तृप्त कर. " उखातनें या अनुज्ञेप्रमाणें केलें. कवि म्हणतोः—

Ukhat loosened her garments, she uncovered her nakedness.
She was not faint-hearted and she laid hold upon her soul
She opened her garments and danced before him; and he lay in her arms
She gave him pleasure after the manner of women.
For six days and six nights Ea-bani drew nigh and tarried with Ukhat
After he had satisfied himself with her abundance,
He turned his attention to his cattle.
His gazells lay, and looked at Ea-bani
The beasts of the field turned away from him.

अर्थः—उखातने आपलें वस्त्र सोडलें, व शरीर अनावृत केलें. ती लाजली नाहीं अथवा भ्याली नाहीं. उलट त्याच्यावर तिनें आपला पगडा बसविला, नंतर त्याला तिनें आलिंगन देऊन स्त्रीधर्मानें मुदित केलें. याप्रमाणें सहा दिवस व सहा रात्रीं त्यानें तिच्या सहवासांत घालविल्या व मग तो आपल्या वनचर मित्रांकडे वळला. तों काय ! त्याच्या पूर्वसहवासांतील हरणें त्याच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहीनात ! यामुळे इआ-बनी विस्मित झाला, परंतु त्या सुंदर स्त्रीच्या मोहांत अडकून तो तन्मुखासक्तदृष्टि झाला. तेव्हां उखात प्रेमळपणानें इआ-बनीला म्हणाली " महाराज, आपण इतके पराक्रमी पुरुष असून अशा रानावनांत कां भटकत फिरतां ? चला आपण अनु व इश्तर देवांनीं अधिष्ठित अशा इरेक शहरांत जाऊं. तेथें गिल्गमेश या पुरुषर्षभाचा (who is like a mountain bull) भव्य राजवाडा आहे, त्यांत जाऊन आपण सुखानें राहूं. " हें तिचें वचन ऐकून इआ-बनी संतुष्ट झाला. तो कोणाच्या तरी प्रेमासाठीं खंती झालाच होता, तेव्हां तो तिला म्हणाला, " चल उखात, चल.

हरेक, शहरांतील गिल्गमेश या पुरुषश्रेष्ठाच्या राजवाड्यांत मला तूं आपल्याबरोबर घेऊन चल. "

ही कथा वाचली असतां दशरथाच्या वाजिमेध यज्ञासाठीं ( या यज्ञाचे पुत्र-कामेष्ठि असें नांव लौकिकव्यवहारांत प्रसिद्ध आहे, परंतु वाल्मीकिरामायणांत त्याचें नांव वाजिमेध म्हणजे अश्वमेध असें दिलें आहे.) ऋष्यशृंग ऋषीला आणल्याच्या कथेचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं. वस्तुतः मागील लंकेच्या वेढ्याचा व या कथेचा वगैरे जो उल्लेख येथें करीत आहे, तो कथा-वस्तुसाम्याच्या दृष्टीनें नव्हे, तर केवळ वर्णनसाम्याच्या दृष्टीनें आहे एवढें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण रामायण हाहि श्रीरामचंद्र या ऐतिहासिक वीरपुरुषाचा इतिहास आहे. परंतु गिल्गमेशचा मूळ उद्गम काय आहे हें नक्की नाहीं. दुसरें रामायणाचा प्रसंग भारतवर्षात घडलेला आहे, व गिल्गमेश ही सुमेरियांतील प्राचीन काळची ऐतिहासिक दंतकथा आहे. एवढें ध्यानांत ठेऊन पुढील रामायणांतील वर्णनाकडे पहावें म्हणजे कवींच्या बुद्धिविलासांच्या सादृश्याने मनाला आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.

वाल्मीकि रामायणाच्या बालकांडाच्या दशमसर्गांत हीं ऋष्यशृंगाची कथा येणें-प्रमाणें वर्णिली आहे.

ऋष्यशृंगो वनचरः तपस्वाध्यायसंयुतः ।
अनभिज्ञस्तु नारीणां विषयाणां सुखस्यच ॥
इंद्रियार्थैरभिमतैः नरचित्तप्रमाथिभिः ।
पुरमानाययिष्यामः क्षिप्रं चाध्यवसीयताम् ॥
गणिकास्तत्र गच्छन्तु रूपवत्यः स्वलंकृताः ।
प्रलोभ्य विविधोपायैरानेष्यन्तीह सत्कृताः ॥
श्रुत्वा तथेति राजाच प्रत्युवाच पुरोहितम् ।
वारमुख्यास्तु तच्छ्रुत्वा वनं प्रविविशुर्महत् ॥
ताश्चित्रवेषाः प्रमदाः गायन्त्यो मधुरस्वनम् ।
ऋषिपुत्रमुपागम्य सर्वा वचनमब्रुवन् ॥
एकस्त्वं विजने दूरे वने चरसि शंस नः ।
... ... ...
ततस्तास्तं समालिङ्ग्य सर्वा हर्षसमन्विताः ॥
उपसृत्य ततः सर्वास्तास्तमुचुरिदं वचः ।
एह्याश्रमपदं सौम्य अस्माकमिति चाब्रुवन् ॥
श्रुत्वा तु वचनं तासां सर्वासां हृदयंगमम् ।
गमनाय मतिः चक्रे तं च निन्युस्तथा स्त्रियः ॥

**अर्थः**—ऋष्यशृंग हा तपस्वाध्यायनिष्ठ असा वनचर होता. तो स्त्रिया व विषयसुख यांचा अगदीं अनभिज्ञ होता. त्याला आणण्यासाठीं मनुष्यमात्राला प्रिय अशा इंद्रियतुष्टीच्या साधनांचा उपयोग करून त्या उपायांनीं आम्हीं त्याला नगराला

आणू असें आश्वासन दशरथाला त्याच्या पुरोहितांनीं दिलें. राजानें त्यांना तथास्तु म्हटल्यावर त्या पुरोहितांनीं ठरविलें कीं रूपवान् व अलंकार धारण केलेल्या गणिकांनीं अरण्यांत ऋष्यशृंगाकडे जावें, व विविध उपायांनीं त्याला लोभवावें. त्यांबरोबर त्या राजाच्या दरबारांतील वारयोषिता चित्रवेश धारण करून गायन करीत व हावभाव करीत त्या अरण्यांत ऋष्यशृंगासमोर येऊन प्राप्त झाल्या. तेथें येऊन त्या त्याला म्हणाल्या. महाराज, आपण अरण्यांत एकटे कोठें येऊन पडला ? नंतर त्यांनीं त्याला आलिंगन दिलें, व म्हणाल्या 'महाराज, चला, आमच्या आश्रमांत चला.' तेव्हां त्यांचें ते हृदयंगम भाषण ऐकून ऋष्यशृंगानें त्यांच्याबरोबर जाण्याचा निश्चय केला व त्याहि त्याला घेऊन नगरांत गेल्या !

असो. याप्रमाणें उखातबरोबर इआ-बनी इरेक शहरांत आला. तेथें गिल्गमेशच्या पराक्रमाची कीर्ति ऐकून त्याच्याशीं मैत्री करण्याची इआ-बनीची मनीषा होती. पण तसें करण्यापूर्वी गिल्गमेशच्या पराक्रमाची थोडीशी परीक्षा घ्यावी असें त्याला वाटलें. तो नगरांत आला त्यावेळी तेथें एक मोठा उत्सव चालू होता. त्यांतच गिल्गमेशशीं बाहुयुद्ध करण्याचा इआ-बनीनें बेत केला, परंतु त्या सुमारास गिल्गमेश व इआ-बनी या दोघांनाहि एकमेकांशी न लढण्याबद्दल दृष्टांत झाले. त्यामुळें युद्ध न करितां ते एकमेकांचे परममित्रच बनले.

येथून पुढें इआ-बनी हा अर्ध-नर अथवा वा-नर ( विकल्पानें नर ) गिल्गमेश या वीराचा परम हितचिंतक व सहवासी झाला. यानंतर गिल्गमेश व इआ-बनी हे दोघे खंबाबा या राक्षसानें लोकांना फार त्रास दिल्यामुळें त्याच्यावर स्वारी करण्यास निघाले. खंबाबाच्या अभेद्य किल्ल्यावर स्वारी करण्यापूर्वी गिल्गमेशनें शम्स् या सूर्यदेवाची भक्तीनें प्रार्थना केली व मग ते दोघे स्वारीवर आपल्या अनुयायांसह निघाले. खंबाबानें सर्व देश त्रस्त करून सोडला होता. त्याची आरोळी एखाद्या प्रक्षुब्ध सागराच्या गर्जनेप्रमाणें भयंकर होती, व जो अभागी मनुष्य त्याच्या तावडींत सापडे त्याचा नाश नक्की असे. तथापि हे दोघे वीर धीरानें पुढें चालले. पण त्यांना खंबाबाच्या किल्ल्याभोंवतालच्या वृक्षादिकांचा प्रचंड आकार पाहून विस्मय वाटल्यावांचून राहिला नाहीं,

कवि म्हणतोः—

They stood still and marvelled at the wood
They gazed at the height of the cedars.

यानंतर त्या वीरांनीं खंबाबाशीं केलेल्या युद्धाचें अद्‌भुत वर्णन असलें पाहिजे, परंतु दुर्दैवानें येथून पुढच्या मजकुराच्या विटेचा तुकडा पडून गेला असल्यानें तो मजकूर नष्ट झाला आहे ! तथापि यानंतरच्या उपलब्ध मजकुराच्या आरंभीं खंबाबाच्या शिराचा उल्लेख आला आहे, त्यावरून त्या योध्यांनीं खंबाबाशीं युद्ध करून त्याचें मस्तक उडविल्याचा भाग अनुमानानें ताडतां येतो.

येथपर्यंत गिल्गमेशला सर्वत्र यशच आलें असल्याचें वर्णिलें आहे; परंतु येथून

पुढें त्याचे ग्रह बदललेले दिसतात. खंबाबाशीं युद्ध करून, यश मिळवून परत आल्यावर गिल्गमेशनें आपलीं शस्त्रास्त्रें स्वच्छ केलीं, आपल्या अंगावरचें कवच काढलें, व दरबाराला योग्य असा सुंदर पोषाक परिधान केला. अशा या रूपांत त्याला पाहिल्यानें इस्तर ही देवता त्याच्यावर मोहित झाली, व तिनें त्याची प्रेमयाचना केली. तिनें त्याला दिव्य उपभोगांची लालूच दाखविली व त्याला सांगितलें:--" राजे, महाराजे व देवहि तुला अभिवादन करतील, तुझ्या गाईबैलांची संख्या वाढेल, तुझ्या मेंढ्यांना जुळीं बचीं होतील व तुझ्या रथाचे घोडे जलद पळतील ! " यावरून त्यावेळचा समाजहि वेदकालीन समाजाप्रमाणें ' बहून्पशून् हस्तिहिरण्यमश्वान् ' यांना धन समजणारा होता, हें दिसून येतें. तथापि गिल्गमेश हा या प्रलोभनानें फसला नाहीं, उलट त्यानें इस्तरचीच निर्भर्त्सना केली. त्यामुळें इस्तरला क्रोध आला व ती स्वर्गांत आपला पिता जो अनु-देव, त्याच्याकडे गेली व त्याच्या जवळ तिनें आपलें गाऱ्हाणें सांगितलें. गिल्गमेशनें केलें तें योग्यच केलें, असें अनूला वाटत होतें, व म्हणून त्यानें तिचें पुष्कळ सांत्वन करण्याचा प्रयत्न केला, पण ती आपला हट्ट सोडीना. तेव्हां अखेर तो अपत्यस्नेहाला बळी पडला. त्याबरोबर इस्तरनें गिल्गमेशला मारण्यासाठीं एक मोठा थोरला वृषभ निर्माण करण्याबद्दल आपल्या पित्याला विनंति केली, व त्यावरून अनुदेवानें एक भयंकर वृषभ निर्माण केला. इकडे गिल्गमेश व त्याचा मित्र इआ-बनी हे एका देवलोकांतल्या जोडप्याला ( मिथुनाला ) भेटावयास गेले होते, तिकडून परत येतांना या वृषभानें त्यांना गाठलें, त्याबरोबर त्या दोघांचें भयंकर युद्ध झालें. त्याचें दर्शक असें चित्र कोरलेलें आहे, तें पुढें दिलें आहे.

याच प्रसंगाच्या दुसऱ्या एका पाठांत गिल्गमेशवर हल्ला करणारे दोन बैल होते, असें वर्णिलें आहे व त्या पाठाला अनुसरून या चित्रांत त्या दोन बैलांशीं गिल्गमेश व त्याचा मित्र इआ-बनी युद्ध करीत आहेत, असा देखावा दाखविला आहे. मध्यंतरीं एक मोठा शाल्मली वृक्ष दाखविला आहे, त्यावरून हें युद्ध अरण्यांत झालें असें संकेतानें दाखविण्याचा चित्रकाराचा हेतु आहे.



**गिल्गमेशाचें वृषभाशीं युद्ध.**

[ या चित्रांत गिल्गमेश व त्याचा मित्र इआ-बनी हे दोघेजण, दोन बैलांशीं लढत असल्याचें दाखविलें आहे. ]

ह्यूगो विंक्लर या जर्मन पंडिताच्या मतानें गिल्गमेशच्या या परंपरागत कथेंतच थोडाफार फेरबदल होऊन त्यावरून ग्रीक पौराणिक कथेंतील ' जेसन व सोनेरी लोंकरीचा मेंढा ' ही गोष्ट बनली आहे. या गोष्टीचा सारांश थोडक्यांत येणेंप्रमाणें आहे— ' थेसिली देशांत प्राचीन काळीं ईसन नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला राज्यकारभाराचा कंटाळा आल्यामुळें त्यानें आपला भाऊ पेलिआस् याला सांगितलें कीं ' माझा मुलगा जेसन् हा मोठा होईपर्यंत तूं हें राज्य संभाळ. ' त्याप्रमाणें पेलिअसनें राज्यकारभार सुरू केला. पुढें जेसन् मोठा झाल्यावर तो चुलत्याजवळ आपलें राज्य परत मागूं लागला. तेव्हां हातचें राज्य घालविण्यास पेलिअस अर्थातच खुषी नव्हता. पण त्याला उघडपणें तसें ना म्हणतां येईना. म्हणून त्यानें आपल्या पुतण्यास सांगितलें कीं येथून दूर असलेल्या कल्चिस्च्या राज्यांत एका मेंढ्याची सोनेरी लोंकर आहे, ती तूं घेऊन ये म्हणजे तुला तुझ्या बापाचें राज्य मी परत देईन. त्यावरून जेसन् तें कार्य करण्यासाठीं निघाला त्यासाठीं त्यानें एक आर्गो नांवाचें जहाज तयार केलें अनेक धाडसाचीं कृत्यें करून अखेर कल्चिस्च्या राज्यांत येऊन पोहोंचला, व त्यानें त्या राजाजवळ ती सोनेरी लोंकर मागितली. त्या राजानें ती एका अटीवर देण्याचें कबूल केलें; ती अट ही कीं श्वासोच्छ्वासाबरोबर अग्निज्वाला नाकांतून बाहेर सोडणाऱ्या बैलांना नांगराला जुंपून त्यानें एका शेतांत एका राक्षसाच्या दांतांची पेरणी करावी. जेसन्नें ती अट कबूल केली. त्यासाठीं तो त्या बैलांपाशीं गेला, तों त्या बैलांच्या नाकपुड्यांतून अग्नीच्या ज्वाळा चालल्या होत्या व त्यामुळें कालियाच्या विषश्वासाप्रमाणें त्या ज्वालांनीं भोंवतालचे सर्व वनस्पती व प्राणी जळून कोळ होत होते. तथापि जेसन्नें युक्तीनें त्यांचीं शिंगें पकडून त्यांना नरम केलें व शेताची नांगरणी अटीप्रमाणें केली. तेव्हां कल्चिस्च्या राजाला ती सोनेरी लोंकर जेसन्ला देणें भाग पडलें. अशा रीतीनें त्या बैलांचा पराभव करून जेसन्नें ती लोंकर आणून आपल्या चुलत्याला दिली. तेव्हां पेलिअसलाहि जेसन्च्या बापाचें राज्य जेसन्ला परत द्यावें लागलें. अशी ग्रीक कथा आहे. यावरून दोन्ही कथा पाहतां, गिल्गमेश व जेसन् यांनीं महाप्रबळ अशा बैलांचा पराभव करून आपला हेतु साध्य करून घेतला हा त्यांतला सामान्य भाग आहे. त्यावरून ह्यूगो विंक्लर यानें सुमेरी कथेचा लाक्षणिक अथवा रूपकात्मक अर्थ करून सोनेरी लोंकर म्हणजे वसंतसंपात व ती बैलांच्या तडाक्यांतून सोडवून आणली म्हणजे वृषभराशींतून वसंतसंपात परत येत असल्याचा संक्रमण काळ होय, असा निष्कर्ष काढला आहे. पाऊण कृत्तिका, रोहिणी व मृगार्ध मिळून वृषभ राशि होतो. अर्थात् या रूपकावरून मृगनक्षत्रीं वसंतसंपात असल्याचा काळ होय, व तो म्हणजे ख्रि. पू. चार साडेचार हजार वर्षांचा काळ होय, हें उघड होतें. वेदांचा काळहि हाच होय व तोहि अशाच दुसऱ्या एका रूपकानें वर्णिला असल्याचें कै. लो. टिळकांनीं आपल्या ग्रंथांतून विशद करून दाखविलें आहे. असो. तेव्हां गिगल्मेशनें त्या बैलांशीं युद्ध केलें, त्यांत इआ-बनीनें बैलाची शेंपूट

मागून घट्ट पकडून ठेविलें, व पुढून गिल्गमेशनें आपल्या तरवारीनें त्याचें मस्तक उडविलें.

याप्रमाणें गिल्गमेशच्या नाशासाठीं इश्तर या देवीनें खास निर्माण केलेल्या बैलाचा उलट त्यानेंच नाश केल्यानें इश्तरचा क्रोध अगदीं अनावार झाला. इकडे गिल्गमेशनें त्या मारलेल्या बैलाचीं शिंगें आणून शम्स् या आपल्या इष्ट सूर्य देवतेला अर्पण केलीं. नंतर मोठ्या समारंभानें त्यानें आपल्या राजधानींत प्रवेश केला व आपल्याला मिळालेल्या यशाच्या द्योतनार्थ त्यानें एक आपल्या मित्रांना मोठी मेजवानी दिली. परंतु अत्यंत क्रुद्ध झालेल्या इश्तरनें आपल्या दैवी प्रभावाचें सामर्थ्य एकवटून इआ-बनीचा मृत्यू घडवून आणला. तो असा कीं, एका लढाईंत त्याला एक मोठी जखम झाली व तिनें तो बारा दिवस आजारी झाला. तेव्हां त्यानें गिल्गमेशला बोलावून सर्व हकीगत सांगितली, व मग त्याचा निरोप घेऊन आपला प्राण सोडला. त्या आपल्या अत्यंत प्रिय मित्राच्या मृत्यूनें गिल्गमेश यास फार मोठा धक्का बसला व दिवसेंदिवस तो स्वतः त्या दुःखानें झुरूं लागून आजारी पडला. त्यामुळें तर आपली गति आपल्या मित्रासारखीच होते कीं काय ही त्याला भीति पडली. तेव्हां त्यानें असा बेत केला कीं, आपला प्राचीन पितर पीर नापिश्तिम् म्हणून आहे, त्याला शोधून काढून त्याच्याकडून आपला मृत्यु चुकविण्याचा उपाय विचारून घ्यावा.

असा विचार करून तो निघाला, तो एका पर्वताच्या भयंकर गुहेंतून त्याचा रस्ता होता, तींतून जात असतां त्याला तेथें भयंकर सिंह दिसले. तेव्हां त्यानें सिन् या चंद्र देवतेची प्रार्थना केली. तेव्हां चंद्रानें त्याला त्या सिंहांना चुकवून जाण्याचा एक रस्ता दाखविला; त्या रस्त्यानें तो पुढें चालला. थोडें अंतर जातांच त्याला एक भीतिप्रद बोगदा लागला; त्याच्या तोंडाशीं महाक्रूर वृश्चिक मार्ग अडवून बसले होते. त्यांची विनंति करून त्यानें त्यांच्या परवानगीनें आपला पुढला मार्ग आक्रमण केला. त्या बोगद्यांतून बाहेर येतांच त्याला एक भयंकर नदी लागली. त्या नदीच्या कांठीं सबितु या देवाचा अंमल होता. त्या नदीचें नांव मृत्युसरिता अथवा वैतरणी असें होतें. तिच्यांतून पार होऊन पलीकडे गेल्याशिवाय गिल्गमेशला आपला पितर पीर-नापिश्तिम् हा भेटणें शक्य नव्हतें. म्हणून गिल्गमेशनें सबितूची नदीपार करण्याविषयीं याचना केली. तेव्हां सबितूनें त्याला सांगितलें:—' बाबा, हें होणें शक्य नाहीं. सर्व प्राणिसृष्टीची अखेर या वैतरणी नदीपाशीं आहे. येथून पुढें जाणें शक्य नाहीं. तेव्हां एवढी तुझी विनंति मला मान्य करणें शक्य नाहीं. तूं इतर हवें तें माग मी देईन. कवि म्हणतो, सबितूनें सांगितलें:—

Gilgamesh, whither hurriest thou
The life that thou seekest, thou will not find.
When the Gods created man
They fixed death for mankind

Make it pleasant for thee
To follow thy desires while thou livest,
Put myrrh upon thy head,
And garments upon thee of fine linen,
Celebrate the glad day,
Be not weary therein.
Put song and music before thee,
Behind thee all evil things,
And remember thou only joy.

**अर्थः**—अरे गिल्गमेश! तूं घाईनें पुढें कोठें चाललास? याच्या पुढें तुला हवें तें अमर जीवन प्राप्त होणार नाहीं. देवांनीं ज्या वेळेला मनुष्यप्राणी निर्माण केला, त्याच वेळेला त्यांनी मृत्यूहि निश्चित केला. म्हणून तूं आपल्या इंद्रियांना आनंद होईल अशीं कृत्यें कर. मस्तकावर यशोमुकुट धारण कर व अंगावर सुंदर सुंदर वस्त्रें धारण कर, व जीवंत असेपर्यंत मौज कर. मौज व गायन आपल्या डोळ्यापुढें ठेवून काळजी दूर सार व फक्त आनंद करीत रहा. साबितूनें आणखी त्याला सांगितलें कीं, फक्त एक शम्स् हा सूर्यदेवच काय तो ही वैतरणी ओलांडून जाऊं शकतो.

इतका उपदेश साबितूनें केला तरी गिल्गमेशनें तो मानला नाहीं. तो म्हणाला, 'मला यांतील कांहींहि नको, मला अमर जीवनच पाहिजे. देत असलास तर तेवढेंच दे.'

हा गिल्गमेश व साबितु यांचा संवाद वाचतांच कठोपनिषदांतील नाचिकेतस् व यम यांच्या संवादाचें स्मरण झाल्याशिवाय राहणें शक्यच नाहीं.

नचिकेतस्च्या बापानें त्याला सांगितलें कीं मी तुला मृत्यूला देऊन टाकतों. त्यावरून नचिकेताला मृत्युलोकीं जावें लागलें. तेथें गेल्यावर त्याचा व यमाचा संवाद झाला. त्यात यमानें संतुष्ट होऊन त्याला वर मागण्यास सांगितलें. तेव्हां नाचिकेतानें अमृतत्वाचें ज्ञान मागितलें. तेव्हां यम त्यास म्हणाला नाचिकेता—

**अन्यं वरं नचिकेतो वृणीष्व । मा मोपरोत्सी रतिमा सृजैनम् ॥**

दुसरा वर माग, हा हट्ट धरूं नकोस. परंतु नाचिकेत ऐकेना, तेव्हां यमानें त्याला प्रलोभन दाखविलें. तो म्हणालाः—

**शतायुषः पुत्रपौत्रान् वृणीष्व । बहून्पशून् हस्तिहिरण्यमश्वान् ॥**
**भूमेर्महदायतनं वृणीष्व । स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि ॥**
**ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके । सर्वान् कामान् छन्दतः प्रार्थयस्व ॥**
**इमा रामा सरथा सतूर्या । नहीदृशा लंभनीया मनुष्यैः ॥**

नचिकेता, तूं शंभर वर्षांचें आयुष्य, पुत्रपौत्र, पुष्कळ पशू, हत्ती, सुवर्ण, घोडे, मोठी जमीन, यांपैकीं वाटेल ते माग; फार काय सुंदर स्त्रिया, रथ, व तुला ज्या ज्या इतर सुखाच्या आकांक्षा असतील, त्यांची तृप्ति मागून घे.

परंतु नचिकेतानें गिल्गमेशप्रमाणेंच हें सर्व नाकारलें व ' वरस्तु मे वरणीयः स एव । ' मीं मागितलेला अमृतत्वाच्या ज्ञानाचाच वर मला द्या, असा आग्रह धरला. हें विचारसाम्यहि फार उद्बोधक व मनोरंजक आहे.

इतका आग्रह धरल्यामुळें अखेर सबितूनें त्याला वैतरणीपार जाण्यासाठीं मार्ग दाखविण्याचें कबूल करून त्याला सांगितलें:—' या कामीं आराद-इआ म्हणून एक यक्ष आहे, त्याच्या जवळ एक नांव आहे, तींतून तो तुला नदीपार घेऊन जाईल, यासाठीं तूं त्याच्याकडे जा. त्याप्रमाणें गिल्गमेशनें आराद-इआकडे जाऊन त्याची प्रार्थना केल्यावर आराद-इआनें आपली नांव तयार केली व तींत बसून दोघेजण त्या ' River of Death ' अथवा मृत्युनदींतून पलीकडे असलेल्या ' Island of the Blessed ' ' सुखद्वीपा ' ला जाऊन पोहोंचले. परंतु ते त्या नावेंतच बसून राहिले. तेथूनच गिल्गमेशनें आपला प्राचीन पितर पीर-नापिश्तिम् व त्याची पत्नी यांना अवलोकन केलें. पीर-नापिश्तिम्हि सदेह मनुष्य नौकेंतून येतांना पाहून आश्चर्यचकित झाला, व त्यानें गिल्गमेशला त्याच्या येण्याचें कारण विचारलें. तेव्हां गिल्गमेशनें त्याला एकंदर हकिगत सांगितली व आपला मित्र इआ-बनी याच्याप्रमाणें आपल्याला मृत्यू न यावा असा उपाय सांगण्याबद्दल पीर-नापिश्तिम्ला विनंति केली.



## नावेचें चित्र.

चित्रांत उजव्या हाताच्या अर्ध्या भागांत एक नांव दाखविलेली असून त्यांत गिल्गमेश बसलेला आहे व आराद-इआ हातांत वल्हें घेऊन नांव चालवीत आहे. डाव्या बाजूचें चित्र निराळ्या प्रसंगाचें असून तें केवळ एकाच चित्रांत कोरलेलें आहे. त्यात गिल्गमेश सिंहाशीं लढत असल्याचें दाखविलें आहे. ]

ही सर्व हकीगत ऐकून आपल्याला खेद होत असल्याचें पीरनापिश्तिम्नें गिल्गमेशला सांगितलें; पण तो म्हणाला ' तूं म्हणतोस ते होणें शक्य नाहीं. दरेक मनुष्याला मृत्यु हा निश्चित झालेला आहे, तो टळणें शक्य नाहीं. इतकेंच काय, पण मृत्यू केव्हां येईल हेंहि सांगतां येणार नाहीं. कारण त्याचा काळ देवांनीं नक्की केलेला असतो.

तेव्हां गिल्गमेशनें पीर-नापिश्तिम्ला विचारलें:—' तर मग आपण स्वतः मृत्यूच्या अतीत कसे झालां ?'.

I behold thee oh Pir-Napis thim;
But thy appearance is not changed,
As I am, so art thou also.
How didst thou obtain the life which thou dost enjoy
In the assembly of the gods and the immortals?

जसा मी देहधारी तसेच आपण दिसतां, आपल्यांत कांहीं फरक दिसत नाहीं; तेव्हां देवांच्या व अमरांच्या सहवासांत राहण्यासारखी ही संजीवनी आपल्याला कशी प्राप्त झाली ?

यावर उत्तरादाखल पीर-नापिश्तिमूने गिल्गमेशला महाजलप्रलय याची कथा सांगितली. ती कथा यापुढील लेखांकांत देण्यांत येईल.

ती सांगितल्यावर पीर-नापिश्तिम् गिल्गमेशला म्हणाला, मृत्यू चुकविण्याचा मार्ग तर मी तुला दाखवूं शकणार नाहींच; पण तुला संपूर्ण आरोग्य मात्र मी देऊं शकतों. त्यासाठीं प्रथमतः तूं सहा दिवस व सहा रात्र रात्रीं स्वस्थ झोंप घे. त्याप्रमाणें तो निजल्यावर पीर-नापिश्तिमूनें आपल्या बायकोला एक अभिमंत्रित अन्नाचा चरु तयार करण्यास सांगितलें. त्यावरून सात मंत्रांनीं अभिमंत्रण करून तिनें तो चरु तयार केला, व गिल्गमेश झोंपेंत असतांच त्याला तो खाऊं घातला. त्यानंतर गिल्गमेश जागा झाला, तों त्याचा सर्व रोग नाहींसा झाला. मग पीर-नापिश्तिमूनें आराद-इआला आज्ञा केली कीं 'तूं गिल्गमेशला घेऊन एका पवित्र उदकाच्या झऱ्यावर जा व त्याच्या जलानें गिल्गमेशचें सर्व शरीर धुवून काढ. त्याप्रमाणें करतांच त्याचें सर्व शरीर उत्कृष्ट कांतिमान् बनलें. तेव्हां गिल्गमेश हा आपल्या पितरांचा निरोप घेऊन परत जाण्यास निघाला. जाण्यापूर्वी पीर-नापिश्तिमूनें गिल्गमेशला एक वनस्पती दाखविली व तिच्या सेवनानें अखंड यौवन-प्राप्ति होते असें सांगितलें. परंतु ती वनस्पती घेऊन आराद-इआ व तो परत जात असतां, वाटेंत एका सर्पानें ती पळविली ! तेव्हां गिल्गमेशला फार खेद झाला व तो तसाच पुढें निघाला.

जातां जातां त्याला आपला मृत मित्र इआ-बनी याचें स्मरण होऊन फार दुःख झालें, व त्यानें यमधर्माची प्रार्थना केली कीं कसेंहि करून मला एकदां माझ्या मित्राची भेट करव. त्या प्रार्थनेनें संतुष्ट होऊन यमधर्म नेरगाल यानें मृत्यु लोकाचा दरवाजा उघडला, व त्यांतून इआ-बनी हा आपल्या मृत्युलोकाच्या शरीराकृतीनें बाहेर आला. तेव्हां गिल्गमेशला फार आनंद झाला व त्यानें त्याला यमलोकांतील हकीकत विचारिली. त्यावर इआ-बनी म्हणाला मित्रा ती तुला सांगतां येत नाहीं, कारण तेथील यातना तूं ऐकल्यास तर तुझ्या हृदयाचें पाणीच होऊन जाईल, इतक्या त्या भयंकर आहेत. तथापि गिल्गमेशनें फार आग्रह केल्यावरून इआ-बनीनें यम-लोकाचें वर्णन केलें. तो म्हणाला-तेथें पापी लोकांना धुळींत लोळावें लागतें, तेथें त्यांना कृमिकीटक तोडून खातात पण रणांत मारलेला योद्धा हा—

On a couch he lieth
And drinketh pure water.
The man who was slain in battle.
Thou and I have often seen such an one.
But the man whose corpse is cast upon the field,
His spirit resteth not.



**नरकाचें चित्र.**

[ मृत्यूनंतर मनुष्यप्राण्यास प्राप्त होणाऱ्या स्थितीचें चित्र. यांत पुण्यवान् पुरुषांच्या सेवेला देवदूत असून पापी मनुष्यांना यमदूत क्लेश देत आहेत, असा देखावा दाखविला आहे. ]

जो योद्धा रणांत मारला जातो, त्याला मधुर पेय पिण्यास मिळतें, निजण्यास गादी मिळते—असे योद्धे आपल्या पाहण्यांत आलेच आहेत. पण ज्याचें प्रेत भूमीवर तसेंच फेंकलें जाते, त्याला मृत्यूनंतर शांति प्राप्त होत नाही.

बरोबर अशाच अर्थाचा श्लोक आपल्यांत आहे:—

**द्वौ इमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ ।**
**परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥**

**अर्थः**—योगयुक्त संन्यासी व रणांगणावर मृत झालेला योद्धा हे दोघेच कायते सूर्यमंडलांचा भेद करून जातात.

पुढें तो सांगतो—

The man whose spirit has none to care for;
The dregs of the Vessel, the leavings of the feast
And that which is cast upon the street, are his food.

ज्या मृतात्म्याबद्दल काळजी वाहणारा त्याच्या पाठीमागें कोणी नातलग नसेल याला मृत्तोत्तर अवस्थेंत लोकांनीं खाऊन उरलेलें खरकटें, रस्त्यांत टाकलेलें अन्न व



XVII

| Seal | Sumerian | Phonetic |
|---|---|---|
| | | SAR, [illegible] |
| | | ZU |
| | | KHA |
| | | AŠ |
| | | USSA |
| | | GI, GIN |
| | | EDIN |
| | | AŠ |

वाचनः—सर-झु-ख-अस्-उस्स-जिन्-तुम्-एदिन्-अस्स.

अर्थः—हे सर्वपूर्ण परमेश्वरा—एदिन्मध्यें ऋषी उत्स याला जिवंत कर.

भांड्यांतील पेयाचा उरलेला गाळ हा सेवन करावा लागतो. यावरून मृतानंतर त्याची काळजी घेण्याची—अर्थात् त्याला श्रद्धान्नसंतर्पण करण्याची—अवश्यकता त्या काळीं सुमेरियांत मानली गेली होती, हें स्पष्ट होतें.

याप्रमाणें पातालांतील ही हकिगत इआ-बनीनें गिल्गमेशला सांगितल्यावर या महाकाव्याची समाप्ति करण्यांत आली आहे.

हें काव्य जो कोणी वाचील, अथवा श्रवण करील, त्याला सौख्य, समृद्धि वगैरे प्राप्त होईल असेंहि त्या काव्यांत कथन केलें आहे.

( A knowledge of the hero's achievements would bring prosperity to the man who made himself acquainted with them. )

रामायणाच्या युद्धकांडाच्या १२८ व्या सर्गांतहि अशीच फलश्रुति वर्णिली आहे कीं,

**आयुष्यमारोग्यकरं यशस्यं सौभ्रातृकं बुद्धिकरं शुभंच ।**
**श्रोतव्यमेतन्नियमेन सद्भिः आख्यानमोजस्करमृद्धिकामैः ॥**

**अर्थः**—आयुष्य, आरोग्य, यश, सुभ्रातृसुख, बुद्धि व कल्याण प्राप्त करून देणारें असें हें आख्यान आहे. याचें नेमानें सज्जनांनीं श्रवण करावें. त्यानें, ओजस् व ऋद्धि प्राप्त होतील.

गिल्गमेश काव्याची ही फलश्रुति म्हणजे केवळ पोकळ स्तुति नसून तीं सत्य आहे, अशी त्या काळीं लोकांची पूर्ण श्रद्धा होती, असें किंग सांगतो.

( This statement was not regarded as a mere conventional preface, but was implicitly believed in. )

अशा प्रकारें या महाकाव्याचें स्वरूप आहे. यामधील वर्णन हें केवळ काल्पनिक नसून त्याला प्राचीन इतिहासाचा आधार आहे. किंग म्हणतो:—

Many of the tales in it go back to hoary antiquity, and that in course of time they came to be included in it. They were not idle tales, but had a religious significance for the people among whom we find them.

( यांतील पुष्कळ कथा प्राक्कालीन योद्धयांच्या व वीरपुरुषांच्या इतिहासरूप असून, त्यांचाच या काव्यांत समावेश करण्यांत आला आहे. त्या केवळ कहाण्यासारख्या गप्पा नसून, ज्या लोकांत त्या प्रसृत होत्या, त्यांना त्यांचें फार धार्मिक महत्त्व वाटत होतें. ) हेच उद्गार आपल्या इकडील रामायणादि महाकाव्यांनाहि शब्दशः लागूं पडतात. या काव्यांतील कांहीं प्रसंगांचें आपल्याकडील रामायण व उपनिषदांतील प्रसंगांशीं असलेलें सादृश्य आम्ही वर दर्शविलेंच आहे. अशींच दुसरीं साम्य स्थलें इतर ग्रंथकारांनाहि दिसलीं होतीं. उदाहरणार्थ मॅकेंझी म्हणतो:—




| Seal | Sumerian | Phonetic |
| --- | --- | --- |
| | | SAB, ~~SAG, ŠA~~ |
| | | TAR, ~~KUD, KHAŠ~~ |
| | | MATU. EŠ |
| | | GI. GIN |
| | | EDIN |
| | | AŠ |

वाचनः—सबतर्–मतु–जिन्–तुम्–एदिन्–अस्स.

अर्थः—हे सवितर्, एदिनमध्यें मृताला तूं जिवंत कर.

There is a remarkable resemblance between the account of Gilgamesh's journey through the mountain tunnel to the garden and seashore, and the Indian story of the demigod Hanuman passing through the long carvern to the Shoreland palace of the female ascetic, when he was engaged in searching for Sita, the wife of Rama, who had been carried away by Ravana, the demon-king of Ceylon.

( गिल्गमेशनें पर्वताच्या घोर दरींतून निघून समुद्रकांठीं केलेला प्रवास व

लंकापति राक्षसराज रावणानें पळवून: नेलेल्या रामपत्नी सीतेच्या शोधार्थ हनुमान् या देवानें केलेला प्रवास, यांच्यांत विलक्षण साम्य आहे. )

यावरून त्यानें असा निष्कर्ष काढला आहे कीं,

Here as elsewhere, the priests utilized the floating material from which all mythologies were framed, and impressed upon it the stamp of their doctrines
( सर्वत्र प्रचलित असलेल्या दंतकथेच्या वाङ्मयावर धर्मगुरूंनी आपल्या मतांचा शिक्का मारून त्याला हल्लींचें स्वरूप दिलें आहे. )

हा सिद्धांतहि बहुमान्य होण्यासारखाच आहे. केवळ उदरपूरणाकरितां त्यांनीं केलेली ही लोकांची फसवणूक नव्हे, तर प्राचीन काळच्या ऐतिहासिक वाङ्मयाचें त्यांनीं आपल्या बुद्धिवैभवानें केलेलें हें स्थिरीकरण होय.

माहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खननांत सांपडलेल्या शिक्क्यांपैकीं कांहीं सूर्यवंशांतील राजांचे आहेत, हें त्या शिक्क्यांचें जें वाचन या मालेंतील लेखांतून दिलें आहे, त्यावरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. त्या शिक्क्यांचा काळ मार्शलसाहेबांनीं ख्रि. पू. ३५०० ते २७०० चा ठरविला आहे. आपल्याकडील पुराणवंशावळीच्या अध्ययनावरून पार्जिटर वगैरेंनीं जो कालनिर्णय केला आहे, त्यांतहि सूर्यवंशीं राजांचा काळ याच सुमाराचा साधारणतः येईल. त्यावेळीं सुमेरिया व सिंधुप्रांत यांत दळणवळण असल्याचें आतां मार्शल साहेबांनींहि सिद्धच मानलें आहे, तेव्हां दोही देशांच्या पौराणिक कथावाङ्मयाचा थोडाबहुत परस्परविनिमय झाला असल्याचाहि संभव आहे. मूळ गिल्गमेश काव्याचा गाभा ख्रि. पू. ४००० इतका प्राचीन आहे. पण त्यावर संस्करण होऊन त्याचें कांहीं काळानें हल्लीं उपलब्ध असलेलें स्वरूप बनलें आहे. असाच प्रकार आमच्याहि वाङ्मयांत झाला आहे. मूळचें प्राचीन सूत वाङ्मय काव्यबद्ध स्वरूपांत नंतर संस्कारिलें गेलें आहे. येणेंप्रमाणें या दोन्ही देशांतील लोक एकच मानववंशाचे असून त्यांचें मूळ एकच होतें, या आमच्या विधानाला या काव्यानेंहि उत्कृष्ट रीतीनें पुष्टि मिळते.

असो. या पुढील लेखांत सुमेरी व आर्य वाङ्मयांतील इतर साम्यदर्शन करण्याचें योजिलें आहे.

---

# हिंदी व सुमेरी संस्कृतींतील इतर साम्यदर्शन.



( लेखांक ४ था. )

गेल्या लेखांकांत सुमेरी वाङ्मयांतील गिल्गमेश या महाकाव्याचें वर्णन केलें आहे. आजच्या अंकांत हिंदी व सुमेरी संस्कृतींतील इतर साम्यें दाखवावयाचीं आहेत.

गिल्गमेशच्या कथेंत स्वतः गिल्गमेश हा आराद–इआ या देवदूताच्या सहाय्यानें नावेंत बसून ज्यावेळेला ‘ River of Death ’ मृत्युनदीच्या अथवा वैतरणीच्या परतीराला गेला, तेव्हां तेथें त्याला त्याचा अत्यंत प्राचीन पितर पीर-नापिश्तिम् भेटल्याचें सांगितलें आहे. त्याच्याजवळ गिल्गमेशनें अमरत्वाची मागणी केली. पीर–नापिश्तिमनें ती नाकारली. त्यावरून गिल्गमेशनें त्याला उलट प्रश्न केला कीं, ‘ जर मनुष्यमात्राला अमरत्व दुर्लभ आहे तर मग तुला अमरत्व कसें प्राप्त झालें ? ’ या प्रश्नाच्या उत्तरांत पीर–नापिश्तिमनें गिल्गमेशला महाप्रलयाची कथा सांगितली, असें त्या महाकाव्यांत वर्णन केलें आहे. ती कथा हिंदी प्राचीन वाङ्मयांतील जलप्रलयाच्या कथेशीं अगदीं एकरूप असल्यानें, ती आपण आतां अवलोकन करूं.

पीर–नापिश्तिम् म्हणतोः—

I will reveal to thee, oh Gilgamesh, the hidden word,
And the decision of the Gods, I will declare to thee.
... ... ... ... ... ... ... ... ...
Their hearts prompted the great Gods to send a deluge,
There was their father Anu
And their counsellor the warrior Bel
And their messenger Ninib,
The lord of wisdom, Ea, sat also with them,
And he repeated their purpose ... ... ...
Thou Pir-Napishtim-son of Ubara-Tutu,
Pull down thy house and build a ship,
Forsake thy possessions, take heed for thy life!

Abandon thy goods save thy life.
As for the ship, which thou shalt build,
Well-planned must be its dimensions,
Its breadth and its length shall bear proportion each to each,
And thou shalt launch it in the ocean.

अर्थः—गिल्गमेशा मी तुला तें परम रहस्य, तो देवांचा संकल्प आतां तुला सांगतों; ऐक.... ... ... ... ... ... ... ... ... ...

" एके काळीं देवांचा बेत पृथ्वीवर महाप्रलय करण्याचा ठरला. त्याप्रसंगीं देवांच्या सभेंत देवाधिदेव अनु, सेनापति बेल् व इयादेव वगैरे सर्वजण बसले होते. त्यानंतर हा देवांचा संकल्प इआनें येऊन मला सांगितला. तो म्हणाला, उबारा-तुतूच्या पुत्रा, हे पीर-नापिश्तिम्, तूं आतां आपलें घर पाडून टाक, व त्याच्याऐवजी एक नाव बांध. तूं आपल्या सर्व मिळकतीचा त्याग कर, व फक्त आपल्या प्राणांचा संभाळ करण्याच्या तयारीला लाग. तूं जी नाव बांधशील, तिची लांबी व रुंदी यांचें योग्य प्रमाण ठेव, व ती प्रशस्त असूं दे व मग ती तूं समुद्रांत ढकल. '

पीर-नापिश्तिम् पुढें गिल्गमेशला सांगतोः—

The command, oh my Lord, which thou hast given
I will honour, and will fulfil.

' मी इआला सांगितले कीं, देवा, तुमची आज्ञा मी अक्षरशः पाळीन व त्याप्रमाणें वर्तन करीन. '

पुढें इआनें पीर-नापिश्तिम्ला आणखी सांगितलें कीं, हा जलप्रलय अमुक दिवशीं ठरलेल्या वेळीं येईल. त्या काळाची तूं वाट पहात रहा, व ठरलेल्या वेळीं आपल्याबरोबर आपलें सामान, व अन्नवस्त्र घेऊन त्यांत जाऊन बस. त्याप्रमाणें पीर-नापिश्तिम्नें लाकडें गोळा केलीं व सतत चार दिवस मेहनत करून ती नाव पांचव्या दिवशीं तयार केली. नंतर तींत सामान भरण्यांत आणखी दोन तीन दिवस घालविल्यावर सातव्या दिवशीं त्याची सर्व तयारी इआनें सांगितल्याप्रमाणें संपूर्ण झाली.

' A fixed Time Shamsh had appointed, saying:
The lord of darkness will at even tide send a heavy rain,
Then go into the ship and shut thy door.
The appointed season arrived and the ruler of the darkness
Sent at even tide a heavy rain.
Of the storm I saw the beginning,
To look upon the storm I was afraid,
I entered the ship and shut the door.

पुढें पीर-नापिश्तिम् सांगतोः—' शम्स् देवानें प्रलयाचा नक्की काल ठरविला होता व मला सांगितलें होतें कीं, तूं ( पीर-नापिश्तिम् ) नावेंत जाऊन बस व तिचें दार लावून घे. त्याप्रमाणें नक्की केलेला दिवस आला. त्यावेळीं प्रलयदेवतांनीं अतिवृष्टीला सुरवात केली. त्याच्याबरोबर झंझावातहि सुटला व त्यामुळें इतकें प्रचंड

तुफान झालें कीं, माझ्याच्यानें त्याच्याकडे पाहवेना; म्हणून मी नावेंत जाऊन बसलों व तिचें दार लावून घेतलें. ' त्या प्रलयाचें वर्णन तो पुढें करतो:—

All light was turned into darkness.
No longer could men know each other. In heaven
The Gods were afraid of the deluge,
They retreated, they went up into the heaven of Anu.
The Gods crouched down like hounds.
In the enclosure of Heaven they sat cowering.
... ... ... ... ... ... ...
For six days and six nights
The wind blew, and the deluge and the tempest overwhemed the land.
When the seventh day drew nigh, then ceased the tempest,
And the deluge and the storm,
Which had fought like a host.

सर्व पृथ्वीवरील प्रकाश नाहींसा होऊन घोर अंधःकारानें सर्व जग व्यापून टाकलें. मनुष्याला मनुष्य ओळखूं येईनासा झाला. स्वर्गांत स्वतः सर्व देवहि भयभीत झाले. ते सर्वजण देवाधिदेव अनूच्या आश्रयाला जाऊन राहिले. तेथें ते कुत्र्यांसारखे खालीं पडून राहिले. अशा रीतीनें सहा दिवस व सहा रात्री संततधार लागून राहिली होती, तुफान वारा वाहत होता, व महापुरानें सर्व विश्व ग्रस्त करून टाकलें होतें ! सातवा दिवस उजाडला, त्यावेळीं तुफानाचा जोर कमी झाला.

( **टीपः**—पीर-नापिश्तिमनें अनुभवलेला हा महा घोर प्रसंग प्रस्तुत लेखकाच्या नशीबानें त्याला १९२७ च्या जुलै महिन्यांत बडोद्यास शब्दशः अनुभवावयास सांपडला, व त्यामुळें पीर-नापिश्तिमला ( तो खरा असल्यास ) काय वाटलें असेल, याची यथार्थ कल्पना लेखकाला आली आहे. )

त्यानंतर—

Then the sea became quiet and it went down,
And the hurricane and the deluge ceased.
I looked upon the sea and cried aloud,
For all mankind was turned back into clay.
In place of the fields a swamp lay before me,
I opened the window and the light fell upon my cheek.
I bowed myself down, I sat down, I wept;
Over my cheek flowed my tears.
I looked upon world and behold ! all was sea.

**अर्थः**—समुद्र शांत झाला व पाणी ओसरूं लागलें. तुफान व वारा कमी झाला. त्या जलसागराकडे पहातांच दुःखानें माझ्या तोंडून आर्तवेदना बाहेर पडली, कारण-

त्या देखाव्याकडे मला पहावेना ! माणसांची माती झालेली होती ! शेतांत पाणी सांचून त्यांचीं डबकीं बनलीं होतीं. नावेचें दार मी उघडतांच प्रकाशाचे किरण माझ्या गालावर पडले. त्याबरोबर मी मटकन् खालीं बसलों. माझ्या डोळ्यांत अश्रु येऊन ते माझ्या गालावर पडूं लागले. भोंवतीं सर्वत्र पाणीच पाणी झालें होतें. पाण्याच्या महासागराशिवाय दुसरें कांहींच दिसत नव्हतें !

( टीपः—हा देखावा व हें वर्णन प्रस्तुत लेखकाच्या लेखणीतून स्वानुभवावरून उतरल्याइतकें त्याला स्पष्ट दिसत आहे. )

पीर–नापिश्तिम् म्हणतो, त्या अवधींत,

The mountain of the land of Nitsir held the ship fast
And did not let it slip.
... ... ... ... ... ...
Then I brought all out into the four winds,
I offered an offering,
I made a libation on the peak of the mountain,
The Gods smelt the sweet savour.
... ... ... ... ... ... ...
Then the lady of the Gods drew nigh.

माझी नाव पर्वताच्या शिखरावर घट्ट बांधलेली होती. त्यामुळें तेथून ती निसटली नाहीं. मग माझ्याबरोबर नावेंत घेतलेल्या सर्व प्राण्यांना मीं बाहेर आणलें, व एक यज्ञ करून त्यांत सव देवांना हविर्भाग दिले. मग त्यांतूनच देवांनीं निर्माण केलेली एक स्त्री बाहेर आली. त्यानंतर बेल् हा देव तेथें आला व त्यानें—

He took my hand and brought me forth,
He brought my lady forth
He turned towards us, he stood between us,
He blesses us, saying
Hitherto hath Pir-Napishtim been of mankind,
But now let Pir-Napishtim be like unto the Gods.

माझा हात धरून मला बाहेर आणलें. तसेंच त्यानें त्या देवकन्येला—माझ्यापत्नीलाहि–बाहेर आणलें. नंतर त्यानें आम्हां दोघांना आपल्या दोन्हीं बाजूंना घेऊन आशीर्वाद दिला कीं, ' आजपर्यंत, हे पीर–नापिश्तिम्, तूं मानव होतास; पण येथून पुढें तुझी गणना देवकोटींत केली जाईल. '

याप्रमाणें आद्य जलप्रलयाची ही सुमेरी कथा आहे. साधारणतः आद्य जलप्रलयाची एक कथा सांप्रतच्या युरोपियन लोकांच्या दंतकथेंतहि आढळतें. तीहि या सुमेरी कथेपासूनच परंपरेनें आली आहे. सुमेरिआपासून बॅबिलोनिया, मग असीरिआ, मग पर्शिआ, मग ग्रीस, व ग्रीसपासून अलीकडील राष्ट्रें—असा या परंपरेचा क्रम आहे. अर्थात् या क्रमानें येतां येतां तिच्यांत कित्येक फरक होत गेले. बायबलमधील जेनिसिस् प्रकरणांतील अध्याय ६–९ यांत ती दिली आहे. परंतु हिंदी वाङ्मयांतील

व सुमेरिआंतील कथेंत जितकें संपूर्ण साम्य आहे, तितकें सुमेरी व इतर कथांत नाहीं. कारण हिंदी व सुमेरी लोकांचे पूर्वज एकच असून त्यांचेच दोन भाग हे होत. त्यामुळें त्या दोघांत असलेल्या मूळ कथाभागांत एकरूपता सहजच राहिली. त्यासाठीं आतां त्या प्रलयाची हिंदी कथा आपण अवलोकन करूं. ती कथा शतपथब्राह्मणाच्या आठव्या अध्यायाच्या पहिल्या ब्राह्मणांत दिली आहे, ती मूळ संस्कृतासह भाषांतररूपानें खालीं देत आहे:—

१ मनवे ह वै प्रातः अनवेज्यमुदकमाजन्हु यथेदं पाणिभ्यामवनेजमाया हरन्ति एवं तस्यावनेनिजानस्य मत्स्यः पाणौऽआपेदे ।

( एके दिवशीं प्रातःकाळीं—ज्याप्रमाणें हल्लींहि ( हस्तादि ) मार्जनासाठीं पाणी आणतात त्याप्रमाणें—मनूसाठीं मार्जनाकरितां पाणी आणलें. त्या पाण्यानें तो मार्जन करीत असतां, त्याच्या हातांत एक मासा आला. )

२ सहास्मै वाचमुवाद । बिभृहि मां पारयिष्यामि त्वा इति । कस्मात् मा पारयिष्यसि इति । औघे इमा प्रजाः सर्वाः निर्वोढा अतस्त्वा पारयिताऽस्मीति । कथं ते भृतिरिति ।

( तो मासा म्हणाला:—' माझें तूं पालन कर, मी तुझें रक्षण करीन. ' मनूनें म्हटलें, ' तूं कशापासून माझें रक्षण करिशील ? ' तेव्हां तो मासा म्हणाला ' महापूर येऊन त्यांत सर्व जग वाहून जाणार आहे, त्यांतून मी तुझें रक्षण करीन. ' त्यावर मनु म्हणाला:—' तुझें रक्षण मी कसें करूं ? '. )

३ स होवाच यावद्वै क्षुल्लका भवामो बह्वी वै नः तावन्नाष्ट्रा भवति । उत मत्स्य एव मत्स्यं गिलति । कुंभ्यामाग्रे बिभरासि । स यदा तामातिवर्धाऽथ कर्षूं खात्वा तस्यां मां बिभरासि स यदा तामतिवर्द्धा अथ मा समुद्रमभ्यवहरासि । तर्हि वाऽति नाष्ट्रो भवितास्मीऽति ।

( तो मत्स्य म्हणाला:—' जेथपर्यंत आम्हीं क्षुल्लक ( लहान ) असतों, तेथपर्यंत आम्हांला फार भीति असते; कारण मासाच माशाला गिळतो ! यासाठीं प्रथम तूं मला एका कुंभांत ठेव. तेथें मी ( त्यांत न मावण्यासारखा ) मोठा होतांच, त्यांतून काढून एक खाडा खणून त्यांत मला ठेव. तेथें मी अधिक मोठा झाल्यावर त्यांतून काढून मला समुद्रांत टाक. कारण मग माझा नाश होणें शक्य नाहीं. )

४ शश्वद्ध झष आस । स हि ज्येष्ठं वर्द्धते । अथ इतिथीं समां त दौघ आगन्ता तन्मा नावमुपकल्प्योपासासै सऽओघऽउत्थिते नावमापद्यासै ततस्त्वा पारयितास्मीति ।

( नंतर तो मासा मोठा मत्स्य झाला. कारण माशाची वाढ फार असते. मग तो मनूला म्हणाला:—अमुक अमुक वर्षी महाप्रलय होणार आहे. त्यावेळीं मी तुला सांगतों, त्याप्रमाणें तूं कर. तूं एक नाव बांध व जेव्हां महापूर येईल, तेव्हां तूं त्यांत जाऊन बस. मग मी तुझें रक्षण करीन. )

५ तमेवं भृत्वा समुद्रमभ्यवजहार । स यतिथीं समां परिदिदेश ततिथीं समां

नावमुपकल्प्य उपासांचक्रे । स औघ उत्थिते नावमापेदे । तं समत्स्यऽउपन्यापुप्लुवे तस्य शृङ्गे नावः पाशं प्रतिमुमोच । तेनैतमुत्तरं गिरिमतिदुद्राव ।

( नंतर मनूनें त्या माशाचें तशाप्रकारें संवर्धन केल्यावर त्याला समुद्रांत नेऊन सोडलें. नंतर जितक्या वर्षांनीं महापूर येईल म्हणून त्या माशानें सांगितलें होतें, तितक्याच वर्षांनीं त्या माशाच्या सांगण्याप्रमाणें मनूनें एक नाव तयार केली. मग पूर येतांच तो तींत शिरला. तेव्हां तो मत्स्य पोहत पोहत मनूजवळ आला व आपल्या शृंगाला ( डोक्याला ) त्यानें ती नांव दोरीनें बांधून टाकली व अशा उपायानें त्यानें ती ओढीत उत्तरगिरीच्या टोकावर नेऊन स्थिर केली. )

६ स होवाच । अपीपरं वै त्वा वृक्षे नावं प्रतिबध्नीष्व । तं तु त्वा मा गिरौ सन्तमुदकमन्तश्छैत्सीद् यावद्यावदुदकं समवायात्तावत्तावदन्ववसर्पासीति । तदप्ये तदुत्तरस्य गिरे मनोरवसर्पणमिति । औघो हि ताः सर्वाः प्रजा निरुवाह । अथ इह मनुरेवैकः परिशिशिषे ।

( नंतर तो मत्स्य म्हणाला:—' मी तुझें रक्षण केलें आहे. आतां तुझी नाव वृक्षाला बांधून ठेव, पण पाण्यामुळें पर्वताशीं तुझा संबंध तोडला जाऊं देऊं नकोस. नंतर जसजसा पूर ओसरूं लागेल, तसतसा तूं पर्वतावरून खालीं ये. ' त्याप्रमाणें पुढें पूर ओसरूं लागतांच मनु खालीं उतरूं लागला, व म्हणून त्या उत्तरगिरीवरील त्या उताराला ' मनूचा उतार ' असें नांव तेव्हांपासून पडलें आहे. परंतु तत्पूर्वी त्या महापुरानें सर्व जग वाहून गेलें, व मनु त्या गिरिशिखरावर एकटाच राहिला. )

७ सोऽर्चन् छ्राम्यंश्चचार प्रजाकामः । तत्रापि पाकयज्ञेनेजे । स घृतं दधिमस्त्वा मिक्षामित्यप्सु जुहवां-चकार ततः संवत्सरे योषित्संबभूव । सा ह पिब्दमानेवोदयाय । ......तया मित्रावरुणौ संजग्माते ।

( नंतर त्यानें तेथें पूजा व तप केलें. तसेंच पाकयज्ञ केला, व घृत दधि, तक्र, यांच्या त्या जलांत आहुती दिल्या. त्यापासून एक संवत्सरानें एक सुंदर स्त्री निर्माण झाली, व तिचें शरीर घट्ट होतांच ती त्याच्यापुढें आली. तिला भेटण्यास मित्र व वरुण आले. )

९ तां ह मनुरुवाच कासीऽति । तव दुहितेति । कथं भगवति मम दुहितेति । याऽमूरप्सु आहुतीरहौषीः घृतं दधिमस्त्वामिक्षां ततो मामजीजनथाः । साऽशीरस्मि । तां मा यज्ञेऽवकल्पय । यज्ञे चेद्वै माऽवकल्पयिष्यसि बहुः प्रजया पशुभिर्भविष्यसि । यामु मया कांच आशिषमाशासिष्यसे सा ते सर्वा समर्द्धिष्यतऽइति ।

... ... ... ... ... ... ...

( मनु तिला म्हणाला:—' तूं कोण आहेस ? ' तेव्हां तिनें उत्तर दिलें, ' मी तुझी मुलगी आहे. ' मनु म्हणाला, ' हे भगवति, तूं माझी मुलगी कशी ? ' तिनें उत्तर दिलें:—' तूं जलांत ज्या घृताच्या, दह्याच्या, तक्राच्या वगैरे आहुती दिल्यास, त्यांच्यापासून माझी उत्पत्ति झाली असल्यानें मी तुझी मुलगी आहे. मी प्रत्यक्ष आशी ( वाद ) स्वरूप आहे. माझी यज्ञप्रसंगीं योजना कर, म्हणजे तुला संपत्ति व

पशू यांचा लाभ होईल. जो जो आशीर्वाद तुला हवा असेल, तो तो तुला माझ्यापासून प्राप्त होईल. )

१० तयार्चन् छ्राम्यंश्चकार प्रजाकामः । तया इमां प्रजां अतिप्रजज्ञे येयं मनोः प्रजेति । यामेनया कांच आशिषमाशास्ते साऽस्मै सर्वा समार्ध्यत ।

( त्याप्रमाणें मनूनें तिच्यासहवर्तमान अर्चन, व तप केलें. तिच्यापासून ( तिच्या साह्यानें ) सांप्रतची प्रजा त्यानें निर्माण केली व म्हणून तिला मानव— ( मनूची ) प्रजा असें म्हणतात. त्यानें जे जे आशीर्वाद मागितले, ते ते सर्व तिच्या साह्यानें त्याला संप्राप्त झाले. )

अशा प्रकारची ही जलप्रलयाची हिंदी कथा वेदांतील ब्राह्मणभागांत अनुस्यूत केली आहे. हिच्यांत व सुमेरी कथेंत साधर्म्यवैधर्म्य पहातां, सुमेरी कथेंतील पीर–नापिश्तिमूला महापुराची अगाऊ सूचना देणाऱ्या इआ देवाच्याऐवजीं भारती कथेंत तें कार्य मत्स्यानें केलेलें दाखविलें आहे, व शेवटीं उत्पन्न झालेल्या स्त्रीस सुमेरी कथेंत पीर–नापिश्तिमूची पत्नी म्हटलें आहे, त्याच्याऐवजीं भारती कथेंत ती स्वतः मनूला आपण त्याची दुहिता असल्याचें सांगत आहे. एवढाच काय तो फरक आहे. या वैधर्म्याखेरीज बाकीचें सर्वच साम्य आहे व तें इतकें आश्चर्यकारक आहे कीं, एकवंशोद्भवत्वाशिवाय त्याची समाधानकारक उपपत्ति लागणें शक्यच नाहीं ! फार काय, वरील जलप्रलयाच्या कथेंतहि जो एक फरक म्हणून वर नमूद केला आहे, तो सुद्धां वस्तुतः फरक नाहीं. पीर–नापिश्तिमूला महापुराची अगाऊ कल्पना इआ देवानें दिली व मनूला मत्स्यानें दिली, असा बाह्यतः फरक दिसतो; पण हा इआ देवहि मुळांत मत्स्यावतारच होता. मॅकेंझी हा ग्रंथकार म्हणतोः—" Originally Ea appears to have been a fish--the incarnation of the spirit of or life-principle in the Euphrates river " मुळांत इआ हाहि मासाच होता–युफ्रेटिस् नदीचें प्राणस्वरूपच त्याच्या नांवानें वर्णिलें आहे. " कारण सुमेरी वाङ्मयांत युफ्रेटिस् नदींतच इआचें वास्तव्य वर्णिलें आहे, तें असेः—

Oh thou river, who didst create all things,
When the great Gods dug thee out,
They set prosperity upon thy banks,
Within thee Ea, the king of the Deep, created his dwelling.

जलप्रलयासारख्या सृष्टिनाशदर्शक व त्यापुढील सृष्ट्युत्पत्तिदर्शक कथा या त्या त्या देशांतील समाजाच्या आधारभूत मूळ कल्पना असतात; अर्थात् त्यांच्यांतील साम्य, म्हणजे स्थलदर्शक व वंशदर्शक एकत्वाचा निःसंदिग्ध पुरावा होय.

या जलप्रलयकथेच्या साम्यानंतर वर्णन करण्यासारखें साम्य म्हटलें म्हणजे हिंदी व सुमेरी या दोन्ही संस्कृतींतील युगांच्या कल्पनेंतील होय. आपल्याइकडील लोकांना ही युगकल्पना अगदीं नित्य परिचयाची असल्यानें सहज ध्यानांत येण्यासारखीं आहे.

एकदां महाप्रलय होऊन गेल्यानंतर सृष्टीची पुनरुत्पत्ति होते, त्यावेळीं प्रथम कृतयुगाला सुरुवात होते. त्यानंतर त्रेतायुग, त्यानंतर द्वापर व अखेर कलियुग, याप्रमाणें चार युगें एकामागून एक अनुक्रमानें येतात. कलियुग संपल्यानंतर पुन्हा जलप्रलय होतो व त्यानंतर पुन्हा सृष्ट्युत्पत्ति झाल्यावर पुन्हा कृत-त्रेता-द्वापर-कलि या क्रमास सुरुवात होते. यांपैकीं कलियुग ४३२००० वर्षांचें मानलें गेलें आहे, व तत्पूर्वीचेंदरेक युग पुढल्याच्या गणितिश्रेढीनें बनणाऱ्या वर्षसंख्येचें दर्शविलें आहे.

हुबेहुब अशाच प्रकारची कालगणनापद्धति सुमेरिआंत होती ! यासंबंधानें मॅकेंझी म्हणतो:—

" The Sumerian Lunar Zodiac contained thirty moon-chambers. The chiefs of the thirty numbered twelve. In this system the year began in the winter solstice.........

Multiplying 6 by 10 ( **pur** ), they arrived at 60 (**soss**); 60 x 10 gave him 600 ( **ner** ), and 600 x 6, 3600 ( **sar** ), while 3600 x 10 gavehim 36000,and 36000 x 12 = 432000 years or 120 **saroi**, which is equal to the '**sar**' multiplied by the '**soss**' x 2 "

**अर्थ**:—सुमेरी राशिचक्राचे प्रथम तीस भाग ( नक्षत्रें ) चंद्रगृहें म्हणून केले होते. त्या तीसांची वाटणी बारा राशीस्वामींत केली होती. ( टीपः—हिंदी पद्धतींत सत्तावीस नक्षत्रें असून त्यांची वाटणी बारा राशिस्वामींत केलेली आहे. म्हणजे दरेक सुमेरी राशींत २॥ नक्षत्रें येतात, तर दरेक भारती राशींत २। येतात. ) सुमेरी वर्षांचा आरंभ नेहमीं उत्तरायणाबरोबर होत असे. त्यांच्यांतील संख्येच्या गणकांचीं विशिष्ट नांवें असत. दहा या संख्येला ते ' पुर ' म्हणत. ६x१० ( पुर )=६० या संख्येला ते ' सॉस् ' असें म्हणत. ६० ( सॉस् ) x १०=६०० ( नेर ); ६००x६=३६०० ( सार ); ३६००x१०=३६०००; ३६०००x१२=४३२०००. इतक्या वर्षांचें त्यांचें युग होई. या संख्येला ते १२० ' सरोई ' इतकी संख्या, असें ते म्हणत; कारण सर=३६००x६० ( सॉस् ) x२=४३२०००. असें गणित ते करीत.

अर्थात् त्यांच्यांतील एका युगाची वर्षसंख्या बरोबर आपल्याइकडील कलियुगाच्या वर्षसंख्येइतकीच येते. यावरून R. Brown हा ग्रंथकार म्हणतो.

" The Indian system of the yugas, or ages of the world, presents many features which remind us forcibly of the Euphratean scheme. They had ten anti-diluvian kings, who were reputed to have reigned for vast periods, the total of which amounted to 120 saroi or 432000 years. These figures at once recall the Indian yuga of 432000 years. **Apparently the Babylonian and Indian system of calculations were of common origin.**

**अर्थ**:—हिंदी कालगणनेच्या युगपद्धतींशीं सुमेरिअन पद्धतींचें अत्यंत साम्य आहे. सुमेरी दंतकथेप्रमाणें त्यांच्यांत महाप्रलयापूर्वी दहा राजांनीं राज्य केलें. त्या दरेकाची कारकीर्द हजारो वर्षांची दाखविली आहे व त्या दहांहि राजांनीं मिळून ४३२००० वर्षें एकंदर राज्य केल्याचें वर्णन केलें आहे. हा आंकडा पहातांच हिंदुस्थानांतील युगाच्या वर्षसंख्येचें एकदम स्मरण होतें. **अर्थात् हिंदी व सुमेरी**

**युगपद्धतीच्या कालगणनेचा मूळ एकच आधार असला पाहिजे हें उघड होतें.**

ब्राऊनच्या या निष्कर्षापेक्षां आमच्या या लेखमालेंतील मौलिक सिद्धांताला अधिक महत्त्वाचा पोषक आधार दुसरा कोणता पाहिजे ?

या युगपद्धतीनंतर ओघानेंच साम्यवर्णनदृष्ट्या हिंदी व सुमेरी पद्धतींतलि ज्योतिषविषयक साम्य येतें. या साम्याची सर्वसाधारण कल्पना येण्याइतकी माहिती या मालेच्या पहिल्याच लेखांकांत दिली आहे. येथें तद्व्यतिरिक्त अधिक सूक्ष्म अशी थोडीशी माहिती देत आहे.

अगदीं आद्य अशा ज्ञातकालापासून सुमेरिअन लोकांना आकाशांतील ग्रहांची व ताऱ्यांची चांगली माहिती होती. पृथ्वी सूर्याभोंवती फिरते हा सिद्धांत अर्थात्च त्यांना माहीत नव्हता; त्यांची समजूत अशी असे कीं, सूर्य हा पृथ्वीभोंवतीं एखाद्या उडत्या पक्ष्याप्रमाणें अथवा एखाद्या नावेप्रमाणें फिरत असतो. त्याच्या फिरण्याची दिशा नेहमीं पश्चिमेकडून पूर्वेकडे अशी असते व असा फिरत असतां तो दक्षिणोत्तर असा घड्याळ्याच्या लंबकाप्रमाणें हेलकावे खातो, हें त्यांच्या ध्यानांत आलें होतें. पृथ्वीभोंवतींच्या या सूर्याच्या मार्गाला त्यांनीं circle of Necessity, 'अपरिहार्यवर्तुल' असें नांव दिलें होतें. हेंच क्रांतिवृत्त होय. या क्रांतिवृत्ताचे सुमेरी ज्योतिषांनीं बारा भाग पाडले होते. त्याच राशी होत. या राशींत सूर्याचा प्रवेशकाल, त्या राशींचीं सुमेरी नांवें व वर्णन व त्यांचीं अर्लाकडील नांवें खालील कोष्टकांत दिलीं आहेत.

| अनुक्रम | अर्वाचीन राशिनामें | सूर्यप्रवेशाचा दि. व म. | सुमेरी वर्णन |
|---|---|---|---|
| १ | मेष ( एडका ) | २० मार्च ऊर्फ निसान ( सुमेरी ). | दूत |
| २ | वृषभ ( बैल ) | २० एप्रिल " अय्यर | स्वर्गांतील बैल. |
| ३ | मिथुन ( स्त्री-पुरुषयुग्म ) | २१ मे " सिव्वान् | दोन जुळीं मुलें. |
| ४ | कर्क ( खेकडा ) | २१ जून ऊर्फ तम्मूझ | खेकडा. |
| ५ | सिंह ( सिंह ) | २२ जुलै " आब् | जंगी कुत्रा ( सिंह ). |
| ६ | कन्या ( स्त्री ) | २३ ऑगस्ट " एलूल् | हातांत धान्याचें कणीस धारण करणारी स्त्री. |
| ७ | तुला ( तराजू ) | २३ सेप्टेंबर " तिश्री | तराजू. |
| ८ | वृश्चिक ( विंचू ) | २३ आक्टोबर " मार्चेस्वान् | तमोमय वृश्चिक. |
| ९ | धनु ( धनुर्धारी पुरुष ) | २२ नोवेंबर " चिश्लू | अर्धाश्व-अर्धनर, धनुर्धारी. |
| १० | मकर ( बोकड ) | २१ डिसेंबर " तेबेत | इआ देवाचा 'अर्धा-बोकड, अर्धा-मासा, असा प्राणी. |
| ११ | कुंभ ( कुंभधरपुरुष ) | १९ जानेवारी " सेबात | कुंभ धारण करणारा देव. |
| १२ | मीन ( मासे ) | १८ फेब्रुआरी " आदर् | कालव्यांतील दोन मासे. |



**सुमेरी राशींचें चित्र.**

[ या चित्रांत सुमेरी राशींची चित्रें दिलीं आहेत. वरच्या भागांत डाव्या हाताला पहिल्यानें कुंभ-( धर पुरुष ) असून, त्याच्या शेजारीं बकरा मकराकृतीचा दर्शक आहे. त्याच्या पुढें हातांत धनुष्यबाण घेतलेला अर्ध-नर आहे. खालच्या भागांत खेकडा ( कर्क ), सिंह, वृश्चिक, वृषभमधील बैलांचीं शिंगें डाव्या बाजूच्या कोपऱ्यास दिसत आहेत. इतर एकदोन आकृत्या आहेत, त्या अस्पष्ट आहेत. ]

राशींच्या या चित्रांवरून व वर्णनावरून सांप्रतच्या एका महत्त्वाच्या वादाचा मात्र उत्तम रीतीनें निकाल लागतो. त्याचा उल्लेख येथें करणें अवश्य आहे. तो वाद म्हणजे सायन-निरयण-वाद होय. ग्रीक लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी आपल्यामध्यें राशी नव्हत्या, ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. ख्रिस्तपूर्व ४ थ्या अथवा पांचव्या शतकांत हल्लींच्या स्वरूपांत महाभारताचें शेवटचें संस्करण झालें, त्यांत राशीचा उल्लेख नाहीं, परंतु त्यानंतर थोड्याच दिवसानंतर झालेल्या बौधायनाचें ' मीनमेषयोर्वसन्तः ' हें वचन कालमाधवांत दिलेलें आहे; त्याचप्रमाणें हल्लींच्या स्वरूपांत वाल्मीकिरामायणाचें संस्करण ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत झालें, त्यांतहि रामाचा जन्मकाल राशीमानांत दिलेला आहे. या सर्वांवरून राशींचा हिंदुस्थानांतील प्रवेशकाल निश्चित करतां येतो. या राशी ग्रीस देशांतून हिंदुस्थानांत आल्या, इतकी गोष्ट आजपर्यंत ज्ञात होती.

परंतु ग्रीसमध्यें त्या कोठून व कशा आल्या हें मात्र नक्की झालें नव्हतें; तें आतां या सुमेरी वाङ्मयाच्या शोधनानें कळून आलें. तथापि ज्या अर्थी या राशी हिंदी वैदिक वाङ्मयांत नाहींत, त्या अर्थी सुमेरी व हिंदी अशा शाखा मूळ उत्तरध्रुवस्थ मानव-वंशाच्या पडून त्या त्या देशांत त्या स्थिर झाल्यानंतर, सुमेरियांत राशींची कल्पना आली, हें उघड आहे. तथापि राशींचा मूळाधार असलेल्या चक्राचा आरंभ सूर्य प्रत्यक्षतः सायनगणनेप्रमाणें ज्यावेळीं नवीन राशींत प्रवेश करितो, त्यावेळीं झालेला सुमेरियांत मानलेला आहे. यावरून प्राचीन काळचा आधार पहातांहि पूर्वीची कालगणना निरयण अथवा स्थिरतारात्मक नसून सायन अथवा प्रत्यक्षमूलक होती हें निश्चित होतें. असो.

याप्रमाणें सुमेरियांतील राशीवर्णन केल्यावर थोडेसें आपण ग्रहांच्या संबंधाच्या माहितीकडे वळूं. यांची संख्या सात असल्याबद्दल त्यांची अत्यंत प्राचीनकाळापासून समजूत असून त्यांचे स्वभावधर्महि प्रसिद्ध होते. रवि व चंद्र यांचें वर्णन मागें येऊन गेलेंच आहे. बुधाचें नांव मूळ सुमेरी भाषेंत नेबो व बॅबिलोनी भाषेंत गुदुद् असें आहे. व तो देवांचा दूत आहे अशी समजूत होती. त्याचप्रमाणें ज्ञाता अथवा ज्ञ ( ज्ञो बुधः ) म्हणजे मनुष्यजातीचा शिक्षक ('Instrunctor of mankind') आहे असेंहि मानण्यांत येई. मंगळाचें नांव नेरगाल अथवा मुस्तबरु असेंहि होतें. हा ग्रह ( ' planet of evil, plague and death ' ) दुःख, रोग, व मृत्यु यांचा दर्शक मानला जाई. गुरूला उमुन्पाडु म्हणत व त्यालाच पुढें मर्डुक असेंहि म्हणत. म्हणजे इंद्रसमान मर्डुक व गुरु यांच्या गुणधर्मांचें मिश्रण त्यांत झालेलें आहे. शुक्राला दिल्बत् म्हणत व त्याचें इश्तर देवीशीं ऐकात्म्य मानलेलें आहे. हा ग्रह शुभ मानलेला असे. शनीला सुमेरी भाषेंत निरिगु अथवा निनिप् म्हणत व पुढें त्यासच कैमनु असें नांव बॅबिलोनी भाषेंत पडलें. हा दुःख व संकटें दर्शवितो. प्लूटार्क या ग्रंथकारानें वरील सातहि ग्रहांचा अंमल जन्मकालीं मनुष्यावर होत असल्याबद्दल खाल्डियन (सुमेरी) लोकांत असलेल्या समजुतीचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. तो म्हणतोः—

" Respecting the planets which they call the **birth-ruling divinities**, the chaldeans lay down, that the two planets Venus and Jupiter are propitious, and the two ( Mars and Saturn ) malign and the three ( sun, moon and mercury ) of a middle nature and common, i. e. these are propitious with the good and malign with the bad. "

" सप्तग्रहांना खाल्डिअन लोक जन्मकालाधिष्ठात्र्या देवता मानीत. त्यांपैकीं गुरु व शुक्र हे ग्रह त्यांच्या मतें शुभ असत, शनि व मंगळ पाप असत व बाकीचे तीन ( रवि, चंद्र, व बुध ) मध्यम असत, म्हणजे शुभग्रहाच्या संबंधानें ते शुभफल देतात व पापग्रहांच्या संयोगानें पापफल देतात. "

आपल्या इकडील ज्योतिषांतहि सातच ग्रह मानीत. त्यांपैकीं रवि, व चंद्र हे दोन स्वतंत्र वर्णिले असून बाकींच्या पाचांचा उल्लेख ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या १०५ सूक्तांत आलेला आहेः-

अमी ये पंचोक्षणो मध्ये तस्थुः महो दिवः ।

हे महाप्रबल पांच देव विस्तीर्ण अशा द्युलोकांच्या मध्यभागीं असतात, असें त्यांत म्हटलें आहे. त्यानंतरच्या अथर्वज्योतिषांत त्यांचा सप्तग्रह म्हणून स्पष्ट उल्लेख असा केला आहेः—

आदित्यः सोमोभौमश्च तथा बुधबृहस्पती । भार्गवःशनैश्चरश्चैव एते सप्त दिनाधिपाः ॥ ९३.

आद्यवेदकालापासून ख्रिस्तोत्तर पांचव्या शतकांतील वराहमिहिरापर्यंत सातच ग्रह मानीत असत. त्यानंतर राहुकेतु कुंडलींत मांडण्याची चाल सुरू झाली. वराहमिहिरानें सुमेरी ज्योतिषांप्रमाणेंच ग्रहांचें शुभाशुभत्व मानलें होतें. त्याच्याहि मतें गुरु व शुक्र शुभ, शनि व मंगळ पाप आणि बुध हा 'बुधस्तैर्युतः ।' म्हणजे ज्याच्याशीं युत असेल तसा, असेंच वर्णन केलें आहे.

निरनिराळ्या ग्रहांचें रंगहि सुमेरी ज्योतिषांत ठरविले होते, ते असेः—

सूर्य–सोनेरी, चंद्र–रुपेरी, मंगळ–लाल, बुध–निळा, गुरु–नारिंगी, शुक्र–पीत, शनि–कृष्ण.

आपल्याकडील ग्रहांचे रंग बृहज्जातकाच्या खालील श्लोकांत वर्णिले आहेत.

रक्तश्यामो भास्करो गौर इंदुः । नात्युच्चांगो रक्तगौरश्च वक्रः ॥
दूर्वाश्यामो ज्ञो गुरुर्गौरगात्रः । श्यामः शुक्रो भास्करिः कृष्ण देहः ॥ १ ॥

अर्थः—सूर्याचा वर्ण गाहिरा तांबडा, चंद्राचा गौर, मंगळाचा रक्तगौर, बुधाचा दूर्वेच्या रंगाचा हिरवट काळा, गुरूचा गोरा, शुक्राचा तेजस्वी श्याम ( निळसर ) व शनीचा कुळकुळीत काळा.

सुमेरियांत ग्रहणांचीं भविष्येंहि वर्तविलीं जात असत. बॅबिलोनियांतील निनेव्हे शहरांतील वेधशालेंतून घेतलेले वेध व त्यांची फळें त्या काळीं राजाकडे पत्रद्वारें पाठविलीं जात. अशा पत्रांपैकीं एक पत्र विटांवर कोरलेलें अस्सल उपलब्ध झालें आहे, त्यांतील मजकुराचें शब्दशः इंग्रजी भाषांतर प्रो. हार्पर यानें प्रसिद्ध केलें आहे. ते येणेंप्रमाणेंः—

As for the eclipse of the Moon about which, the king. my lord, has written to me, a watch was kept for it in the cities of Akkad, Borsippa and Nippur. We observed it ourselves in the city of Akkad. And whereas, the king ,my lord, ordered me to observe also the eclipse of the Sun, I watched to see wheather it took place or not, and what passed before my eyes. I now report to the king, my lord. It was an eclipse of the Moon that took place.

अर्थः—" महाराजांनीं आम्हांस चंद्रग्रहणाचा वेध घेऊन त्याबद्दल निवेदन करण्याची आज्ञा केल्यावरून कळविण्याचें कीं, स्वामींच्या आज्ञेप्रमाणें अक्कड, बोरसिप्पा व निप्पूर या तिन्ही वेधशालांमध्यें वेध घेण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. आम्ही स्वतः अक्कड येथील वेधशाळेंतून निरीक्षण करीत होतों. या उपरीं, महाराजांनीं सूर्य ग्रहणाचेहि वेध घेण्याचें फर्माविल्यावरून तें ग्रहण लागलें किंवा नाहीं याचें आम्ही निरीक्षण केलें. त्यावरून आमच्या नेत्रांना जें दिसलें तें कळविण्याचें कीं, ( सूर्यग्रहण लागलें नसून ) चंद्राचें खग्रास ग्रहण मात्र लागलें होतें. "

सुमेरियांतहि आपल्याप्रमाणें अशी समजूत असे कीं, पुण्यवान् मानव स्वर्गस्थ झाल्यावर ते तारकारूपानें राहतात. ध्रुवाची गोष्ट आपल्याकडे प्रसिद्धच आहे. सप्तर्षि व वसिष्ठपत्नी अरुंधती अजूनहि आकाशांत सप्तर्षि-तारारूपानें अमर राहिल्याची आपली समजूत आहे. सुमेरियांतहि इश्तरचें शुक्रताऱ्याशीं याच प्रक्रियेनें एकीकरण झालेलें आहे.

याप्रमाणें ज्योतिषविषयक माहितीबद्दल विवेचन केल्यानंतर आतां आपण देवत्व विषयक वर्णनाकडे वळूं. या मालेंतील दुसऱ्या लेखांकांत वरुणाचें बेल् या देवतेशीं-असलेलें साम्य वर्णन केलेंच आहे. तथापि बेल् हें नांव बॅबिलोनिअन् आहे. त्या देवतेचें खरें सुमेरी नांव इआ आहे. आपल्याइकडील वरुण हा जलदेवता असून, तो जलांत राहतो, त्याच्या आज्ञेनेंच नद्या पाण्यानें भरून वाहूं लागतात ( ऋ. २-२८-४. ), मीत्र व वरुण हेच नद्यांचे अधिपति होत. ( ऋ. ६-६४-२ ), वरुण हा जलांतून मार्गक्रमण करितो (ऋ. १-१६१-१४), वरुण हा सिंधूमध्यें उतरतो (ऋ. ७-८७-६), मनुष्याचें सत्यासत्य आचरण अवलोकन करीत तो मधूर व स्वच्छ अशा जलांमधून फिरतो ( ऋ. ७-४९-३ ), तो जलांचें वस्त्र अंगावर घेतो ( ऋ. ९-९०-२ ) त्याचें सुवर्णगृह जलांमध्यें आहे ( ऋ. ७-८३-१ ), इत्यादि अनेक सूक्तांतून त्याचें जलस्वामित्व वर्णिलेलें आहे. सुमेरी वाङ्मयांतहि इआ हा 'King of the watery Deep' आहे असें म्हटलें आहे. विशेषतः प्रो. जॅस्ट्रो यानें म्हटल्या-प्रमाणें—"This reference is not to the salt ocean but the sweet waters which feed the streams and irrigate the fields." ( हा जलाचा संबंध समुद्राच्या खाऱ्या पाण्याचा दर्शक नसून वाहणाऱ्या व शेतें पिकविणाऱ्या मधुर जलांचा दर्शक आहे. ) या दृष्टीनें वरुण हा मधुर व स्वच्छ जलांत फिरतो, असा जो वर वैदिक संदर्भ दिला आहे, तो मननीय आहे. मॅकेंझी म्हणतो:—'As the country was fertilized by the rivers, Ea, the fish god was a fertilizing diety.' 'त्या प्रदेशांतील पिकें नदीच्या पाण्यावर होत असल्यानें, इआ हा शेतें पिकविणारा मत्स्य देवतादर्शक आहे,' हा उल्लेखहि वरील तत्समान वैदिक वरुणाच्या उल्लेखाशीं अगदीं समानार्थक असल्याचें दिसून येईल. 'Ea knoweth everything' ( इआ सर्वज्ञ आहे ); He was lord of the world, lord of what is beneath, lord of heaven and earth. वगैरे वर्णनें बरोबर वरुणाच्या वर्णनाशीं समानार्थक आहेत.

यानंतर सूर्यदेवतेचा विचार करूं. त्याचें वर्णन सुमेरी लिखाणावरून असें केलें आहे:—

He was a god of Destiny, the lord of the living and the dead was exalted as the great judge, the law giver, who upheld justice; he was the enemy of wrong,he loved righteousness, and hated sin;he inspired his worshippers with the rectitude and punished evil-doers he illuminated all the world and his rays penetrated every quarter; he saw all things , he read the thoughts of all men, & nothing could; be concealed from Shamsh.

या इंग्रजी उताऱ्यांतील दरेक गुणवाचक शब्दाला वेदांतलि सूर्यविषयक सूक्तें काढून दाखवितां येतात. उदाहरणार्थः—सूर्य हा सर्व स्थिरचराचा आत्मा आहे ( ऋ. १–११५–१ ), तो नियमानें चालतो ( ऋ. ४–५४–४ ), सर्व देव व प्राणी त्यानें घालून दिलेल्या नियमानें चालतात ( ऋ. ५–८१–३ ), त्याला आकाशाच्या, पृथ्वीच्या आणि जलाच्याहि पलीकडलि दिसतें ( अ. वे. १३–१–४५ ), तो सर्व जगाची टेहळणी करणारा आहे व त्याला मर्त्यांचीं चांगलीं व वाईट सर्व कृत्यें दिसतात. ( ऋ. १–५०–७ ), सूर्य मनुष्याला प्रेरणा देतो ( ऋ. ७-६३-४ ), इत्यादि समानार्थक उतारे अगदीं भाषांतरासारखे आहेत.

**सर्वांत अत्यंत महत्त्वाचा नवीन शोध हा आहे कीं, सुमेरी भाषेंतहि शम्स् सूर्यदेवतेचें एक नांव मित्र हें आहे.** मर्डुकचा शत्रु जो तैमात, त्याचें नांव अगदीं शब्दशः अथर्ववेदांत अनुस्यूत झाल्याने हिंदी व सुमेरी कथांच्या संबंधाचा धागा उकलण्यास कै. लो. टिळकांना जी अत्यंत महत्त्वाची मदत झाली आहे, तितकीच महत्त्वाची मदत **मित्र** हें संस्कृत सूर्यवाचक नांव सुमेरी वाङ्मयांत **शब्दशः** त्याच देवतेला लावून त्या दोनहि संस्कृतींनीं शब्दांचा व विचारांचा विनिमय केल्याच्या शोधानें होणार आहे.या संबंधानें मॅकेंझीनें म्हटलें आहेः—"One of the names of Shamsh was MITRa, like the god who was linked with Varuna in the Indian Rig-Veda." ( शम्स् या सूर्यदेवतेचें एक नांव **मित्र** असेंहि आहे; हेंच नांव हिंदी ऋग्वेदांतील 'मित्रावरुणौ' या शब्दयुग्मांत दर्शविल्याप्रमाणें वरुणाशीं नित्य संबद्ध असलेल्या सूर्यदेवतेचेंहि आहे. ) सन १९०७ सालीं बोगाझकोई या गांवीं ह्यूगो विंक्लर या जर्मन संशोधकाला सांपडलेल्या एका लेखांत ख्रि. पू. १८०० वर्षांपूर्वी आशियामायनरमधील मिटानी या प्रांतावर राज्य करणाऱ्या हिटाइट लोकांच्या देवांच्या नांवांत मित्र, वरुण, इंद्र, नासत्य हीं नांवें सांपडलीं, त्यावरून मित्र या नांवाचा एक देव हिटाईट लोकांत होता, इतका शोध लागलाच होता; परंतु त्याच्याहि पूर्वीच्या काळीं प्रत्यक्ष सुमेरी वाङ्मयांत सूर्यालाच लावलेल्या मित्र या शब्दानें सुमेरी व हिंदी संस्कृतीचें एकत्व अभेद्य पायावर आधिष्ठित केलें आहे. किंग हा ग्रंथकार म्हणतोः—

The senetio Babylonians learnt from the Sumerians the art of writing. They took their Gods from them or adopted them; they also took their ideas of the creation of the world. We know that, at the time of Hammurabbi, the senetic seribes copied out and studied Sumerian religious texts.

( सेमेटिक मानव-वंशाच्या बॅबिलोनिअन लोकांनीं सुमेरिअन लोकांपासूनच लेखनकला उचलली, व त्यांचे देवहि आत्मसात् केले. हम्मुरब्बीच्या काळीं ( ख्रि. पू. ३००० ) प्राचीन सुमेरिअन लोकांच्या धर्मग्रंथांच्या नकला लेखकांकरवीं सेमेटिक लोकांनां उतरून घेऊन त्यांचें अध्ययन केल्याची माहिती मिळत आहे. )

यावरून उघड होतें कीं, सुमेरी व हिंदी या उभय संस्कृतींत असलेल्या कल्पनाच सुमेरी लेखांवरून पुढें परंपरेनें युरोपांत गेल्या आहेत.

वरील मुख्य मुख्य देवांच्या वर्णनानंतर देवींच्या वर्णनाकडे वळतां असें दिसतें कीं, आद्य सुमेरी कालांत आपल्या इकडील वैदिककालाप्रमाणेंच स्त्रीदेवतांना फारसें महत्त्व नसे. वेदांत सृष्टिविषयक कल्पना म्हणून फक्त उषेचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें सुमेरियांतहि स्थिति असे. किंग म्हणतोः—

The Goddesses, with one exception, are not very imposing figures nor are their characters very sharply defined or differentiated.

स्त्री देवतांना—एक इश्तर देवतेखेरीज करून फारसें महत्वहि नसे, व त्यांच्या गुणधर्मांत स्पष्ट असा फरक केलेलाहि आढळत नाहीं. इश्तर देवतेला मात्र फार महत्त्व दिलेलें आहे. त्या काळचें, इश्तर देवतेची एक स्त्री पूजा करीत असल्याचें एक कोरलेलें चित्र उपलब्ध झालें आहे, तें येथें देत आहे.



**इश्तर देवीचें चित्र.**

[ या चित्रांत सुमेरी देवी इश्तरच्या हातांत धनुष्यबाण असून तिनें मुकुट घातला आहे. तिच्या पायाखालीं सिंह आहे. तिच्या पाठीवरून उजव्या खांद्यावर आलेला बाणांचा भाता आहे. मागें झाड आहे. तिच्या पुढें एक स्त्री पूजनासाठीं उभी आहे. इश्तर हिचें हें ध्यान युद्धयमान आहे, तथापि सुमेरी वाङ्मयांत ती शांत व वरदायिनी अशीहि दाखविली आहे. यावरून आपल्याइकडील दुर्गेप्रमाणें तिची कल्पना असावी असें वाटतें. ]

आपल्याकडील इंद्राणीप्रमाणें तिकडील मर्डुकची स्त्री त्सर्पानिता इला फारसें महत्त्व नसे. त्याचप्रमाणें शम्स् (सूर्य) ची बायको ऐ, सिन् (चंद्र) ची बायको निंगाल, रम्मान् ( गुरु ) ची बायको शाला, नेरगाल ( यम ) ची बायको लाज, व इआ ( वरुण ) ची बायको डमूकिना, यांना फारशी प्रतिष्ठा दिलेली नाहीं.

याशिवाय एका देवाचें वर्णन अर्थसाम्याच्या दृष्टीनें मनोरंजक वाटण्यासारखें आहे. तो देव झ्यु हा गुरुडपक्षी होय. तें वर्णन असें:—एटाना नांवाचा एक राजा होता. त्याची बायको गरोदर झाली. परंतु, मुलाचा जन्म कांहीं केल्या होईना. तेव्हां त्यासाठीं 'अमृतवल्ली' आणावयास पाहिजे होती. ती आणण्याचें काम झ्यु या गरुडपक्ष्याशिवाय दुसऱ्या कोणाच्यानेंहि होण्यासारखें नव्हतें. झ्यूची व एटनाची मैत्री असल्यामुळें त्यानें तें काम करून दिलें. परंतु तें करितांना त्यानें, सर्पाच्या मातेनें आपलीं पिल्लें ठेविलीं होतीं, तेथें जाऊन त्यांना त्रास दिला; कारण त्यापूर्वी तिनें झ्यूला दुखविलें होतें. तथापि त्या वेळीं याहून अधिक प्रसंग कांहीं घडला नाहीं. झ्यूनें 'अमृतवल्ली' आणल्यावर एटानाच्या पत्नीची प्रसूति होऊन तिला मुलगा झाला व तो सुखरूप राहिला. त्यानंतर एकदां एटानाच्या मनांत स्वर्गांत जावें असें आलें. तेव्हां तो झ्यूच्या पंखांना लोंबकळून राहिला व झ्यूनें उडून स्वर्गारोहण केलें. स्वर्गद्वाराशीं प्रवेश करितांच तेथील तेजःप्रकाशानें एटाना भयभीत झाला व देवांच्या सिंहासनापाशीं तो दंडवत् पडला. तथापि त्याला झ्यूनें सावध करून त्याहून उंच चलण्यास अधिक उत्तेजित केलें त्याप्रमाणें तो झ्यूला धरून आकाशांत उडूं लागला, वर जातां जातां त्याला पृथ्वी जोरानें खालीं खालीं जात आहे व लहान लहान होत आहे. असें भासूं लागलें. जणूं काय पृथ्वी वरून खालींच फेंकली जात आहे. स्वर्गारोहणाच्या वेळचें हें रम्यकल्पनात्मक वर्णन वाचणाराला, असेंच सुंदर पण याच्या उलट वर्णन कालिदासानें आपल्या शाकुंतल नाटकाच्या सातव्या अंकांत स्वर्गावतरण करणाऱ्या दुष्यन्ताच्या तोंडीं घातलें आहे, त्याचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं. दुष्यंत वर्णन करितो कीं:—

**शैलानामवरोहतीव शिखरादुन्मज्जतां मेदिनी ।**
**पर्णाभ्यन्तरलीनतां विजहति स्कन्धोदयात्पादपाः ॥**
**संतानैस्तनुभावनष्टसलिला व्यक्तिं भजन्त्यापगाः ।**
**केनाप्युत्क्षिपतेव पश्य भुवनं मत्पार्श्वमानीयते ॥ १ ॥**

त्यानंतर त्यांना अनु, बेल् वगैरे देवांचे लोक दिसूं लागले. तथापि तेवढ्यानेंहि एटानाची महत्त्वाकांक्षा तृप्त न झाल्यानें त्याहि लोकांच्या वर असलेल्या इतर देवांच्या लोकापर्यंत घेऊन जाण्यासाठीं त्यानें झ्यूची प्रार्थना केली. परंतु आणखी कांहीं अंतरापर्यंत गेल्यावर मग त्याच्यावर मात्र झ्यूच्यानें जाववेना; तेव्हां झ्यू व एटाना असे दोघेहि एकदम खालीं पडले त्यानंतर एका प्रसंगीं पूर्वीचें वैर साधण्यासाठीं सर्पांचा नाश करण्याचे हेतूनें. झ्यू निघाला. सुमेरी पुराणांत याबद्दलच वर्णन असें दिलें आहे:—

His heart prompted the Eagle,
He considered and his heart wished
To eat the young of the serpent.
The Eagle opened his mouth and spake unto his young
Saying, the young of the sarpent, I will eat.
I will ascend and mouth up into Heaven;
I will swoop down upon the top of a tree and I will eat the brood.

... ... ... ... ... ... ...

He swooped down and ate the young of the serpent.
( भाषांतरः—त्या गरुडाला अशी इच्छा झाली कीं, सर्व सर्पाचें कुळ भक्षण करून टाकावें. तेव्हां त्यानें आपलें तोंड उघडलें व तो त्या सर्पाच्या पिल्लांना म्हणाला, ' मी आतां आकाशांत उंच उडून एकदम खालीं झडप मारीन व तुम्हांला खाऊन टाकीन. ' त्याप्रमाणें खरोखरींच त्यानें वर उंच उडून खालीं झडप घातली, व तीं सर्व सापांचीं पिल्लें खाऊन टाकलीं. )

ही कथा वाचतांच सहज हिंदी गरुडाचें स्मरण होतें. आपली माता विनता इच्या सुटकेसाठीं पण केल्यावरून गरुडानें ' अमृत कलश ' आणणें, तो आणतांना सर्पमाता व त्याची सापत्नमाता कद्रू इच्याशीं व तिच्या पिल्लांशीं त्याचा विरोध होणें, त्यानें तीं भक्षण करणें, वगैरे भाग दोन्ही कथांत सारखे आहेत. मात्र सुमेरी कथेंत झ्यूचा उत्तरभाग वाईट दाखविला आहे. तीत पुढें असें वर्णन केलें आहे कीं, आपलीं सर्व पिल्लें झ्यूनें खाऊन टाकल्यामुळें सर्पमातेनें सूर्याजवळ तक्रार नेली, व सूर्यानें तिला मदत करून झ्यूचा नाश करविला.

अशा रीतीनें या दोनहि कथांतलि वैधर्म्य असलें तरी, त्यांचें मूळ कांहीं तरी एक असण्याचा पुष्कळ संभव दिसतो. कालांतरानें देशपरत्वें त्यांत पुढें फरक झाला असावा. सुमेरी गरुडाचें एक तत्कालीन चित्र उपलब्ध झालें आहे, तें खालीं दिलें आहे.



झ्यु या सुमेरी गरुड देवाचें चित्र.

देवांप्रमाणेंच यक्ष, गंधर्व, किन्नर भूतप्रेत, व असुर राक्षस वगैरेंच्या कल्पना जशा आपल्याकडे आहेत, तशाच त्या सुमेरी वाङ्मयांतहि आढळतात.

The Sumerian Gods never lost their connection with the spirit groups. These continued to be represented by heir attendants who executed a deity's stern and vengeful decrees.'

( सुमेरी देवतांचा यक्ष-राक्षसाशीं नित्य संबंध असे. त्या त्या देवतांचे सेवकगण आपल्या स्वामीच्या हुकुमाची बजावणी करून त्यांच्या शत्रूंचा सूड घेत ). अनु या स्वर्गाधिपतीचे दूत अंधकार, पाऊस, बर्फ यांनीं त्रास देत, एन्‌लिल् या वायुदेवतेचे गण

तुफान आणीत, नेरगाल् या यमाचे दूत पृथ्वीवर येऊन दुष्काळ, रोगोद्रेक, जलप्रलय इत्यादि रूपांनीं धुमाकूळ माजवीत. आपल्याइकडेहि इंद्राचे मित्र मरुत्, शिवाचे गण, यमाचे दूत हेंच कार्य करतात, तैमात वगैरे प्रत्यक्ष सर्परूप राक्षसांचे वर्णन मागें आलेंच आहे. दक्षिणवायु हा एक झंझावात-रूपी राक्षस होता, असें मानलें जात असे व त्याचा एक पुतळा केलेला होता, त्यावरून त्याची कल्पना येण्यासाठीं त्याचें चित्र पुढें देत आहे आहे.



**दक्षिणवायुनामक झंझावातरूपी काल्पनिक सुमेरी राक्षसाचें चित्र.**

मेलेल्या पापी माणसांचीं पिशाचें भटकत असत असें वर्णन आहे.

'Chosts wandered through the stoet in darkness; they haunted empty houses; they fluttered through the evening air as bats they hastened, moaning dismally aoross barren wastes, searehing for food or lay in wait for travellers as **siezers.**'

'पिशाचें रात्रींच्या घोर अंधकारातून भटकतात, ओसाड घरांत वस्ती करतात, वडवाघुळाच्या रूपानें रात्रीं फिरतात, भयंकर रीतीनें रडतात, रुक्ष प्रदेशांतून

अन्नासाठीं तळमळत अथवा एकट्या माणसाला झपाटण्यासाठीं भटकत फिरतात, ' असें त्यांचें वर्णन केलेलें आहे.

राक्षस कधीं कधीं मनुष्याचें अथवा दुसऱ्या एखाद्या प्राण्याचें मनमोहन रूप धारण करतात, असेंहि वर्णन आहे. सुमेरिआंत लिलु या नांवाची एक राक्षसीण सुंदर रूप धारण करून पुरुषांना भुलवून मारीत असे, असें वर्णन आहे. तिच्यावरून शूर्पनखेचें स्मरण होतें. मारीचानें सुवर्णमृगाचें रूप धारण करण्याचा प्रकार याचपैकींचा आहे, सुमेरियांतील दुसरी एक राक्षसीण लाबर्तु सुंदर मानवस्त्रीरूप धारण करून लहान मुलांना ठार मारीत असे, अशी कथा आहे. आपल्याकडेहि ताटका आहेच.

घुबडाला सुमेरियांत फार अशुभ मानीतः—

' When the owl raised its malancholy voice, ihe linster heard the spirit of a departed mother crying for its child. '

( घुबडाच्या घूत्काराचा अर्थ असा समजला जात असे कीं, मेलेल्या, आईचा आपल्या मुलासाठीं चाललेला तो आक्रोश आहे. ) परंतु पिशाचामध्यें सर्वांत भयंकर पिशाच्च मेलेल्या बाळंतिणीचें आहे, असें सुमेरियांत मानले जाई. किंग म्हणतोः—

The most terrible ghost was that of a woman who died in childbed. Her impurity clung to her like poison. No spirit was more prone to work evil against mankind and her hostility was accompanied by the most tragic sorrow. '

( मेलेल्या बाळंतिणींचीं भुतें फार भयंकर मानलीं जात. तीं नेहमीं मनुष्यांपैकीं कोणाला तरी झपाटण्यासाठीं झटत असतात, व अशा झपाटलेल्या माणसांच्या दुःखाला पार नाहीं असें मानीत. )

मनुष्याच्या मृत्यूनंतरच्या अंत्यविधीची माहितीहि सुमेरी थडगीं उकरल्यावर मिळाली आहे.

' Pro-historic Sumerian graves disclose the bodies laid on their sides, with a drinking cup-urn beside the right hand. '

थडग्यांत प्रेत एका कुशीवर ठेवित, व त्याच्या उजव्या हाताजवळ पाणी पिण्यासाठीं एक पेला ठेवीत.

मृत्यूनंतर पापी प्राणी नरकांत जात व पुण्यवान् स्वर्गांत जात. नरकाचें वर्णन मागें आलें आहे. त्याच्याच पुढल्या भागांत मृत्यूनंतरच्या स्थितीविषयीं म्हटलें आहे कीं:—

The house from which none who enter come forth again,
To the road whose course returneth not.

जेथें गेलेला प्राणी कधींच परत येत नाहीं. त्या रस्त्यानें गेलेल्याला पुनरावर्तन नाहीं.

( येथें हॅम्लेट नाटकांतील शेक्सपिअरनें हॅम्लेटच्या स्वगत भाषणांत त्याच्या

तोंडीं घातलेल्या उद्गारांची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.) मृत्यूनंतरच्या स्थितीला तो असेंच म्हणतोः —

Something after death,
The undiscovered country from whose bourne
No traveller returneth.

To the house wherein he who enters, is excluded from light, they behold not the light, they dwell in darkness.

आनंदा नाम ते लोका अंधेन तमसाऽवृताः ।
तांस्ते प्रेत्याभिगच्छंति ये के चात्महनो जनाः ॥

( जे लोक आत्महत्या करतात, ते मेल्यावर दुःखपूर्ण व घोर अंधकारानें व्याप्त अशा लोकांत जातात. )

To the place where dust is their bread, and mud their food.

( तेथें त्यांची भाकरी म्हणजे माती, व त्यांचें अन्न म्हणजे चिखल होय. )

आपल्याइकडेहि असेंच वर्णन आहेः—

पापी मनुष्याला नरकांत वाहत्या रक्ताच्या प्रवाहांत टाकतात, तेथें त्याला आपलेच केश उपटून खावे लागतात. ( अथर्ववेद, ५–१९–१३ ).

तेथें अगदीं अंध तम असतो ( अ. वे. ५–१८–३ ). तेथें राक्षस व यातुधानी नांवाच्या पिशाच्चिर्णा असतात इत्यादि वर्णन आहे.

यानंतर आपण सुमेरिअन लोकांच्या शासनाविषयक नीतिविषयक कल्पना काय होत्या, याचा थोडासा विचार करूं. या संबंधींच्या विवेचनाचा निष्कर्ष साधारणतः खालीं दिल्याप्रमाणें निघतो.

सुमेरिअन संस्कृतीच्या आद्य काळीं तेथील लोकांची अनीतीची कल्पना म्हणजे तत्कालीन धर्मसमजुतींचें उल्लंघन ही होती. विधिनिषेधात्मक ज्या धार्मिक समजुती त्या काळीं रूढ होत्या, त्या मोडण्यानें पाप लागतें, व तीच अनीति अशी त्यांची कल्पना होती. उदाहरणार्थ, खाद्यपेयांचे निर्बंध मोडणें, शकुनांच्या दृष्टीनें वाईट गोष्ट करणें, अशा प्रकारचीं कृत्यें अनीतीचीं मानीत. परंतु पुढें पुढें धार्मिक निर्बंध मोडण्यामुळें लागणारें पाप, व सामाजिकदृष्ट्या वाईट कृत्य करण्यापासून होणारी अनीति, यांत फरक करण्यांत येऊं लागला. पाप व अनीति या उभयप्रकारच्या दुर्वर्तनांपासून संकटें येतात, ही समजूत कायम राहिली. तरीपण धार्मिक व सामाजिक या दोन दृष्टी उत्तरोत्तर अधिकाधिक भिन्न होत चालल्या. त्यामुळें धार्मिक पाप न करितां केवळ सामाजिक गुन्हा केला, तरीपण त्याचे दुष्परिणाम भोगावे लागतात, अशी कल्पना पुढें रूढ झाली. ही सामाजिक नीतिविषयक कल्पना त्यांच्यांतील शासनपद्धतीच्या मूलस्थानीं मानिली गेली. त्यामुळें राजानेंहि न्याय अन्याय बरोबर पाळले पाहिजेत, असें ओघानेंच प्राप्त झालें. हीं राजाचीं कर्तव्यें एका विटेवर कोर-

लेलीं उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून त्या काळच्या राजधर्मांची चांगली कल्पना येऊं शकते. तीं कर्तव्यें आजच्या मितीसहि उत्कृष्ट आदर्श म्हणून पुढें ठेवण्यासारखीं आहेत. तीं अशीं:—

If the king does not give heed to justice, his people shall be overthrown and his land shall be brought into confusion.

If he gives no heed to the law of his land, Ea the King of destinies shall change his destiny and shall visit him with misfortune.

If he gives no heed to his nobles, his days shall not last long.

If he gives no heed to the wise men, his land shall revolt against him.

If he gives heed to wisdom, the king shall behold the strengthening of the land.

If he gives heed to the commands of Ea, the great Gods shall endow him with true knowledge and discernment.

**भाषांतरः**—जर राजा आपल्या प्रजेला योग्य न्याय देणार नाहीं, तर त्याच्या प्रजेचा नाश होईल व सर्व राज्यभर गोंधळ व अंदाधुंदी माजून राहील.

आपल्या राज्यांतील कायद्यांना जर राजा मान देणार नाहीं, तर सत्याचा देव वरुण त्याच्यावर दुर्दैवाची वक्रदृष्टि करील व त्यामुळें त्याच्यावर मोठा अनर्थ गुजरेल.

जर राजा आपल्या राज्यांतील सरदारांकडे दुर्लक्ष करील, तर त्याचे दिवस भरले, म्हणून समजावे.

जर राजा आपल्या देशांतील प्रबुद्ध लोकांचा सल्ला ऐकणार नाहीं, तर त्याचेच प्रजाजन त्याच्याविरुद्ध बंड करतील.

**याच्या उलट**—जर राजा सदुपदेश ऐकेल, तर मात्र तो आपल्या राज्याला बळकटी आणील.

आणि त्याचप्रमाणें जर राजा वरुण देवाच्या आज्ञांचें पालन करील, तर सर्व देव त्याला ज्ञान व विवेक यांचा लाभ देतील.

खासगी, कौटुंबिक व सामाजिक व्यवहारांत नीतिअनीतीची काय कल्पना होती, याविषयीं एक प्रश्नमालिका सांपडली आहे, ती मोठी मजेदार आहे. कालिदासाच्या रघुवंशांत ज्याप्रमाणें कच्चित् शब्दानें आरंभलेल्या प्रश्नांच्या रूपानें ऋषींनीं रघुराजाची उलटतपासणी केली आहे, अथवा महाभारतांतहि अशाच कच्चित्प्रश्नांनीं तत्कालीन अपकृत्यांची यादी नमूद करून ठेविली आहे, तशाच प्रकारची ही सुमेरियन वाङ्मयांतील प्रश्नमालिका आहे, ती भाषांतररूपानें येथें देऊं.

" त्यानें बापलेकांची ताटातूट केली आहे काय ? मायलेकींची ताडातोड त्यानें केली आहे काय ? सासू-सुनेमध्यें त्यानें वितुष्ट पाडलें आहे काय ? भावाभावांत, मित्रामित्रांत, व स्नेह्यासोबत्यांत बिब्बा घातला आहे काय ? बंदिवानाला बंधमुक्त

करण्याचें त्यानें नाकारलें आहे काय ? तुरुंगांत असलेल्याला त्यानें अंधारकोठडींत कोंडून ठेवलें आहे काय ? पकडलेल्या कैद्याला यानें साखळदंडानें बांधलें आहे काय ? व साखळदंडानें बांधलेल्याचे पाश अधिक घट्ट त्यानें केले आहेत काय ? त्यानें देवाचा अपमान केला आहे काय ? अथवा देवाविषयीं तोंडानें अपशब्द अथवा असभ्य उच्चार काढले आहेत काय ? आपल्याहून वडील माणसांचा यानें अपमान केला आहे काय ? अथवा आपल्या वडीलभावाला दुखविलें आहे काय ? आपल्या मातापित्या-विषयीं तिरस्कार दाखविला आहे काय ? बारीकसारीक गोष्टींत औदार्याचें ढोंग करून महत्त्वाच्या गोष्टींत त्यानें लोभीपणा अगर कद्रूपणा केला आहे काय ? त्यानें ‘ हो ’ बद्दल ‘ नाहीं ’ व ‘ नाहीं ’ बद्दल ‘ हो ’ म्हटलें आहे काय ? ( असत्य भाषण केलें आहे काय ? ). तोंडानें अश्लील, दुष्ट व पापी शब्द त्यानें उच्चारिले आहेत काय ? खोटीं मापें वापरणें, खोटा हिशोब तयार करणें अथवा खोटें लिखाण करणें, यांपैकीं कांहीं त्यानें केलें आहे काय ? खऱ्या वारसांची मिळकत त्यानें लुबाडली आहे काय व अनीतिसंबंधापासून पैदा झालेल्या प्रजेला त्यानें ती दिली आहे काय ? त्यानें शेताच्या हद्दींचे बाण अथवा खुणा खोट्या केल्या आहेत काय व खऱ्या असलेल्या नष्ट केल्या आहेत काय ? दुसऱ्याचें घर फोडून त्यानें गैरकायदेशीर गृहप्रवेश केला आहे काय ? त्यानें दुसऱ्याच्या बायकोशीं संबंध ठेविला आहे काय ? दुसऱ्याचें रक्त त्यानें सांडलें आहे काय ? दुसऱ्यावर हल्ला करून त्याला व्यथा, महाव्यथा अथवा जखम केली आहे काय ? दुसऱ्याच्या वस्तू त्यानें चोरल्या आहेत काय ?

अशी ही प्रश्नमालिका आहे. मेकॉलेनें तयार केलेल्या इंडियन पीनल कोडांतील बहुतेक गुन्हे यांत येऊन गेले आहेत. राजाविरुद्धचे गुन्हे ( offences against the state ), शरीरविषयक गुन्हे ( offences against the person ), मिळकतविषयक गुन्हे ( offences against property ), धर्मभावनाविषयक गुन्हे ( offences against religion ) वगैरे सर्व बाबवार गुन्ह्यांचा संग्रह या पांच सहा हजार वर्षांपूर्वीच्या फौजदारी निबंधांत सशास्त्र केलेला पाहून अलीकडल्या पुष्कळशा सरकारी कायदेपंडितांचा ( Law members ) चा गर्वपरिहार व्हावा, इतका तो संपूर्ण आहे. त्यावरून त्या काळच्या समाजाच्या संस्कृतीची उत्कृष्ट कल्पना येते, व इतक्या प्राचीन काळीं त्या समाजानें स्वतःला प्राप्त करून घेतलेल्या श्रेष्ठ नीतिमत्तेबद्दलच्या कौतुकानें मन विस्मित होऊन जातें !

याप्रमाणें सुमेरी व हिंदी संस्कृतींचें तुलनात्मक विवेचन आतापर्यंतच्या चार लेखांकांत आम्हीं केलें आहे. यावरून हिंदी व सुमेरी या उभय संस्कृतींत इतकें विल-क्षण साम्य आहे कीं, या दोघांची मूळ एकच संस्कृति असली पाहिजे, याबद्दल आमच्या मतें शंका येण्यास यत्किंचितहि जागा राहूं नये.

सुमेरी संस्कृतिविषयक वाङ्मयप्रकाशन करणाऱ्या पंडितांना सुमेरी व युरोपीय दंतकथांत जें थोडेसें जुजबी साम्य दिसलें तेवढ्यावरूनहि युरोपिअन मानववंशाचें

पूर्वज व सुमेरी लोकांचे पूर्वज यांची एकत्र संस्कृति फार प्राचीन काळीं कोठें तरी असली पाहिजे, अशी अंधुक कल्पना त्यांना आली होती. हांच कल्पना व्यक्त करतांना मॅकेंझी म्हणतो:—

" To students of comparative folk—lore and mythology, these myths ( of Sumeria ) present many features of engrossing interest. They are of great antiquity; yet not a few of them seem curiously familiar. We must not conclude however, that because a European legend may bear resemblance to one transmitted from a cuneiform tablet, it is neccessarily of Babylonian origin. **Certain beliefs and myths which were based upon them are older than even the civilization of the Tigro-Euphrates valley. They belong, it would appear, to a stock of common inheritance from an uncertain cultural centre of great antiquity.** "

( प्राचीन दंतकथा व गाथाशास्त्र यांचा तुलनात्मक अभ्यास करणारे संशोधक सुमेरी दंतकथा वांचून फार विचारमग्न होऊन जातील. त्या दंतकथा फार प्राचीन काळच्या आहेत, तरीपण त्यांतल्या कांहीं आपल्याला नित्य परिचयाच्या वाटतात. तथापि अशी एखादी दंतकथा सुमेरी कीलाकृति लिखाणावरून सांपडली, म्हणजे लगेच युरोपिअन लोकांनीं ती सुमेरी वाङ्मयावरूनच उचलली, अशी आपली चुकीची कल्पना संशोधकांनीं करून घेऊं नये. कारण कांहीं समजुती व त्यांवरून रूढ झालेल्या दंतकथा या युफ्रेटिस-टायग्रीस नद्यांच्या टापूंतलि सुमेरी संस्कृतीहूनहि अत्यंत प्राचीन आहेत व त्याचा उगम **कोठें तरी अजून अनिश्चित असलेल्या प्रांतांतील संस्कृतीच्या कल्पनासंग्रहांतून झालेला आहे.** " )

मॅकेंझीच्या वरील अवतरणांत युरोपिअन दंतकथा सुमेरी कथांवरून प्रत्यक्षतः घेतल्या गेल्याबद्दलच्या कल्पनेविरुद्ध जी सावधागिरी ठेवण्यास बजावलें आहे, तीच आपणहि भारती दंतकथांबद्दल अर्थात्च ठेविली पाहिजे. म्हणूनच माहेंजोदारो व हरप्पा येथलि उत्खननानंतर ताबडतोब बॅडेल साहेबांनीं हिंदी संस्कृती ही सुमेरीवरून उसनी घेतली आहे, व हिंदी ऋषीमुनींचे बापजादे सुमेरियांतील वीरपुरुष होते, असा जो एक भरमसाट सिद्धांत ठोकून दिला व तो खरा आहे हें दाखविण्यासाठीं हिंदी संस्कृतीचा काल हजारों वर्षे अलीकडे ओढला, त्याची सदोषता दाखविण्यासाठींच युरोपिअनांच्या या प्रवृत्तीबद्दल निषेधात्मक उद्गार या लेखमालेच्या पहिल्या अंकांत काढले होते. त्यांत त्या लोकांनीं प्राचीनसंशोधनाच्या कामीं केलेल्या अपूर्व श्रमाबद्दल कृतज्ञताभाव मुळींच नसून त्यांच्या सहेतुक अपसिद्धांताचें खंडण मात्र व्यक्त केलें आहे. असो. वरील उताऱ्यांत मॅकेंझीनें ज्या इतिहासप्राक्कालीन अनिश्चित अशा ठिकाणीं असलेल्या मानववंशाचा उल्लेख केला आहे. अनिश्चित वाटणारें स्थान म्हणजेच

उत्तरध्रुवप्रदेश होय, असें आम्हीं आतांपर्यंतच्या विविध प्रमाणांनीं निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात् त्यावरून त्या स्थानीं रहात असलेल्या मानववंशासंबंधाचा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो, व तसा तो प्रो. फ्रेझर नांवाच्या पंडितानें उपस्थित केलाहि आहे. तो म्हणतोः—

How far such homogeneity of civilization may be taken as evidence of homogeneity of race is a question for the ethnologist.

' वर वर्णन केलेल्या संस्कृतींच्या एकत्वावरून त्या समाजांच्या एकरूपतेबद्दलचा सिद्धान्त निघतो कीं काय, या प्रश्नाचा निर्णय करण्याचें काम मानव-वंश-शास्त्रज्ञाचें आहे. '

तेव्हां हा प्रश्न सोडविण्यासाठीं या पुढीलच्या व शेवटच्या लेखांकांत घटकाभर आपण मानव-वंश-शास्त्रज्ञ बनून आतांपर्यंत आपल्या सिद्धांताला त्या शास्त्राची कितपत पुष्टि मिळते, तें अवलोकन करूं.



# हिंदी व सुमेरी चित्रकला आणि वंशविचार.



द व सुमेर या दोनहि देशांतील अनेकविध सांस्कृतिक साम्याचें विवेचन बेल्या चार लेखांकांत केलें आहे, व त्या साम्यावरून मानव-वंश-शास्त्रदृष्ट्या या उभय देशांतील लोकांच्या संबंधानें काय निष्कर्ष निघतो, हें या अंकांत परीक्षिण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तसें करण्यास वास्तविक त्या दोनहि कालांतील माणसें उपलब्ध व्हावयास हवींत. परंतु आज मितीस सुमेरिआ तर नामशेष होऊन हजारों वर्षे होऊन गेलीं आहेत व वेदकालीन भारतीय आर्यांच्या वंशजांपैकीं पंजाबांत जरी आर्य चेहरेपट्टीचा नमुना बराचसा मूळ समाजाशीं समान अशा स्वरूपांत सांपडत असला, तरी एकंदर आर्यसमाज हजारों वर्षेपर्यंत इतरवर्णीय लोकांशीं मिश्रित झालेला असल्यानें, तत्कालीन शुद्धस्वरूपांत सांपडणें दुष्कर आहे. तथापि सुदैवानें कलारूपानें सुमेरिआंत त्या लोकांच्या स्वरूपाचे नमुने अवशिष्ट राहिले आहेत, व सिंध व पंजाब येथील संशोधनांत जरी अद्यापपर्यंत त्या प्रकारचे अवशेष थोडे सांपडले आहेत, तथापि जसजसें हें संशोधन अधिकाधिक होत जाईल, तसतसें तत्कालीन लोकांच्या स्वरूपाचें ज्ञान पुतळ्यांच्या वगैरे रूपानें जास्त जास्त होईल, अशी आशा आहे. याशिवाय वैदिक वाङ्मयांत आर्यलोकांच्या व त्यांच्या देवतांच्या स्वरूपाचे वर्णनदर्शक उल्लेख आहेत, त्यांवरूनहि तत्संबंधीची कल्पना येण्यासारखी आहे. तेव्हां यासाठीं हिंद व सुमेर या दोनहि देशांत चित्रकलेची प्रगति आद्यकालीं कितपत झाली होती, हें प्रथम आपल्याला पाहिलें पाहिजे.

प्रथमतः आपण सुमेरमध्यें हें कलाज्ञान कितपत होतें तें पाहूं. यासंबंधीं Cambridge Ancient History, Vol 1. या पुस्तकांत विवेचन केलेलें आहे, तें सारांशरूपानें येणेंप्रमाणें आहेः—

" सुमेरी संस्कृतींतील प्राचीन कलेच्या नमुन्यांचे अवशेष ' सुसा ' नांवाच्या शहरीं भूपृष्ठाखालीं ६० मीटरच्या खोलीवर सांपडले आहेत. त्यांतील मातीच्या भांड्यांना उत्तम झिलई दिलेली असून, त्यांच्यावर उत्तम चित्रें काढलेलीं आहेत. कुंभाराच्या चाकाचा उपयोग त्या लोकांना चांगला माहीत होता, व त्यावर फिरवून

तयार केलेलीं चिकणमातीचीं भांडीं अगदीं पातळ, सफाईदार व सुंदर अशीं आहेत. भांड्यांना देण्यासाठीं एक प्रकारचा चकाकणारा काळा रंग तयार केलेला असे. अशा रंगांनीं रंगविलेलीं भांडीं लगश, एरिडू व ऊर या गांवीं सांपडलीं आहेत. जनावरांचीं चित्रेंहि त्यांवर काढलेलीं आहेत, परंतु तीं ठराविक, आंखीव पद्धतीचीं काळ्या रूपरेखेनें काढलेलीं आहेत. माणसांचीं चित्रें मात्र अशा आंखीव नमुन्याचीं नसून वास्तव स्वरूपाचीं आहेत. त्यांचा काल ख्रिस्तपूर्व ४५०० ते ४००० पूर्व इतका तरी प्राचीन आहेच आहे. आमच्या मतें ख्रिस्तपूर्व ५००० च्या पूर्वी मध्य आशियापासून इराणच्या मैदानापर्यंत व दुसरीकडे मिसर ( इजिप्त ) व सीरिआपर्यंत एक मोठी संस्कृति पसरली होती, व तिचीच एक शाखा सुमेरियांत असून, त्या शाखेंत ख्रिस्तपूर्व ४००० च्या पूर्वी कलाज्ञानांत पुष्कळ प्रगति झाली होती. त्या काळीं भांडीं, पुतळे व इतर वस्तू तयार करण्यासाठीं तेथील लोक साधा दगड व संगमरवर यांचा उपयोग करूं लागले होते. त्याचप्रमाणें asphalt या मातीच्या विशिष्ट मिश्रणाचे केलेले वरील पदार्थहि सांपडले आहेत. सुसा येथें माणसांच्या डोक्यांचे पुतळे सांपडले आहेत, व त्याचप्रमाणें ' लगश ' या गांवीं पण असे अनेक पुतळे सांपडले आहेत. ते हल्लीं पॅरिस जवळील ' लूव्हू ' च्या अजबखान्यांत ठेवलेले आहेत. या संबंधींची विशेष माहिती नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या Cambridge ancient History, First volume of Plates by C. T. Seltman या ग्रंथांत दिलेली आहे. तिवरून पहातां ' लगश ' येथें सांपडलेल्या पदार्थांत एक वाटोळा चबुतरा सांपडला आहे. त्यावर उठावदार ठशांनीं ( bas-relief ) एक लढाऊ लोकांची पलटण दाखविली आहे. तींतील माणसांचीं चित्रें चांगलीं स्पष्ट दिसण्यासारखीं आहेत.

यानंतर तत्कालीन मनुष्यांचें रूपवर्णन असलेल्या तक्षकलेच्या ( Sculpture ) च्या नमुन्यांत ' गृध्रतक्षफलक ' ( Stele of the vultures ) म्हणून एक सपाट पृष्ठाचा दगड असून त्यावर चित्रें कोरलेलीं आहेत. या फलकांत सुमेरिअन लोकांचें शहर ' लगश ' यावर शत्रूंनीं हल्ला केला असतां, सुमेरिअनांनीं त्यांचा पराभव करून त्यांना ठार मारलें व त्यांचीं प्रेतें गिधाडांकडून खावयासाठीं फेंकून दिलीं, तीं गिधाडें खात आहेत, असा देखावा दाखविलेला आहे. ' लगश ' चा मुख्याधिकारी—ज्याला ' पटेसी ' ( patesi ) असें म्हणत—त्यानें लगशवर स्वारी करणारा शेजारचा राजा ' उम्मा ' याच्या सैन्यावर एक प्रकारचें जाळें टाकलें व त्याना ठार मारून टाकलें, अशा अर्थाचा लेख त्या शिलेवर कोरलेला आहे. त्याप्रमाणें त्या चित्रांत ' इआ–नाटुम् ' पटेशी यानें ' उम्मा ' च्या सैन्यावर जाळें टाकलें आहे, व त्या जाळ्यावर सुमेरच्या ध्वजावरील ' सिंहमुखी गरुडा ' चें चित्र काढलेलें आहे. त्याच फलकांत यापुढें एक चारचाकी गाडीचा पुढचा भाग दाखविला आहे. गाडीच्या डाव्या बाजूस चाकावर एक फळी लावलेली असून तिच्यावर एक आंतील योद्ध्याचा शरीररक्षक हातांत परशु व भाला घेऊन उभा असलेला दाखविला आहे. खालच्या

भागाला या मिळालेल्या विजयाप्रीत्यर्थ एका बैलाचा यज्ञ करीत असल्याचा देखावा दाखविला आहे.

यानंतर असाच एक अश्मफलक या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याला राजा 'नराम्-सिन् याचा फलक' ( 'Stele of Naravn-sin' ) असें म्हणतात. तोहि फलक एका महत्त्वाच्या विजयाच्या स्मरणाप्रीत्यर्थ कोरलेला असल्यानें तो 'विजयफलक' याहि नांवानें प्रसिद्ध आहे. साधारण पिंवळटसर दगडावर हें चित्र कोरलेलें आहे. त्यांत 'नराम्-सिन्' हा राजा एका पर्वतावर चढलेला आहे, तेथें त्याचे पराभूत झालेले शत्रू गुडघे टेकून त्याची क्षमायाचना करीत आहेत, व वर आकाशांत इस्तर देवीचा अष्टकोनी तारा उज्ज्वल तेजानें प्रकाशत आहे, अशा प्रकारचें चित्र त्या दगडावर कोरलेलें आहे.

याशिवाय चुन्याच्या दगडाच्या एका फलकावरचें एक चित्र सांपडलें आहे. त्यांत त्या काळचा एक प्रसिद्ध मूर्तिकार अथवा तक्षकार ( Sculptor ) 'गुडिआ' याला त्याचा कुलदेव हा दुसऱ्या एका मोठ्या देवापुढें नजर करण्यासाठीं नेत असल्याचा देखावा दाखविला आहे. त्यांत 'गुडिआ' नें आपल्या इकडील मुलींच्या पट्टयाच्या झालरींच्या झग्याप्रमाणें आंगरखा घातलेला आहे; त्याच्यापुढें बसलेल्या त्या मोठ्या देवाला मोठाल्या दाढीमिशा आहेत, त्यानें मुकुट धारण केलेला आहे, व त्याच्या दोन खांद्यांवरून दोन नाग आपल्या फणा काढून उभे राहिले आहेत, असें चित्र कोरलेलें आहे.

स्वतंत्र समूहांत दाखविलेल्या मनुष्याकृतींचे अवयव जरी स्पष्ट असले तरी, ते स्वतंत्र पुतळ्या इतके सूक्ष्म नसतात, व शिवाय त्यांचा फक्त दर्शनी भागच अशा चित्रांत व्यक्त होत असल्यानें, पुतळ्याप्रमाणें सर्व बाजूंनीं त्या आकृती परीक्षितां येत नाहींत. असें सर्वांगपरीक्षण फक्त पुतळ्यांचेंच उत्कृष्ट रीतीनें होऊं शकतें. सुदैवानें त्या काळचे असे पुतळेहि बरेच उपलब्ध झालेले आहेत, व ते लगश, सुसा, ऊर वगैरे ठिकाणच्या उत्खननांत सांपडले आहेत. त्यापैकीं कांहींच्या बद्दलचें वर्णन व चित्रदर्शन फारच मनोरंजक वाटेल, अशी खात्री वाटते. **आजच्यापूर्वी अजमासें सहा सात हजार वर्षांमागील माणसांचे तत्कालीन कारागिरांनीं बनविलेले पुतळे प्रत्यक्ष पाहून कोणाचें मन आश्चर्यानें स्तिमित होणार नाहीं?** "सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं" अशा सर्वभक्षक कालाच्या तडाक्यांतून वाचलेले हे अवशेष, आपल्याला कल्पनेलाहि अगम्य अशा भूतकालांत प्रत्यक्ष नेऊन सोडतात! यांतील एका पुतळ्याचा फोटो या खालीं देत आहों.

या चित्रांत वरच्या भागाला एका सुमेरिअन् पुरुषाची पार्श्वाकृति ( Profile ) दाखविलेली असून, त्याखालीं त्याचा सन्मुख भाग दाखविलेला आहे. हा पुतळा

चुनखडीच्या दगडाचा ( Limestone ) बनविलेला आहे. रुंदीपेक्षा लांबी अधिक असलेला शीर्षभाग, लंबगोल चेहरा, उंच व सरळ कपाळ, भिवयांच्यामधील जागेपासून कपाळाच्या जवळजवळ सपाटीपासून निघालेलें नासामूल, सरळ, बारीक व धार असलेकें नाक, मध्यम आकाराचे माशाप्रमाणें कानाच्या बाजूला निमुळते होत, गेलेले डोळे, कमानदार भिवया, लहान जेवतें, पातळ अधरोष्ठ, गालाचीं हाडें ( Cheek-bones ) पुढें न आलेलीं, मध्यमाकृति कान, अशा प्रकारचें या पुतळ्याचें अवयवावस्थान आहे. हा पुतळा लगश येथें सांपडला आहे. मूळ शरीरापासून मस्तक फुटून निराळें झालें आहे, व तें हल्लीं बर्लिन येथील म्यूझिअममध्यें ठेवलेलें आहे.



**सात हजार वर्षांपूर्वीचा सुमेरिअन पुरुष.**

( यांतील लंबशीर्ष, लांब व बारीक नाक, उंच कपाळ, लांबट चेहरा हीं सर्व त्याचा आर्यवंश दर्शवितात. )

यानंतर लगश येथेंच सांपडलेला दुसरा एक पुतळा या खालीं चित्ररूपानें दिला आहे. त्याचें हें चित्र वॉल्काझिन्स् या चित्रकारानें काढलेलें आहे. वरील पुतळ्याच्या वर्णनांत दिलेलें सर्व वर्णन याहि पुतळ्याला तंतोतंत लागूं पडतें. हा पाहून तर, तो अगदीं दोन चार दिवसापूर्वी काढलेल्या एखाद्या युरोपिअन अथवा उच्चवर्णीय हिंदूंचा नसेल असें कोण म्हणूं शकेल ?

यांत केसांचा भाग वरील चित्रापेक्षां अधिक स्पष्टतेनें दिसत आहे, व त्यावरून त्याचे केश, मृदु,व ' जललहरीवत् ' अथवा नागमोडी ( wavy ) असे दिसत आहेत. हनुवटी उत्तरोष्ठाच्या पातळींत आलेली, गोल व घोटलेली; भरदार असल तरी हनुवटीपासून निमुळता होत आलेला शंखाकृति गळा, हे अवयवहि या चित्रांत अगदीं स्पष्ट दिसत आहेत.

सुदैवानें या दोन पुरुषाकृतीप्रमाणें एका सुमेरी स्त्रीचाहि पुतळा सांपडला आहे.

हा पुतळा ' टेलो ' या गांवीं उत्खननांत सांपडलेला आहे. वंशविचाराच्या दृष्टीनें, त्याचप्रमाणें तत्कालीन वेशभूषादृष्टीनेंहि हा पुतळा वरील दोनहि पुतळ्यांपेक्षां मनोरंजक आहे. या पुतळ्याची चेहरेपट्टी व अवयव हे सर्व वरील दोन्ही पुतळ्यांशीं बरोबर मिळते आहेत. गळ्यांत मोत्याच्यासारखा चार पांच पदरी दागिना घातलेला




**त्याच काळच्या सुमेरी पुरुषाचा पुतळा.**

हल्लींच्या उच्च आर्यवर्णीयांशीं याचें विलक्षण साम्य पहाण्या-सारखें आहे.



आहे. अंगांत आंतून पोलक्यासारखा कांहीं कपडा घातलेला आहे. त्याला गळ्याशीं झालरीची पट्टी लावलेली आहे. त्या पोल-क्यावरून एक वस्त्र घेतलेलें आहे; पण तें फरगोलाप्रमाणें शिवलेलें आहे कां शालजो-डीसारखें नुसतें अंगावरून घेतलें आहे, हें मात्र स्पष्ट समजत नाहीं. तथापि पुणेरी बायका पुष्कळ वेळां शालजोडीचे दोनहि कांठ खांद्यांपासून खालपर्यंत पट्टी बरोबर जुळवून सोडतात, तसे सोडलेले आहेत. कोंपरापासूनचे हाताचे पुढील भाग उघडे ठेवलेले आहेत. फोटो जरा अस्पष्ट आल्या-मुळें हातांत कांहीं कंकणवलयांप्रमाणें आहे किंवा नाहीं हें स्पष्ट समजत नाहीं; तथापि डोक्यावर कांहीं तरी टोपीप्रमाणें घातलेलें आहे. मात्र त्याची पुढल्या बाजूची

**सात हजार वर्षांपूर्वींची सुमेरी स्त्री.** पट्टी झालरीप्रमाणें कापलेली आहे. तिचा अंगावरील वस्त्राशीं कांहीं संबंध आहे किंवा नाहीं, हें मात्र चित्रावरून कळत नाहीं.

त्या काळच्या सुमेरी पोषाखाचें वर्णन Cambridge Ancient History मध्यें खालीलप्रमाणें दिलेलें आहेः—" हीं वस्त्रें मेंढ्याच्या लोंकरीचीं विणून तयार केलेलीं असत. विणतांनाच त्यांना पट्टया पाडलेल्या असत, व तीं नेसतांना पुरुष कमरेभोंवतीं बांधीत असत. दुसरें एक वस्त्र उत्तरीयाप्रमाणें ते वापरीत असत. उजवा हात मोकळा ठेऊन खाकेखालून डाव्या खांद्यावर तें बांधलेलें असे. म्हणजे आपल्या-इकडील ब्रह्मचाऱ्याप्रमाणेंच त्यांचा वेश असे, असें दिसतें. या वस्त्राला सुमेरियांत ' गुएना ' असें म्हणत. हाच पोषाख सुमेरियन् लोकांपासून बॅबिलोनी लोकांनीं उचलला व परंपरेनें तो पुढें ग्रीक लोकांतहि आला व ग्रीक लोक त्याला ' कौनाके ' म्हणत. बायका, दक्षिणी स्त्रियांप्रमाणें डाव्या खांद्यावरून पाठीमागून उजव्या हाता-खालून पदर घेत. "

याप्रमाणें सुमेरी लोकांचें रूपवर्णन व वेशवर्णन करून मग आपण वेदकालीन आर्य लोकांकडे याच दृष्टीनें वळूं. आर्यलोक हिंदुस्थानांत अजमासें खिस्तपूर्व ४५०० च्या सुमारास आले, हें मागें सांगितलेंच आहे. त्या कालीं त्यांना येथे जे लोक आढळले, ते लोक आर्य लोकांहून भिन्नवंशीय होते, व म्हणून त्यांच्या संबंधींचें स्वरूप-वर्णनात्मक उल्लेख वेदांत काय सांपडतात, तें आपण आतां पाहूं. ऋग्वेदाच्या पांचव्या मंडलाच्या २९ व्या सूक्तांतः—

" अनासस्ते दस्यूँरमृणो वधेन नि दुर्योन मावृणङ् मृध्रवाचः ।

म्हणजे, ' हे इंद्रा तूं धर्महीन व नकट्या नाकाच्या दस्यूंना मारून, आर्यांना शिव्या देणाऱ्या त्या दस्यूंचा त्यांच्याच घरांत तूं नाश केलास, ' अशी इंद्राची प्रार्थना केली आहे. अर्थात् हे दस्यू ' अनास ' अथवा नाक नसलेले, म्हणजेच बसक्या नाकाचे असत, व या अवगुणामुळें त्यांचा अधिक्षेप करणारे आर्य चांगल्या सरळ नाकाचे होते, हें ओघानेंच सिद्ध होतें. परंतु याहून अधिक स्पष्ट असें अवयवांचें व रूपाचें वर्णन वैदिक ऋषींनीं आपलें स्वतःचें न करितां आपला श्रेष्ठ देव जो इंद्र, त्याच्या वर्णनाच्या रूपानें केलें आहे. इंद्र हा त्यांचा सर्व प्रकारें जातिदेव अथवा राष्ट्रदेव असल्यानें, वैदिकऋषींच्या मतें जें उत्तमत्त्वाचें सारसर्वस्व, तें त्यांनीं इंद्राच्या ठिकाणीं कल्पिलें आहे. यासंबंधीं पंडित श्रीनिवास अय्यंगार नांवाच्या एका ग्रंथका-रांनीं म्हटलें आहे, तें सर्वस्वीं खरें आहे. ते म्हणतातः—

The conception of Indra, held by the Rishis was so intensely anthropomorphic, that it is difficult to discover whether, in addition to his divine characterestics, he was also endowed by the Rishis with attributes possessed by historical personages."

( वैदिक ऋषींची इंद्रविषयक कल्पना इतकी आत्मसादृश्यमय होती कीं, केवळ देव म्हणून काल्पनिक गुणरूपाचें अधिष्ठानच त्यांनीं त्याच्याठायीं कल्पिलें होतें, असें नसून त्यांच्यांतील ऐतिहासिक वीरपुरुषांच्या प्रत्यक्ष गुणरूपाचीच प्रतिमा त्यांनीं इंद्राच्या रूपानें कल्पिली होती, असें वाटूं लागतें. )

एक प्रकारचें शिरोविष्टन असून त्यांच्या अंगावर दागिने घातलेले दाखविले आहेत. या मूर्ती पहातांच मेसापोटेमियांत व त्याच्या पश्चिमेकडील देशांत मातृदेवतादर्शक ज्या मूर्ती सांपडल्या आहेत, त्यांच्याशीं यांचें साम्य ताबडतोब व सहज पटतें. )

यानंतर सिंध व पंजाब येथील लोकांच्या कपड्यालत्त्यासंबंधानें मार्शलसाहेब लिहितातः—

" Numerous spindle-whorls in the debris of the houses, attest the practice of spinning and weaving and scraps of a fine woven cotton material have been found. The Babylonian and Greek names for cotton ( Sindhu and Sindor respectively ) have always pointed to the Indus valley as the home of cotton growing; but there had been some doubt hitherto, as to whether the cotton known to the Babylonians and Greeks was not obtained from the silk-cotton tree rather than from the cotton plants. This doubt is now set at rest, by the discovery at Mohenjo-Daro of true cotton of the latter kind with the typical convoluted structure which is the peculiar characterestic of that fibre."

( माहेंजो-दारो येथें सांपडलेल्या शेंकडों चात्याचरख्यांवरून तेथें कापूस पिंजण्याची व विणण्याची पुष्कळ वहिवाट होती, असें दिसून येतें. बॅबिलोनी भाषेंत कापसाला ' सिंधु ' असें नांव आहे, व ग्रीकभाषेंत त्याला ' सिंदॉन ' असें नांव आहे यावरून कापसाच्या मूळ उत्पत्तीचें स्थान-सिंधुनद प्रांत असल्याबद्दलची फार प्राचीन काळापासूनची कल्पना होतीच. तथापि तो कापूस म्हणजे हल्लींप्रमाणेंचा खरा कापूस होय, किंवा एक प्रकारच्या रेशमासारख्या झाडाचे तंतू होत, याविषयीं आजपर्यंत शंका होती. परंतु माहेंजो-दारो येथें सांपडलेल्या कापसाची परीक्षा करितां तो खरा कापूस असल्याचें नक्की झाल्यानें त्या शंकेचें आतां निराकरण झालें आहे. )

यानंतर पोषाखासंबंधानें ते लिहितातः—

" Male attire among the upper classes consisted of two garments, a skirt or kilt fastened round the waist, **like the primitive Sumerian skrit, and a plain or patterned shawl which was drawn over the left and under the right shoulder, so as to leave the right arm free.** Men wore short beards and whiskers, **with the upper lips sometimes shaven, as in Sumer.** Their hair was taken back from the forehead and coiled in a knot at the back of the head, with a fillet to support it. The one and only head of a female statue that we possess, shows the hair falling loose behind, but whether this was the prevailing fashion or not is questionable......ornments were freely worn, by all classes alike necklaces and finger-rings by both men and women; ear-rings, bangles, girdles and anklets by the latter only."

( वरच्या वर्गांतील पुरुष दोन वस्त्रें वापरीत. एक धोतर व दुसरें उत्तरीय. धोतर **सुमेरियांतील लोकांच्या रिवाजाप्रमाणें** कमरेंभोंवतीं गुंडाळलेलें असून, उत्तरीय डाव्या खांद्यावरून व उजव्या बगलेखालून घेतलें जात असे; व त्यामुळें उजवा हात कामासाठीं मोकळा रहात असे. पुरुष लहान दाढ्या व गलमिशा ठेवीत व **सुमेरियन लोकांप्रमाणें** ते मिशा कधीं कधीं काढीत असत. डोक्याचे केस मागें फिरवून त्यांची गांठ बांधीत असत व तिच्या भोंवतीं एक पट्टी अथवा फीत बांधीत. स्त्रीचा एकच पुतळा आतांपर्यंत सांपडला आहे. त्यांत त्या स्त्रीचे केस मागें मोकळे सोडलेले आहेत; पण अर्थात्‌च तेवढयावरून तसे केस मोकळे सोडण्याचा सार्वत्रिक रिवाज होता किंवा काय, याविषयीं कांहीं अनुमान करतां येण्याजोगें नाहीं. सर्व जातींचे लोक अंगावर दागिने मात्र विपुल घालीत. माळा व अंगठ्या या स्त्रीपुरुष दोघेहि घालीत व यांशिवाय स्त्रिया कर्णफुलें, बांगड्या, कमरपट्टे व सांखळ्या वापरीत असत. )

वैदिक वाङ्मयावरूनहि हें वर्णन फार आश्चर्यकारक रीतीनें पटतें; तें असें:— पुरुष दोन वस्त्रें वापरीत ( अथर्ववेद ४–७–६ ), त्या वस्त्रांना परोधानम् व नीवि असें म्हणत ( अथर्ववेद, ८–२–१६ ), उत्तरीयाला नक्षीची किनार असे; अशा नक्षीच्या काठाच्या उत्तरीयाला दोन बाजूला प्रातःकालीन व सायंकालीन सूर्य असलेल्या आकाशाची मजेदार उपमा एके ठिकाणीं दिलेली आहे. कांहींजण हजामत करवीत ( अथर्व वे. ६–५८ ), परंतु इतर कित्येक लोक दाढीमिशा ठेवीत ( ऋ. वे. १०–२६–७ ). केंस मागें सारून त्यांची गांठ मारीत; ती कोणी कोणी उजव्या बाजूला मारीत व कोणी डाव्या बाजूला मारीत. मलबारांतील स्त्रिया अजूनहि आपल्या केंसांचा बुचडा असाच उजव्या अगर डाव्या बाजूस बांधतात. पैकीं वशिष्ठगोत्री लोक ती उजव्या बाजूला बांधीत. ( ऋग्वेद. ७–३३–१ ) वस्त्रें लोंकरीचीं असत, तशींच कापसाचींहि असत. ( ऋ. वे. ५–४४–११ ).

याप्रमाणें सुमेरियांतील सुमेरीलोक व वैदिक आर्यलोक यांच्यांत अत्यंत आश्चर्यकारक असें स्वरूपात्मक, वेषात्मक व आचारात्मक साम्य आपण प्रत्यक्षतः अवलोकन केलें, व त्यावरून हे उभय लोकसमाज एकवंशीयच असले पाहिजेत असें सिद्ध केलें. अशा दृष्टीनें साधर्म्यदृष्ट्या आपल्या सिद्धांताला पुष्टि मिळाली. ही अन्वयात्मक पुष्टि मिळाल्यावर आतां व्यतिरेकदृष्ट्या अथवा वैधर्म्यदृष्ट्या काय माहिती मिळते, तें आपण पाहूं. इतका वेळ सुमेरी लोकांचें परीक्षण आपण केलें, पण मेसापोटेमियांत सुमेरिअनाहून भिन्नवंशीय अशा सेमेटिक वंशांतील लोकांचे अवशेषहि तक्षकलेच्या रूपानें सांपडले आहेत, त्यांचीं चित्रेंहि आतां आपण पाहूं. या लेखमालेंत मागील अंकांत सुमेरिआचे त्रोटक इतिहास खंड दिले आहेत, ते वाचकांच्या स्मरणांतून गेले नसतील अशी आशा आहे. तेथें असें सांगितलें आहे कीं, सुमेरी वंशांतील लोकांचें राज्य सुमेरियांत सुमारें ख्रिस्तपूर्व ४००० वर्षेपर्यंत चालल्यावर, त्यांच्यावर एका भिन्नवंशीय लोकांनीं स्वारी करून तो देश जिंकला. हे जेते बॅबिलोनी म्हणून प्रसिद्ध

झाले, व त्यांची राजधानी बॅबिलोन शहर ही होती. हे बॅबिलोनिअन् लोक सेमेटिक-वंशाचे होते. त्यांचीं चित्रें आतां आपण पाहूं.



**सेमेटिक वंशांतील बॅबिलोनी पुरुषाचा पुतळा.**

हें पुतळ्याचें चित्र पाहिल्याबरोबरच मागील चित्रांत दाखविलेल्या लोकांहून भिन्नवंशीय जातींपैकींच्या पुरुषाचें तें असल्याचें एकदम नजरेस येतें. त्याचा तो सुमेरी लोकांपेक्षां रुंदिच्या मानानें लांबी कमी असलेला चेहरा. नाक मुळापासून पुढें पसरट होत आलेलें व मांसल, रुंद जेवतें, खालचा ओठ जाड हे फरक स्पष्टपणें दिसतात. याहून सूक्ष्मतेनें अवयव दर्शविलेला दुसरा पुतळा ख्रिस्तपूर्व २१०० च्या सुमाराचा एका बॅबिलोनी राजाचा सांपडला आहे.

यांतील नाकहि वरील फोटोप्रमाणेंच आहे. त्यानें डाव्या हातांत धनुष्य घेतलें असून उजव्या हातांत बाण घेतला आहे. डोक्याला शिरस्त्राण घातलें असून, अंगांत चिलखत घातलेलें आहे. त्यावरून पेशव्यांच्या चित्रांतील लांब अंगरख्याप्रमाणें अंगरखा घातलेला आहे. कमरपट्टयानें कमर आंवळलेली आहे. याच्याहूनहि चेहऱ्याचे सर्व अवयव उत्कृष्टतेनें दिसून येणाऱ्या पुतळ्याचें चित्र याखालीं दिलें आहे.

हा पुतळा बॅबिलोनिअन शहरांच्या अवशेषासाठीं निघालेल्या अमेरिकन लोकांना बिस्मिया येथें सांपडला. यांतील वाटोळे डोळे, मांसल, बांकदार व पसरट

नाक, भरीव व जाड असा खालचा ओठ, डोक्याला बांधलेल्या वस्त्राची पद्धति, वगैरे उत्तम तऱ्हेनें व्यक्त झालेलीं आहेत.



**एक बॅबिलोनी वीर-पुरुष.**

याप्रमाणें सुमेरी व बॅबिलोनी अशा दोन भिन्न-मानव-वंशांतील माणसांचें रूप आपल्याला पहावयास मिळतें. यावरून मानव-वंश-शास्त्रदृष्ट्या काय सिद्धान्त निघतो, हें समजण्यासाठीं आपल्याला त्या शास्त्राचीं मूलतत्त्वें पाहिलीं पाहिजेत. याकरितां आपण आतां त्याकडे वळूं.

'The proper study of mankind is man' म्हणजे ' अखिल मानवजातीबद्दल सशास्त्र अभ्यास करावयाचा असल्यास त्या जातीचे घटक जीं मनुष्यें, त्यांचा व्यक्तिशः प्रथम अभ्यास केला पाहिजे ' असें एका इंग्रजी कवीनें म्हटलें आहे, तें खरें आहे. अशीं अनेक मनुष्यें तपासून त्यांचे गुणधर्मानुसार गट बनविणें, त्या गटांतील साधर्म्य-वैधर्म्य परीक्षून त्यांवरून त्यांचे अधिक मोठे गट बनाविणें, हीच पद्धत या शास्त्रांत स्वीकारावी लागते. या शास्त्राला Ethnology अथवा मानव-वंश-शास्त्र असें नांव आहे. तथापि अशा अभ्यासापूर्वी मनुष्य जातीची मूळ उत्पत्ति कशी झाली व त्या उत्पत्तिकाळाच्या मूळ स्वरूपापासून पुढें मानवांची परिणति अथवा विकास कसकसा होत गेला, त्याचा अभ्यास क्रमशः आधीं येतो. या संबंधींच्या शास्त्राला Anthropology अथवा ' मानव-विकास-शास्त्र ' असें म्हणतात. या इंग्रजी

शब्दाचा विग्रह, Anthropos=man and logos=science असा आहे. मनुष्य-जात जगतावर निर्माण झाल्यापासूनचा तिचा इतिहास अभ्यासण्याचें या शास्त्राचें काम आहे, व या दृष्टीनें परिणत स्थितींतील त्या मनुष्यजातीच्या भेदाभेदांचें परीक्षण



**एक सेमेटिक वंशाचा पुरुष.**

( हल्लींचे यहुदी लोक याच वंशांतील होत, व त्यांची चेहेरेपट्टी या चित्रा-प्रमाणेंच असते. )

करणें याचाहि अंतर्भाव मानव–विकास–शास्त्रांत होतोच. तथापि एका शास्त्राच्या अंतर्गत अशा अनेक दृष्टींचा अभ्यास जसजसा वाढत जातो, तसतसा त्या दरेक पोट-विभागाला स्वतंत्र शास्त्र अशी संज्ञा प्राप्त होते. या रीतीनें पहातां मानव–वंश–शास्त्र हें एका दृष्टीनें मानवविकास–शास्त्राचा पोटभाग आहे, तर दुसऱ्या दृष्टीनें तें एक स्वतंत्र शास्त्र आहे. Ethnology यांत Ethnos=race, and logos-science असे दोन शब्द आहेत, व त्यावरूनच त्याला मराठींत तदर्थक प्रतिशब्द बन-विला आहे,

मूळ मानवजाति एकस्वरूप असतांना तिच्यांत मागून फरक उत्पन्न झाले, तेव्हां त्या फरकांचे विशेष पाहून त्यावरून त्यांचें वर्गीकरण करणारें शास्त्र जन्माला आलें हें उघडच आहे. तेव्हां येथें पहिला प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, मूळच्या एक-जिनसी मानवजातींत असे हे कायमचे फरक पडण्यास कारण काय ? या प्रश्नाचें

उत्तर पहातां **परिस्थिति** हें त्याला अत्यंत महत्त्वाचें कारण आहे, असें दिसून येतें. डक्वर्थ या शास्त्रज्ञानें म्हटल्याप्रमाणें ' अनेक प्रकारची भिन्न परिस्थिति मूळ मानव-वंशांतल्या भिन्न ठिकाणच्या समूहांना प्राप्त झाल्यानें, त्यांच्यांत कायमचे फरक पडले. '

या परिस्थितींत **भौगोलिक परिस्थिति** हा एक महत्त्वाचा प्रकार आहे. त्यामुळें निरनिराळी हवा, शीतोष्णता, खाद्यपेयें, व यांमुळें उत्पन्न होणाऱ्या संवई, वगैरेमुळें जे फरक आरंभीं पडले, ते पुढें कायमचे होत गेले. त्या फरकांमुळेंच पुढें मानव-वंशाच्या कायमच्या ठळक ठळक पोटजाती उत्पन्न झाल्या. तेव्हां ते फरक कोणकोणत्या गोष्टींत पडले, तें आतां आपण पाहूं.

१ पहिला फरक शरीराच्या वर्णाचा होय. वानरापासून मूळ मनुष्यजातीची उत्पत्ति झाल्याचा सिद्धांत डार्विन्नें प्रथम जगापुढें मांडला; व पुढें त्याचा सर्वत्र स्वीकार झाला; यावरून शास्त्रज्ञांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं, मानव-जातीच्या उत्पत्तिकाळीं तिचा वर्ण वांदरांच्याच वर्णाप्रमाणें-पिंगट पिंवळट-असा होता. यानंतर वर सांगितलेल्या अनेक कारणांमुळें त्यांत फरक पडत गेला. असा फरक पडण्याचें तज्ज्ञांच्या मतें कारण असें आहे कीं, त्वचेच्या निरनिराळ्या कोशांत ( Cells ) एक प्रकारचा रंग भरलेला असतो, व त्याचा सूर्यप्रकाशाशीं व बाहेरच्या हवेशीं संयोग होण्यानें, त्यांचें भिन्नभिन्न रासायनिक मिश्रण बनतें; अर्थात् त्याप्रमाणें भिन्नभिन्न वर्ण उत्पन्न होतात व ते परंपरेनें व अनुवंशिकतेनें कायम होतात. ज्या प्रमाणानें सूर्यप्रकाश अधिक, त्या प्रमाणानें संयोगमिश्रण अधिक काळें होत जातें. जर्मनी, नॉर्वे व स्वीडन या देशांतील लोकांना सबंध वर्षांत फक्त १२५० ते १२०० तासच सूर्यप्रकाश मिळत असल्यानें, तेथें काळ्या रंगाचें मिश्रण कमी तयार होतें. व म्हणून तेथील लोक गौर वर्णाचे, निळसर डोळ्याचे व वेदांत वर्णन केलेल्या इंद्राच्या वर्णाप्रमाणें सोनेरी वर्णाचे असतात. अर्थात् उत्तरध्रुवापाशीं राहणाऱ्या मूळ आर्यलोकांचा वर्ण कांचनाप्रमाणें गौर होता व तो वेदांत तसा असल्याचें वर्णन केलें आहे, हें युक्तच आहे. सूर्यप्रकाशाप्रमाणेंच हवेच्या आर्द्रशुष्कतेचा परिणामहि कांहीं अंशानें वर्णावर होतो. हवेंत अधिक शुष्कता असल्यास पिंवळा वर्ण उत्पन्न होतो. पिवळ्या रंगाच्या मंगोलिअन लोकांची बस्ति सपाट प्रदेशावर व शुष्क हवेच्या मैदानावर असल्यानें, त्यांच्यांत पीतवर्ण बळावला. यासंबंधीं प्रो. एल्. डब्ल्यू लाइड् म्हणतात कीं, ' समशीतोष्ण कटिबंधांत, सपाट मैदानांतील गवत कांपून टाकून तेथें वस्ती केल्यानें आर्द्रता नाहींशी झालेल्या हवेमुळें, मोंगल जातींत पिंवळा वर्ण उत्पन्न झाला आहे. ' आफ्रिकेसारख्या सतत उन्हांत भाजणाऱ्या लोकांत सूर्यप्रकाशाच्या अतिशयामुळें वर्णमिश्रण काळें बनलें आहे. अमेरिकेंतलि ताम्रवर्ण लोकांच्या तांब्यासारख्या रंगाची उपपत्ति मात्र अजून शास्त्रज्ञांना झाली नाहीं. आद्यकालीन अमेरिकन हवेची शास्त्रीय चिकित्सा अजून झाली नसल्यामुळें त्या वर्णाची उपपत्ति अजून लावतां आली नाहीं, असें शास्त्रज्ञ म्हणतात.

२ वर्णानंतर मनुष्यजातीच्या पोटभागांत पडणारा फरक डोक्याचा अथवा

मस्तकाचा आणि चेहऱ्याचा आकार हा होय. याची परीक्षा करण्याची पद्धति खालीं दिल्याप्रमाणें आहे. दोनहि कानांच्या चाफ्यांमधील डोक्याच्या अंतराला रुंदी असें म्हणतात, व डोक्याच्या मागील भागापासून पुढील कपाळापर्यंतच्या अंतराला लांबी म्हणतात. व लांबीशीं रुंदीचें जें प्रमाण पडतें त्यावरून मानव-जाती नक्की करितात, लांबी नेहमीं १०० आहे असें कल्पून त्या मानानें रुंदी ७५ च्या पेक्षां कमी असेल. तर अर्थात् लांबीचें रुंदीशीं असलेलें प्रमाण सर्वांत अधिक बसतें, व त्यामुळें अशा प्रमाणाच्या मस्तकाच्या माणसांना **लंबशीर्ष** ( dolio-cephalic ) म्हणतात. लांबीच्या १०० या प्रमाणाशीं रुंदी जर ७५ ते ८० असली; तर अर्थात् लंबशीर्ष लोकांपेक्षां या लोकांच्या डोक्यांच्या लांबीचें प्रमाण कमी पडणार व म्हणून या लोकांना **मध्यमशीर्ष** ( mesati-cephalic ) म्हणतात, व १०० लांबीच्या मानानें रुंदी जर ८० च्या वर असेल तर अर्थातच मागील दोनहि प्रकारच्या लोकांपेक्षां या लोकांच्या डोक्यांच्या लांबीचें प्रमाण सर्वांत कमी पडणार, व म्हणून अशा लोकांना **पृथुशीर्ष** ( brachy-cephalic ) असें म्हणतात. लांबीला रुंदीनें भागून जो आंकडा येईल त्याला cephalic-index अथवा **शीर्षांक** असें म्हणतात. लंबशीर्षांचा शीर्ष-सूचक $\frac{१००}{७५}=\frac{४}{३}$ कमींत कमी असणार, मध्यमशीर्षांचा $\frac{१००}{८०}=\frac{५}{४}$ असणार व पृथु-शीर्षांचा किमान सूचक $\frac{५}{४}$ पेक्षां कमी असणार.

३ यानंतरचा फरक नाकासंबंधाचा होय. नाकाचा आरंभ कपाळाच्याखालीं जेथून होतो, तेथें त्याची उंची किती आहे, हें प्रथम पहावें लागतें. ही उंची जितकी अधिक अथवा कमी असेल, अथवा उलट बोलावयाचें तर, तेथील जागा ज्या मानानें कमी अथवा अधिक खोल असेल, त्या मानानें त्या नाकाचे आर्य व अनार्य असे भेद ठरवितात. तसेंच पुढे नाक बारीक, सरळ व लांब असेल अथवा, पसरट, वांकडें अथवा आंखूड असेल त्या मानानेंहि याच जाती नक्की करितात. सर्वांत अधिक बारीक, सरळ, व लांब नाकें असलेल्या समूहाला आर्य म्हटलें आहे, व सर्वांत नकट्या, बसक्या, फेंपट्या व अपऱ्या नाकाच्या लोकांना Negroid नीग्रो म्हणतात.

४ यानंतरचा फरक केसांचा होय. या केसांचे स्थूलतः तीन प्रकार आहेत. एक प्रकारचे केंस लोंकरीसारखे कुरळे व खरबरीत असतात, दुसरे, लहरीसारखे नाग-मोडी व मृदु असतात, व तिसरे सरळ व खरबरीत असतात. नुसत्या बाह्य आकारा-वरून हा फरक लक्षांत निश्चित रीतीनें येण्यासारखा नाहीं. कारण कृत्रिम रीतीनें व संवयीनें केसांचे वर वर्णिलेले बाह्य आकार बदलतां येतात. म्हणून हे प्रकार परीक्षिण्याचें खरें साधन बाह्य आकार नव्हे. त्यासाठीं दरेक प्रकारचा एकेक केस घेऊन त्याचा आडवा छेद केल्यास त्यांचे तीनही प्रकार दुर्बिणच्या साह्यानें समजतां येतात. दरेक केस म्हणजे एक पोकळ नळी असते. अर्थात् त्या नळीला तोंड असतें. निरनिराळ्या प्रकारच्या केसाच्या छेदापाशीं त्याच्या तोंडाचा आकार निरनिराळा असतो, असें

दिसून येईल. यासाठीं एकेक केस घेऊन तो ताठ धरून मध्येंच तोडावा व मग त्याचें टोंक दुर्बिणींतून पहावें, म्हणजे असें दिसेल कीः—

लोंकरीसारख्या कुरळ्या केसांच्या तोंडाचा आकार लंबगोल ⬭ असा असतो,
मृदु व सरळ केसांच्या तोंडाचा आकार वर्तुलाकृति ○ असा असतो,
व नागमोडी केसांच्या तोंडाचा आकार मध्यम प्रकारचा ⬭ असा असतो.

यावरून हे केसांचे प्रकार निश्चित रीतीनें ओळखतां येतात; व अशा प्रकारचे केंस असणाऱ्या मनुष्यसमुदायांचे भेद निश्चित रीतीनें पडतात.

५ अखेरचा व पांचवा मुख्य फरक उंची हा होय. हा फरक मनुष्यज्ञातीच्या पोटभेदाचा निश्चित असा पुरावा होऊं शकत नाहीं, हें खरें आहे; तथापि तें एक प्रमाण आहे, इतकें खास. वैयक्तिक अपवाद सोडून निश्चित अशा समूहांची उंची मोजली, तर त्यांची सरासरी मर्यादा किमान ४ फूट ४ इंचापासून तो कमाल ५ फूट १० पर्यंत असते. ही उंची अर्थात्च हवापाणी, खाद्यपेय, आनुवंशिक परिणाम, इत्यादि अनेक कारणांवर अवलंबून असते. खाण्याचा पुरवठा अनिश्चित, अपुरा अथवा अपौष्टिक असा असला, तर उंची कमी होते. त्याचप्रमाणें नेहमीं बैठ्या कामाची संवय असल्यासहि तसाच परिणाम घडून येतो. सन १८८४ ते १८८९ च्या अवधींत स्वित्झर्लंड देशांत केलेल्या तपासणीवरून असें दिसून आलें, कीं, आपला व्यवसाय करण्यासाठीं चालावें लागणाऱ्या धंद्याच्या लोकांपैकीं शेंकडा ४७ लोकांची उंची ५ फूट ७ इंचांच्यावर होती; तर याच्या उलट शिंप्याचें बैठें काम करणाऱ्या लोकांत इतकी उंची फक्त शेंकडा ७ जणांची होती, कारखान्यांत काम करणाऱ्यांची, चांभारांची व विणकाम करणाऱ्यांची ती ११ जणांची होती, बुरूड, व झाडूवाल्यांत ती शेंकडा १२ जणांची होती. सुपीक व सपाट मैदानावर राहणाऱ्या लोकांपेक्षां डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या लोकांची उंची कमी असते. पिण्याच्या पाण्यांत चुन्याचा भाग कमी असल्यासहि उंची कमी होते, व म्हणून भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या पाण्यांत चुन्याचा पुरवठा कमी असल्यानें, त्या प्रांतांतून राहणाऱ्या लोकांची उंची कमी आहे. लवकर लग्न होणाऱ्या लोकांची उंचीहि कमी असते. मात्र या ठिकाणीं लग्न या शब्दाच्या अर्थाचा खुलासा करणें अत्यंत अवश्य आहे. युरोपियन व अमेरिकन् लोकांत लग्न व स्त्रीपुरुषसंबंध हे समकालीन होत असल्यानें एकाचाच दुसरा शब्द पर्यायवाचक मानला गेला आहे. यामुळेंच त्या अर्थानें हिंदुस्थानांतलि लोकांमधील लग्नाचा अर्थ ते लोक करीत असल्यानें, मिस मेयोसारख्या निंदकांना हिंदुस्थानची बेअब्रू करण्यास सांपडते. वस्तुतः गेल्या पन्नास साठ वर्षांतील हिंदुस्थानांतील पिढी, मागील कांहीं पिढ्यांपेक्षां तरी उंचीनें कमी असल्याची प्रत्यक्ष माहिती मिळतें; तरी पण मागल्या पिढ्यांत लग्नें लवकर होत असत! या विरोधाभासाचा खरा खुलासा हा आहे कीं, त्या मागील पिढ्यांतील स्त्रीपुरुषांचीं लग्नें लवकर होत, तथापि त्यांच्यांत समाईक कुटुंबव्यवस्था असल्यानें त्या वेळीं स्त्रीपुरुषसंबंध होणें तर अशक्यच होतें. परंतु पुढेंहि योग्य वय होईपर्यंत त्यांना तशी संधि मिळत नसे, व त्यानंतरहि कांहीं

वर्षे तो संबंध अत्यंत नियमित व मर्यादित असे. अशी स्थिति असल्यानें लग्नाचा धार्मिक विधि जरी लहान–वयांत होत असला, तरी लग्न हा शब्द त्यांच्या संबंधानें संयोगवाचक कधींच नसे.

या संबंधानें हिंदुस्थानांतील मुंबई इलाख्याच्या सिव्हिल सर्व्हिसमधील ' ॲंटो रॉथफील्ड ' यांनीं आपल्या ' Women of India ' ( हिंदुस्थानांतील स्त्रिया ) या पुस्तकांत अशाच अर्थाचें विवेचन केलें आहे, तें असें:—

" Real child-marriage—The wedding of children who have not yet reached puberty is, after all nothing more than an indefeasible betrothel...The real marriage, the consummation of their growth to man and woman, comes much later, after many years perhaps, when their parents at last give their consent to the grown student and the healthy maiden, who helps daily in the house-hold tasks. "

( वयांत न आलेल्या लहान मुलांमुलींचें लग्न म्हणजे केवळ अभेद्य असा एक वाङ्निश्चय होय. लग्न या खऱ्या अर्थानें, त्यांचा पतिपत्नी या नात्याचा शरीरसंबंध या वाङ्निश्चयानंतर पुष्कळ वर्षांनीं, मुलगा संबंधयोग्य झाल्यावर व मुलगी सुवर्धित होऊन गृहकृत्याचीं सर्व कामें करूं लागल्यावर उभयतांच्या पालकांच्या संमतीनेंच घडून येतो. )

खरी स्थिति अशी असतां, तिचा जाणूनबुजून विपर्यास करून, " हिंदुस्थानांत लहान मुलें कडेखांद्यावर खेळत असतांनाच त्यांच्या आयादाया त्यांना इंद्रियसंनिकर्षानें स्त्रीपुरुषसंबंधाचें पूर्व शिक्षण देत असतात, व मग अशा मुलांमुलींचीं पांच-चार वर्षांच्या वयांत लग्नें झाल्याबरोबर तीं गर्भाधानसमारंभासाठीं तडक अंतर्गृहाकडे दवडतात, असलें असत्य हिडिस व हलकट चित्र, हिंदुस्थानाची केवळ बेअब्रू करण्याच्याच हेतूनें काढलें आहे, तें वस्तुस्थितीचें निदर्शक नसून लिहिणारीच्या असत्य, हिडीस व नीच स्वभावाचें प्रतिबिंब आहे, हें उघड आहे.

तेव्हां वर नमूद केलेल्या पांच प्रकारच्या मुख्य फरकांवरून मनुष्य जातीचे निरनिराळे गट पाडण्यांत आले आहेत. इतकें पांच प्रकार एकत्र केले तरी मानवसृष्टींतील दरेक मनुष्याची निश्चित वर्गवारी त्यांवरून लावतां येईल, असा त्याचा अर्थ समजावयाचा नाहीं. कारण अगदीं शुद्ध स्वरूपांत दरेक जातींतील सर्वच नमुने असणें शक्य नसतें. संबंध प्रतिसंबंधानें त्यांत अनेक प्रकार उत्पन्न होतात. तथापि साधारणतः वरील प्रकारचें वर्गीकरण बहुतांशीं सशास्त्र व समाधानकारक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

याप्रमाणें परीक्षा करण्याकरितां जीं मापें, प्रमाणें वगैरे घ्यावीं लागतात, त्यांच्यांत निरनिराळ्या देशांतून एकवाक्यता असली पाहिजे. यासाठीं सन १८८२ सालीं जर्मन शास्त्रज्ञांनीं मापांच्या प्रमाणांचा एक तक्ता तयार करवून तो सर्वांकडून मंजूर करवून घेतला. त्या संबंधींच्या सार्वराष्ट्रीय कराराला Frankfort Agreement फ्रॅंकफर्टचा करार म्हणतात, व त्या अनुरोधानें तेव्हांपासून सर्वत्र मापें घेतलीं जातात.

आतां वरील सर्व प्रकारांपैकीं दरेकाचा विचार करून त्यांत हल्लींच्या मनुष्य-जातींतील कोणकोणत्या गटांचा समावेश होतो, तें आतां आपण पाहूं.

१ प्रथम **वर्णाचा** विचार करतां, एकंदर चार मुख्य वर्ण ठरवितां येतात; तें म्हणजे श्वेत, पीत, रक्त व कृष्ण हे होत. पैकीं रक्त अथवा ताम्र म्हणजे तांब्यासारख्या तांबड्या वर्णाचे लोक, फक्त अमेरिकेंतील मूळ रहिवासी,—ज्यांना Red Indians ( तांबडे इंडियन ) म्हणतात, तेवढेंच असल्यानें, व त्यांची अमेरिकन लोक आज अनेक वर्षें लांडगेतोड करीत आले असल्यामुळें, ते दिवसेंदिवस नामशेष होतच चालले असल्यानें, त्यांचा विशेष विचार करण्याचें कारण नाहीं. बाकींच्या तीन वर्णांपैकीं श्वेत अथवा गोऱ्या वर्णांत उत्तर व पूर्व युरोपांतील लोकांचा ताम्रगौर वर्ण, पश्चिम युरोपांतील लोकांचा निस्तेज गौरवर्ण, अफगाण व उच्च हिंदूंचा पीत गौरवर्ण, सेमेटिक् लोकांचा, बर्बर लोकांचा व असीरिअन् लोकांच्या वंशजांचा ( ज्यांच्यांत, कुर्डिस्थानांतील लोक, आर्मीनिअन व यहुदी यांचा समावेश होतो. ) कपिल गौरवर्ण; इतक्या प्रकारांचा अंतर्भाव होतो.

२ पीतवर्णीयांत पांढरट पिंवळ्या लॅप, युक्राईन व तुर्क लोकांचा, फिकट-पिंवळ्या अशा दाक्षिणेकडील व उत्तरेकडील मोंगल लोकांचा, सतेज पीतवर्ण अशा पॅटागोनिअन व अमेरिकेच्या दाक्षिणेंतील व उत्तरेंतील लोकांचा, कपिल-पीत अशा पॉलिनेशिअन् व इंडोनेशियन् लोकांचा व पिंगट-पिंवळ्या एस्किमोंचा समावेश होतो.

३ कृष्णवर्णांतील लोकांत अगदीं कोळशासारख्या काळ्या बंटु, निग्रो व शिद्दी लोकांचा, तांबडसर काळ्या वर्णाच्या नेग्रिटोंचा, पिंजट-काळ्या अथवा चॉकोलेटप्रमाणें वर्णाच्या आस्ट्रेलिआंतील मूळ रहिवाशांचा, वगैरेंचा समावेश होतो.

आतां यापुढें आपण **मस्तकाच्या आकाराचा** विचार करूं. येथून पुढील विचार करितांना मात्र आपल्याला जगांतील सर्व जातींचा विचार करण्याचें कारण नाहीं. आपला सिद्धांत स्थापन करण्यासाठीं जरूर तेवढ्यापुरतेंच विवेचन आपण करीत जाऊं. तेव्हां या शीर्षमापनाच्या दृष्टीनें पाहतां लंबशीर्षांच्या गणनेंत युरोपिअनांपैकीं टयूटन लोक, हिंदुस्थानांतील आर्य लोक, व इतर कांहीं लोक यांचा समावेश होतो. प्राचीन काळांतील लोकांपैकीं सुमेरी लोकहि सर जॉन मार्शलच्या, मागें दिलेल्या, अभिप्रायाप्रमाणें लंबशीर्षच होते, व त्यांच्याच पुराव्यावरून सिंधमधील सांपडलेल्या सांगाड्यांच्या शीर्षमापनावरून तेथील लोकहि लंबशीर्ष असल्याचें सिद्ध झालें आहे. याच्या उलट सुमेरी लोकांनंतर त्यांच्या देशांवर राज्य करणारे बॅबिलोनिअन् लोक हे पृथुशीर्ष होते, यावरूनहि ते भिन्नवंशीय असल्याचें शास्त्रीय रीत्या सिद्ध झालें आहे.

तिसरा फरक नाकासंबंधाचा होय. शीर्षमापनापेक्षांहि नासामापनाचें महत्त्व फार आहे. टोपीनार्ड या शास्त्रज्ञानें म्हटल्याप्रमाणें:—'The character of the nose establishes a transition from the Ape to the Man.

वानर व मनुष्य यांच्यामधील अंतराच्या दुव्यांचा दर्शक असा हा फरक आहे. या दृष्टीनें नाकांची तुलना करतांना जो मापनांक घेतात त्याला Nasal Index अथवा **नासांक** म्हणतात. नाकाच्या आंतल्या छिद्राची रुंदी आणि नाकाच्या मूळापासून शेंड्यापर्यंतचें अंतर, यांच्यामधील प्रमाणास **नासांक** म्हणतात. अर्थात् या प्रमाणानें मोजतां, ज्यांच्या नाकांच्या लांबीच्या मानानें त्याची रुंदी सर्वांत कमी असेल, त्यांना **तुंगनास** ( Leptorrhine ) म्हणतात; त्याहून अधिक रुंदी ज्यांच्या नाकाची असेल, त्यांना **मध्यमनास** ( Mesorrhine ) म्हणतात; व सर्वांत अधिक पसरट अथवा फतकर्डी नाकें ज्यांचीं असतील, त्यांना **पृथुनास** (platirrhine) असें म्हणतात. पहिल्या वर्गाचा **नासांक** ७० च्या आंत असतो, दुसऱ्यांचा ७०-८० असतो, व शेवटच्यांचा ८५ च्या वर असतो. सर्वसाधारण रीतीनें श्वेतवर्णीय लोक निरुंद नाकाचे, कृष्णवर्ण लोक रुंद नाकाचे व पीतवर्ण लोक मध्यम नाकाचे असतात. अर्थात् नेहमीप्रमाणें यांत अपवाद हे सांपडावयाचेच. हिंदुस्थानांतील शुद्ध आर्य व उच्च वर्णीय लोक बहुतेक निरुंद नाकाचे असतात, द्राविड लोक मध्यम नाकाचे असतात व अगदीं रानटी जाती मात्र रुंद नाकाच्या असतात. वेदकालींहि हिंदुस्थानांत आर्य निरुंद नाकाचे असल्याबद्दल वैदिकवाङ्मयाचा पुरावा आहे. त्याचप्रमाणें सिंधमधील सांगाडेहि निरुंद नाकाच्या लोकांचेच असल्याबद्दल मार्शल साहेबांनीं प्रसिद्ध केलें आहे. आर्यांशिवायचे त्या काळचे द्राविडी लोक म्हणजेच असुर लोक होत; ते मध्यम नाकाचे होते, व तत्कालीन रानटी लोक—ज्यांना दस्यु म्हणत ते—रुंद नाकाचे असल्यानें त्यांना वैदिक लोकांनीं 'अनास' बिननाकाचे म्हणजेच नकट्या अथवा चपट्या नाकाचे म्हटलें आहे. मेसापोटेमियांतील प्राचीन लोकांपैकींचे सुमेरी लोक निरुंद नाकाचे व त्यांच्या नंतरचे बॅबिलोनी लोक मध्यम नाकाचे असल्याबद्दल प्रत्यक्ष व लेखी पुरावाहि यापूर्वी आपण पाहिलाच आहे.

यानंतर **केसांचा** विचार येतो. स्थूलमानानें लोंकरीसारख्या कुरळ्या केसांच्या लोकांत आफ्रिकेंतील नीग्रो, टासमानिअन, बुशमेन, पापुअन् वगैरे लोक समाविष्ट होतात. सरळ केसांच्या लोकांत मोंगल, चिनी, जपानी वगैरे पीतवर्णी लोक येतात व नागमोडी केसांच्या लोकांत श्वेतवर्णीय लोक येतात. यांतच हिंदु, आर्य, अफगाण, सुमेरी लोक व युरोपियन लोकांचा समावेश होतो. या दृष्टीनें प्राचीन काळच्या लोकांचे परीक्षण करण्यास मात्र प्रत्यक्ष साधन उपलब्ध नाहीं. कारण त्या काळचे केस प्रत्यक्ष मिळविणें जवळ जवळ अशक्य आहे. सुमेरी पुतळ्यांच्या केसांचें वळण पाहतां, सुमेरी लोकांचे वळण नागमोडी असल्याचें दिसून येतें.

अखेरचा फरक **उंचीचा** होय. पण हा फरक वरील चारहि फरकांच्या मानानें सर्वांत कमी महत्त्वाचा आहे, असें तज्ज्ञांचें मत आहे. पृथ्वीवरील मनुष्यजातींपैकीं अनेक जातींची उंची मोजतां, साधारणतः असें प्रमाण काढण्यांत आलें आहे कीं, मनुष्याच्या उंचीचें मध्यमान ५ फुट ६ इंच आहे. ५ फुट ८ इंचाहून अधिक उंचीचे लोक उंच समजावयाचें; ५ फुट ४ इंचाहून कमी उंचीचे लोक ठेंगणे म्हटले जातात, व ४ फुट ११ इंचाहून कमी असलेले लोक खुजे मानले जातात. सिंधमधील

सांगाडे उंच माणसांचें होते, असें त्यांचे माप घेतां निघतें.

येणेंप्रमाणें दरेक फरकाचा व्यष्टिशः विचार केल्यावर, आतां मानव-वंशाच्या श्वेत, पीत व कृष्ण या तीन मुख्य मुख्य गटांच्या दृष्टीनें त्यांचा समष्टिशः विचार करूं गेल्यास निष्कर्ष खालीलप्रमाणें निघतोः—

**श्वेतवर्णीयांचीं मुख्य चिन्हें**—साधारणतः येणेंप्रमाणें आहेत. गौरवर्ण, मृदु व नागमोडी केश, चेहरा लंबगोल, पुरुषांना जाड दाढीमिशा, गालांचीं हाडें आंत असलेलीं ( म्हणजे पुढें न आलेलीं ), नाक निरुंद, लांब व धार असलेलें, डोळे सरळ व मध्यम मोठे, ओठ पातळ, नाकाच्या पातळीच्या मानानें तोंडाचा जबडा मागें गेलेला (म्हणजे वांदरासारखा नाकाच्या पुढें न आलेला) व आकृति उंच, बुद्धिदृष्ट्या व स्वभावदृष्ट्या हे लोक, चपल, साहसी, उद्योगी, चिकाटीचे, हरहुन्नरी, व बुद्धिवान् असतात.

**पीतवर्णीय लोकांचीं मुख्य चिन्हें**-येणेंप्रमाणें आहेत. शरिराचा वर्ण, पिंगटपासून पिंपळ्यापर्यंत, पृथुशीर्ष, खरखरीत, सरळ व काळे केस, चेहरा रुंद व चपटा, चेहऱ्यावर केस अगदीं विरळ व तुरळक व तेहि उशीरा येणारे, नाक रुंद व आंखूड, डोळे काळे, खोल, अरुंद व तिरकस, गालांचीं हाडें पुढें आलेलीं, उंची मध्यम व बऱ्याच प्रसंगीं मध्यमाहूनहि कमी, स्वभावानें हे लोक आळशी, उदास, काटकसरी धूर्त, सावधचित्त व मध्यम बुद्धिवान् असतात.

**कृष्णवर्णीयांचीं मुख्य चिन्हें**—वर्ण काळा, डोक्याची कवटी लांबट, केंस काळे, खरबरीत व लोंकरीसारखे कुरळे, चेहरा बसका, नाक अगदीं सपाट व रुंद, ओठ जाड, भरीव व लोंबलेले, शरीरावरील केस तुरळक, मिशा व दाढी बहुतेक नाहीं सारखीच, काळे, वाटोळे व मोठाले डोळे, व आकार मध्यमउंच व बऱ्याच लोकांत मध्यमाहून अधिक उंच. स्वभावाच्या व बुद्धीच्या दृष्टीनें हे लोक सर्वांत हलक्या प्रतीचे होत. विषयी, संतापी, अविचारी, निर्दय, आळशी, इमानी व हट्टी असे हे लोक असतात.

याप्रमाणें मानव-वंश-शास्त्राची रूपरेषा वर्णिली आहे. तीवरून पहातां सुमेरी लोक व हिंदुस्थानांतील वैदिक आर्यलोक हे दोघेहि सर्व दृष्टीनें श्वेतवर्णीय लोकांपैकींचें असल्याचें सर्व चिन्हांवरून निःसंशय सिद्ध होतें. हाच निष्कर्ष पाश्चात्य संशोधकांनींहि काढला आहे. त्यासंबंधानें Cambridge ancient History मध्यें म्हटलें आहे कीं,

" In Sumerians it has now been possible to recognize the presence of a people, who as regards physical type and culture, were not Semitic, but had points of contact, not with Arabian desert on the west, but with the East."

( अलीकडील शोधांवरून सुमेरिअन लोकांचा चेहरेपट्टी, वर्ण वगैरे दृष्टीनें आणि संस्कृतीच्या दृष्टीनें पौरस्त्य लोकांशींच संबंध सिद्ध होतो. त्यांच्या नजीक पश्चिमेस असलेल्या अरेबिआच्या वालुकामय प्रदेशांतील सेमेटिक लोकांशीं त्यांचें सादृश्य मुळींच नाहीं. )

त्याचप्रमाणें सुमेरी चेहरेपट्टीच्या वर्णनासंबंधानें त्यांत म्हटलें आहे कीं—

The characterestics of Sumerian Physiognomy and coiffure are a high straight nose, joining the cranium without appreciable depre-

ssion at the bridge, the forehead slightly receding, the axis of the eye sloping slightly downward from the inner to the outer cover.

( सुमेरी चेहरेपट्टीचीं मुख्य चिन्हें म्हणजे, नाक उंच व लांब असून त्याच्या मूळाशीं जवळजवळ मुळींच खोलगा नसणें, कपाळ नाकापासून वर जातांना किंचित् मागील बाजूस झुकलेलें; डोळ्यांच्या नाकाजवळच्या टोकापेक्षां कानाकडील टोकाचा मध्यबिंदु किंचित् खालच्या बाजूस आलेला, हीं होत. )

या डॉ. स्टीफन लॅंडन्साहेबांनीं केलेल्या सुमेरी लोकांच्या वर्णनाशीं सर हर्बट रिस्ले यांनीं हिंदुस्थानांतील खानेसुमारीवरून Indian Gazetteer मध्यें केलेलें हिंदु आर्यांचें वर्णन ताडून पाहूं. रिस्लेसाहेब म्हणतातः—

" There now exists in the Punjab and Rujputana, a definite physical type, which is marked by a relatively long ( dolio cephalic ) head, a straight, finely cut nose; a long symmetrically narrow face, a well-developed forehead, regular features. The stature is tall. "

( हल्लीं पंजाब व राजपुताना या प्रांतांत कांहीं निश्चित शारीरिक गुणधर्म असलेला मानवसमाज स्पष्टपणानें आढळतो. या समाजांतील लोक लंबशीर्ष, सरळ व निरुंद नाकाचे, लंबगोल चेहऱ्याचे, पुष्ट भालप्रदेशाचे, प्रमाणबद्ध अवयवांचे, व उंच आकृतीचे आहेत. )

अर्थात् या दोनहि वर्णनांवरून हे दोनहि समाज एकस्वरूप असल्याची सहज प्रतीति होते, व तसाच सिद्धांत वॅडेलसाहेबांनीं काढला आहे. ते म्हणतातः—

" The Sumerians—those foremost civilized and civilizing ancient people, whose monuments and high art of five thousand years ago, are the wonder of the Modern-World were the long-lost Aryana."

( अत्यंत प्राचीन काळांतील स्वतः सुसंस्कृत असलेले व दुसऱ्यांना सुसंस्कृत करणारे सुमेरिअन लोक—कीं ज्यांच्या इमारती व उच्च कलाज्ञान आज सर्व जगाला दिपवून टाकीत आहे ते दुसरे तिसरे कोणी नसून, ते आजपर्यंत पत्ता लागला नसलेले आर्य लोकच होत. )

याच सुमेरिअन लोकांच्या काळासंबंधानें Combridge History मध्यें अखेरचें व निश्चित मत असें दिलें आहेः—

At the most conservative estimate, the old Semetic dynasty of kish cannot be reduced below 4500 B. C. and probably recedes well below into the fifth millenium. On this view, then, the earliest kingdom of Kish is northern and Semetic and its adoption of **Snmerian** culture suggests a long earlier of cultur **Sumerian** occupation in central Mesopotemia. "

( किश् येथील सेमेटिक जातीच्या लोकांचें राज्य कमींत कमी ख्रिस्तपूर्व ४५०० वर्षांइतकें तरी खास प्राचीन आहे, व बहुशा तें ख्रिस्तपूर्व ५००० वर्षां इतकेंहि प्राचीन आहे. तें राज्य मेसापोटेमियाच्या उत्तरभागाला होतें. त्या राज्यांत त्याहून प्राचीन अशा सुमेरी संस्कृतीचा अवलंब केला गेला होता; यावरून त्यापूर्वी पुष्कळ वर्षें सुमेरी संस्कृतीचा काळ मानला पाहिजे. ही सुमेरी संस्कृति हल्लींच्या मेसापोटेमियाच्या मध्यदेशांत प्रचलित होती. )

या एकंदर विवेचनावरून ख्रिस्तपूर्व सुमारें साडेपांच हजार वर्षांपूर्वी म्हणजे हल्लींच्या पूर्वी साडेसात हजार वर्षांमागें मेसापोटेमियांत आर्यवर्णीय सुमेरीलोक वसत असून जगताला दिपविण्यासारखी त्यांची संस्कृति होती व ते सुमेरीलोक व वैदिक आर्यलोक सर्वांशीं अभिन्न होते, इतकें पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या व संशोधकांच्याच तोंडानें कबूल झालें आहे. अर्थात् वेदांचा आद्य काल ठरविण्याची यापूर्वीच्या मॅक्स-म्युलरादि अर्वाचीनांचीं सर्व प्रमाणें येथें लटपटलीं आहेत, व त्यामुळें तो काळ सुमेरी संस्कृतीच्याहि पूर्वीपर्यंत मागें ढकलणें अवश्य प्राप्त झालें आहे. इतक्या प्राचीन काळीं हे दोनहि समाज अगदीं एकत्र व एकजीव असल्याशिवाय त्यांच्यांतील अनेक-विध सांस्कृतिक साम्यांची उपपत्ति लागणें शक्य नाहीं. तथापि इतक्या केवळ अनु-मानावरहि अवलंबून न राहतां वैदिक व सुमेरी वाङ्मयांत या उभयसमाजाच्या पूर्व-कालीन एकत्र वस्तीचें दर्शक उत्तरध्रुवप्रदेशीय परिस्थितीचें द्योतक अशा प्रमाणांचे स्पष्ट उल्लेखहि सांपडतात. त्याअर्थीं या लेखांकांत सिद्ध करण्यास घेतलेलें प्रमेय बहु-तांशीं सिद्ध झालें आहे, असेंच सर्वांचें एकमत होईल, अशी आशा वाटते. तथापि या लेखमालेचे धागेदोरे विवेचनाच्या भरांत इतक्या भिन्न शास्त्रांत जाऊन अडकले आहेत कीं ते एकत्र उपसंहृत केल्याशिवाय व त्यांच्या साह्यानें विणलेला सिद्धांतपट एकरूप असा दाखविल्याशिवाय वाचकांना निश्चिततेचें समाधान वाटणार नाहीं. आणखी शेवटचा एक लेख लिहून या विषयाचा उपसंहार करूं व त्यावरून निघणारा अखेरचा सिद्धांत वाचकांपुढें स्पष्टपणें मांडून त्यांची रजा घेऊं, असा विचार केला आहे.

# हिंदी-सुमेरी संस्कृतीचें मूलस्थान व उपसंहार.



मेरिअन् लोकांमध्यें प्रचलित असलेल्या आख्यायिका व धार्मिक दंतकथा या युफ्रेटिस्-टायग्रिस् नद्यांच्या टापूंतील सुमेरिअन् संस्कृतीहूनहि अत्यंत प्राचीन आहेत व त्यांचा उगम कोठें तरी अजून अनिश्चित असलेल्या प्रदेशांतील संस्कृतीच्या कल्पनासंग्रहांतून झालेला आहे, असें प्रो. मॅकेंझीचें अनुमान या लेखमालेच्या चौथ्या लेखांकांत दिलें आहे. व त्यानंतर सुमेरी व हिंदी या उभय संस्कृतींच्या एकरूपत्वावरून त्या त्या समाजांच्या एकरूपत्वाबद्दल काय निष्कर्ष निघतो हें पाहण्यासाठीं आपण त्या दोनहि समाजांचें उपलब्ध शरीरवर्णन मानव-वंश-शास्त्राच्या तत्त्वांच्या विस्तृत विवेचनानें पडताळून पाहिलें. त्यांत हे दोनहि समाज अगदीं एकरूप असल्याचा निष्कर्ष निघाला. तेव्हां आतां प्रो. मॅकेंझीला अनिश्चित वाटणारा या उभय संस्कृतींचा मूलप्रदेश कोणता, हें या शेवटल्या लेखांत आपण पाहूं. दोन सारख्या दिसणाऱ्या भावांच्या समानत्वाचाच नुसता खल करून त्यांच्या विषयींची कौटुंबिक इतिहासाची स्पृहा तृप्त होत नाहीं; तर त्यांच्या वाडवडिलांचा तपास लागला म्हणजेच बुद्धीला समाधान वाटतें. तशाच प्रकारें या दोनहि समाजांच्या मूळस्थानाचा पत्ता लावल्याशिवाय आपल्यालाहि समाधान प्राप्त होणार नाहीं.

हिंदी व सुमेरी संस्कृतीच्या विलक्षण साम्यावरून त्यांच्या मूलाबद्दल तर्कतः तीनच पक्ष संभवतात. एक पक्ष सुमेरिआ हीच या संस्कृतींची मूळ भूमि असून तेथून पुढें हिंदी शाखा फुटून हिंदुस्थानांत आली हा होय. दुसरा पक्ष असा कीं, हिंदुस्थान हाच देश दोनहि संस्कृतींची मूलभूमि असून तेथून सुमेरी शाखा फुटून सुमेरिआंत गेली; व तिसरा पक्ष हा कीं, दोनहि संस्कृतींचें मूलस्थान तिसराच एक प्रदेश असून तेथून या दोन्ही शाखा अनुक्रमें सुमेरिआ व हिंद यामध्यें गेल्या. याशिवाय चौथा पक्ष या प्रकरणीं होऊंच शकत नाहीं; या तीन पक्षांपैकीं कोणता तरी एक खरा असला पाहिजे. या संबंधीं मोठ्या चमत्काराची गोष्ट ही कीं, यांपैकीं दरेक उपपत्तीला पुरस्कर्ते मिळाले असून दरेकानें आपआपल्या उपपत्तीच्या समर्थनार्थ कारणें दिलीं आहेत. पहिला पक्ष साधारणतः नवीनच उपस्थित झाला आहे. कारण, सुमे-

रिआच्या संस्कृतीच्या अंगउपांगांचें संपूर्ण परीक्षण अगदीं अलीकडे झालेलें आहे. तथापि या पक्षाचा मुख्य पुरस्कार वॅडेल् यांनीं केला आहे. दुसऱ्या पक्षाला बंगाली विद्वान् श्रीयुत अविनाशचंद्र दास व महाराष्ट्रांतील रा. नानासाहेब पावगी हे आहेत; व तिसऱ्या पक्षाच्या पुरस्कारांत प्रो० मॅकेंझी हे वर म्हटल्याप्रमाणें पहिल्या दोन पक्षांच्या विरोधापुरते आहेत. परंतु ते या दोनहि संस्कृतींची मूलस्थानभूत जागा सांगूं शकत नाहींत. तें कार्य दुसऱ्या कांहीं युरोपीय पंडितांनीं व हिंदी गृहस्थांपैकीं कै० लो० टिळक यांनीं केलें आहे. तेव्हां आतां यांपैकीं दरेकाच्या म्हणण्याचा विचार करून अखेरचा निर्णय निश्चित करावयाचें तेवढें कार्य उरलें आहे.

यांपैकीं पहिल्या पक्षाचा विचार आतां आपण करूं. तो पक्ष म्हणजे हिंदी वैदिक संस्कृति ही सुमेरी संस्कृतीची शाखा आहे, हा होय. त्यासाठीं ज्या सुमरी संस्कृतीची हिंदीसंस्कृति शाखा आहे असें मानावयाचें, त्या संस्कृतीचा अंतिम काळ किमान ख्रि. पू. ४५०० असल्याचा सिद्धांत सर्वमान्य झाला आहे, तो कोणत्या पद्धतीनें हें आपल्याला प्रथम पाहिलें पाहिजे. या पूर्वीच्या लेखांतून हें वर्णिलेंच आहे कीं, सुमेरी लोकांवर बॅबिलोनीयन् या सेमेटिक वंशाच्या लोकांनीं स्वारी करून तो प्रदेश जिंकला व तेथें आपलें राज्य सुरू केलें. त्यानंतर ख्रि. पू. २३०० च्या सुमारास ईसिन् शहरीं या बॅबिलोनी वंशांतील राजांच्या व लार्सा शहरीं एलमाईट् वंशाच्या राजांच्या अमदानींत त्या काळच्या विद्वान् लोकांकरवीं महाप्रलयापासून तों त्या चालू काळपर्यंतच्या राजांच्या कारकीर्दीचे वंशक्रम व कालक्रम नक्की करण्यांत आले. त्यासाठीं प्रथमच्या कालाबद्दल दंतकथांचा व पुढील काळाबद्दल शिलालेखांचा आधार घेण्यांत आला होता. अर्थात् त्यांपैकीं दंतकथांवर संपूर्ण विश्वास ठेवणें शक्य नाहीं. शिलालेखांचा पुरावा मात्र निःसंदेह मानण्यासारखा आहे. अशा शिलालेखांपैकीं एक निप्पूर या सुमेरी राजधानीच्या शहरीं इसिन्चा चवथा राजा एन्‌मिल्-बनी याच्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षीं कोरलेला आहे. याच शिलालेखाची नक्कलहि दुसऱ्या एका ठिकाणीं उपलब्ध झाली आहे. या दोनहींवरून महाप्रलयापासून तों या शिलालेख कोरण्याच्या कालापर्यंत म्हणजे ख्रि. पू. २१९८ पर्यंत १३४ राजे झाले व त्या सर्वांची कारकीर्द मिळून २८८७६ वर्षें होतात. आणखी एका शिलालेखावरून १३९ राजे व त्यांच्या कारकीर्दींचीं वर्षें २५०६३ होतात. यांपैकीं पूर्वींचे राजे काल्पनिक आहेत. त्यांतील शेवटचे चार राजे किश् येथील सेमेटिक वंशाचे आहेत. म्हणजे यावरून ख्रि. पू. ५००० च्या पूर्वी सुमेरियांत सेमेटिक राजे होते, असें यावरून निष्पन्न होतें. या वंशावळी जरी कांहीं अंशीं काल्पनिक असल्या, तरी त्यांच्यांत सत्याचाहि अंश बराचसा आहे. यावरून पहातां निदान ख्रि. पू. ४५०० वर्षांपूर्वी व बऱ्याच अंशीं ख्रि. पू. ५००० च्या सुमारास किश् येथील सेमेटिक वंशाचे राजे राज्य करीत होते असें तज्ज्ञांनीं ठरविलें आहे, व त्यापूर्वी सुमेरी राजवंश चालू असल्यानें सुमेरीसंस्कृतीची अलीकडील मर्यादा ख्रि. पू. ५००० ही मानिली आहे.

त्यापूर्वी हजार दोन हजार वर्षेपर्यंत तरी हा वंश तेथें राज्य करीत असल्यानें एकांतिक सुमेरी संस्कृतीचा काल खि. पू सात हजार. वर्षांपासून खि. पू. पांच हजार वर्षांपर्यंतचा ठरतो. याप्रमाणें निश्चित असलेला काळनिर्णय ग्राह्य धरून त्यावर वॅडेल्‌ची उपपत्ति अशी आहे कीं, वरील काळांत सुमेरिआंत राज्य करीत असलेल्या सुमेरी वंशांतील कांहीं लोक हिंदुस्थानांत आले व प्रथम त्यांनीं सिंधुनदप्रांतांत एक वसाहत केली. त्या प्रांतास एदिन् असें नांव त्या लोकांनीं दिलें होतें. पुढें ७००।८०० वर्षेपर्यंत त्या प्रदेशांत वस्ति केल्यावर ती वसाहत नामशेष झाली. त्यानंतर हजारों वर्षांनीं म्हणजे खि. पू. ७०० च्या सुमारास आर्यांची दुसरीच एक लाट पुन्हां हिंदुस्थानांत आली. व त्या लोकांची संस्कृति तेव्हांपासून आतांपर्यंत हिंदुस्थानांत चालत आहे, असें वॅडेल्‌चें म्हणणें आहे. तो म्हणतोः—

The owners of several of the Sumerian seals bore the names of Vedic Aryan Seers and Princes—most of the others—for fortunately all the seals are engraved with their owners' names, are identified with other Vedic and Epic Aryan heroes, who are disclosed as governors of a colony of sea-faring Sumerian merchants and exploiters of the mineral wealth of the Indus and through it the Ravi territory. This colony was founded by the famous Summerian King of that Epoch, **Uruas**, the **Haryashwa** of the Vedas and Indian Epics and the **Ur-Nina** of the Assiriologists, who is generally regarded as the first great dynast of the Early Sumerians. At the same time it is made clear, that there early Aryan Sumerians who established and kept this colony on the Indus for about eight centuries did not form part of the great Aryan Immigration which is now generally called, "The Aryan Invasion of India". **This latter event, with its permanent occupation and systematic civilization of the heart of India......took place no earlier than the begining of the 7th. century B. C.**

याचा अर्थ असा कीः—" सुमेरिआंतलि उत्खननांत पुष्कळ शिक्के सांपडले आहेत. त्या दरेकावर त्या शिक्क्याच्या मालकाचें नांव दिलेलें आहे. तीं नांवें पाहतां तीं सर्व भारतीय वेदांत उल्लेखिलेल्या प्रसिद्ध ऋषींचीं व वीरपुरुषांचीं आहेत. यावरून सुमेरिआंतून हिंदुस्थानांत वसाहत करण्यासाठीं व तेथील ( हिंदुस्थानांतील ) सोनें, रुपें आदि खनिज पदार्थ काढून घेण्यासाठीं आलेल्या एका दर्यावर्दी टोळीपैकीं हे सर्व लोक असावेत. सुमेरियांतील आद्यकाळांतील पहिला शककर्ता राजा **ऊरूआस** हा होता. यालाच भारतीय वेदांत '**हर्यश्व**' व असीरिअन् वाङ्मयांत '**ऊरनिना**' असें म्हटलें आहे. त्या राजानेंच सिंधुनदप्रदेशांत पहिली वसाहत केली. ही वसाहत सुमारें आठशें वर्षें टिकून पुढें नामशेष झाली. त्या अर्थी या वसाहतींतील आर्यांचा व हिंदुस्थानांतील गंगायमुनांच्या मधील मध्य देशांतील आर्यांचा अर्थाअर्थी कांहीं

एक संबंध नाहीं. हे दुसरे आर्य हिंदुस्थानांत प्रथमतःच ख्रि. पू. सातव्या शतकांत आले, व याच लोकांत पुढें उपनिषदादि ग्रंथ झाले, व यांच्यांतच पुढें महाभारतीय युद्ध झालें." नामसादृश्यासंबंधानें वॅडेलचे खुलासे फारच विचित्र आहेत. त्याचें म्हणणें कीं "एदिन् हें सिंधुनदप्रांताचें नांव जसेंच्या तसें सुमेरी वाङ्मयांत आढळतें व मुद्गलच्या सुमेरी मुद्रेंतहि त्याचा उल्लेख आहे. **एदिन** या शब्दाचाच संस्कृत उच्चार **उद्यान** हा आहे, व सिंधुनदाच्या उत्तरेस असलेल्या हल्लींच्या **स्वात** या प्रांताला तें नांव असे. हा स्वात प्रांत म्हणजे पुराणांतील उशीनर राजाचा पुत्र शिबिराजा याची राज्यभूमि होय. प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूएनत्संग यानें सिंधुनदाच्या खोऱ्यांत **ओतिन** प्रांत असल्याचें नमूद केलें आहे, तो हाच प्रांत होय. **ह्युएनत्संग** म्हणतो, 'मुलतानपासून निघाल्यावर ईशान्येकडे ७०० ली ( १०० मैल ) गेल्यावर **पो-फा-टो** देश लागतो. येथें अशोकराजानें चार स्तूप बांधले आहेत.' ह्यूएन्त्संगनें दाखविलेल्या दिशेला व बरोबर तितक्याच अंतरावर हल्लींचें **हराप्पा** गांव आहे. ह्यूएन्त्संग पुढें म्हणतो 'हा **सितू** प्रदेश सोडल्यावर नैऋत्येकडे १५००-१६०० ली ( २१५-२३० मैल ) अंतरावर **ओतिन्** देश लागतो. त्याचा परिघ ५००० ली आहे. त्याची राजधानी **खै-ति-शि-फा-लो** ही आहे व तिचा परिघ ३० ली आहे. ही राजधानी **सितू ( सिंधु** ) नदीवर वसलेली आहे. राजा अशोकानें येथें ६ स्तूप बांधले आहेत.........येथून पुढें वायव्येकडे गेलें असतां आपण **पो-ला-सी** ( पर्शिआ ) देशाला जाऊन पोंचतो.' या एकंदर वर्णनावरून त्याच्याशीं तंतोतंत जुळणारें **माहेंजो दारो** गांव व्यक्त होतें, व **हराप्पा व माहेंजो-दारो** या दोनाहि स्थलांचा पत्ता **ओतिन्** म्हणजेच सुमेरी लखाणांत **एदिन्** म्हणून उल्लेखिलेल्या प्रांतांत लागल्यानें हा प्रांत निश्चित करतां येतो."

वरील विवेचनावरून जर वॅडेलचें म्हणणें एवढेंच असतें कीं, हिंदी व सुमेरी या उभयसंस्कृतींत नामसादृश्यादि भाषासाम्य पुष्कळ आढळून येतें, व यावरून त्या दोनहि समाजांत दळणवळण पुष्कळ होतें, तर त्याची उपपत्ति कदाचित् मान्य करितां आली असती; इतकेंच नव्हे तर त्याला पुष्टीदाखल भाषेच्या दृष्टीनें आम्हींहि त्यानें न प्रतिपादिलेले कांहीं मुद्दे सुचवूं. **एदिन, हर्यश्व, अगडु** इत्यादि विशेष नांवांखेरीज व्याकरणदृष्ट्याहि कांहीं साम्यें आम्हीं सुचवितों. **तुम्** हें हेत्वर्थक **तुबन्त** ( Infinitive of purpose ) सुमेरी व हिंदी शिक्क्यांतून आढळून येतें. 'जिवंत करण्याला' या अर्थी जिन्-तुम् असा प्रयोग उभय वाङ्मयांतील लखाणांत आढळतो. त्यांतील 'तुम्' हा प्रत्यय तर उघड उघड तुबन्त तर आहेच; पण जिन् हा शब्दहि कांहीं तरी 'जीव्' म्हणजे जगणें अथवा जिवंत होणें या शब्दाचेंच अपवाचन असण्याचाहि संभव आहे. हा शब्दप्रयोग असलेला एक शिक्का चालू लेखाचे शेवटीं दिला आहे. त्याचप्रमाणें दरेक शिक्क्याच्या शेवटीं **अस** हा प्रत्यय आहे तो सुद्धा

' अस्य ' हा संस्कृत षष्ठीचा प्रत्यय आहे. पाली भाषेंत जसें त्याचें ' अस्स ' हें रूप होतें, त्याचप्रमाणें हें रूप आहे. व ' अमक्याचा शिक्का ' अशा अर्थी तें वापरलेलें आहे. अशा प्रकारचीं इतरांहि वैयाकरणिक साम्यें सुचवितां येतील, व त्यावरून दोनहि संस्कृतींच्या विनिमयाचा स्पष्ट पुरावा मिळूं शकेल. परंतु वादाचा प्रश्न हा नव्हे. आम्हीं दाखविलेलें भाषासाम्य आढळून येत असलें, अथवा ह्युएन्संगनें ' ओतिन् ' म्हटलेला प्रांतच ' एदिन् ' म्हणून सुमेरी लखाणांत उल्लेखिला गेला असला, तरी त्यावरून सुमेरी देशांतील लोक त्या सुमारास वसाहत करण्यासाठीं त्या प्रांतांत आले, हेंच अनुमान कसें निघतें हें समजत नाहीं. स्वतंत्र भारतीय आर्यांची वस्ति तत्पूर्वीपासून त्या प्रांतांत असून त्यांचें सुमेरियाशीं दळणवळण असल्यानेंहि दोनहि वाङ्मयांत तसा उल्लेख येणें अगदीं शक्य आहे. त्यासाठीं सुमेरी संस्कृतीची वैदिक संस्कृति उपशाखा होय असें मानण्याची आवश्यकता नाहीं. प्रथमतः सुमेरिआंतून कांहीं दर्यावर्दी लोक हिंदुस्थानांत आले, या वॅडेलच्या म्हणण्याला रतिमात्र पुरावा नाहीं. वेदांत व सुमेरियांत कांहीं सारखा उच्चार भासणारीं नांवें आहेत, म्हणून वैदिक लोक हे मूळ सुमेरिआंतून आले, या निगमनाला कसें काय प्रमाण मिळतें तें ईश्वर जाणे अगर वॅडेल जाणे ! नामसादृश्यावरून कोणत्या तरी भागांतले लोक उठून दुसरीकडे गेले असें म्हणावयाचें असल्यास, हिंदुस्थानांतील लोक सुमेरिआंत गेले, असें कां म्हणूं नये ? याला वॅडेल कांहीं कारण देऊं शकत नाहीं. यानंतरचा त्याचा पुढला तर्क—अथवा प्रमेय—तर फारच विचित्र आहे ! त्याच्या मतें एकदा सिंधुप्रांतांत आलेले सुमेरी आर्य आठ शतकांनंतर नष्ट झाले व नंतर जवळ जवळ दीड दोन हजार वर्षांनीं दुसरे आर्य ख्रि. पू. ७०० च्या सुमारास हिंदुस्थानांत आले ! याला आधार पाहिला तर कांहीं नाहीं. बरें, हें आर्य कोठून आले व ते कोणत्या वंशांतील ? याला उत्तर नाहीं. याच आर्यांत पुढें उपनिषदादि ग्रंथ झाले व महाभारत युद्ध झालें, याला आधार काय ? तर कांहीं नाहीं ! वस्तुतः हिंदुस्थानांतील आर्यपरंपरेला खंड कधींहि कोठेंहि पडलेला नाहीं. शिवाय वेदांचा काल पाश्चात्यांच्या मतानें अगदीं अलीकडे म्हणजे ख्रि. पू. १२०० वर्षें ठरविणाऱ्या मॅक्स्म्युलरसाहेबापासून तों सदरचा काळ ख्रि. पू. ४५०० वर्षांचा ठरविणाऱ्या टिळक अथवा प्रो. हर्मान् याकोबीपर्यंत कोणाचेंच मत आर्य लोकांच्या अश्वप्लुतीच्या या वॅडेली उपपत्तीला अनुकूल नाहीं. तेव्हां या सव गोष्टींचा विचार करितां हिंदुस्थानांतील भारतीय आर्यसंस्कृति सुमेरीसंस्कृतीची पोटशाखा असून दोहींचें मूलस्थान सुमेरिया हाच देश होय, ही वॅडेल्ची उपपत्ति मुळींच टिकण्यासारखी नाहीं.

यानंतरचा दुसरा पक्ष याच्या अगदीं उलट मताचा आहे. वस्तुतः या पक्षाच्या पुरस्कर्त्यांनीं सुमेरी संस्कृतीचा विचारच केलेला नाहीं. तथापि हिंदी-सुमेरी संस्कृति एकच आहे, असें आतां सिद्ध झाल्यानें वैदिक संस्कृतीच्या मूलस्थानाबद्दल त्यांनीं केलेलें विवेचन अर्थातच हिंदी-सुमेरी संस्कृतिविषयक समजून त्याचें विवेचन केलें

आहे. त्या मताप्रमाणें हिंदुस्थानदेशच, वैदिक संस्कृतीची मूलभूमि होय. त्याच्या दोन पुरस्कर्त्यांपैकीं दोघांचा निष्कर्ष एकच असला, तरी दोघांचीं कारणें निराळीं आहेत. सदरपक्षाचे एक पुरस्कर्ते बाबू अविनाशचंद्र दास यांनीं आपली उपपत्ति साकल्यानें आपल्या Rig-vedic India, या पुस्तकांत मांडिली आहे. तिचा मुख्य आधार भौगोलिक आहे. थोडक्यांत त्यांचें म्हणणें असें आहे कीं, वेदांत जी भौगोलिक परिस्थिति वर्णन केलेली आहे, तशी जरी आज आपल्याला हिंदुस्थानांत दिसत नसली, तरी ती वेदकाळीं तशी होती. उदाहरणार्थ, वेदांत पंचनदप्रांतांत सरस्वती नदी वर्णिली आहे व ती थेट समुद्रास जाऊन मिळते असेंहि वर्णन आहे. वस्तुतः आज पंजाबांत सरस्वती म्हणून कोणतीच नांव घेण्यासारखी नदी नाहीं. शिवाय वेदांतील सरस्वती नदीचा गमनमार्ग पाहिला असतां, ती हल्लींच्या राजपुतान्यांत आली पाहिजे. आतां हल्लीं राजपुतान्याच्या जागीं मुळीं समुद्रच नाहीं! तेव्हां प्रो. दास म्हणतात भूगर्भशास्त्रदृष्ट्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर हजारों वर्षांनीं फरक झाले आहेत; व हल्लीं जेथें राजपुताना आहे, तेथें पूर्वी समुद्र असला पाहिजे, व सरस्वती नदीहि तेथें येऊन समुद्रास मिळत असली पाहिजे. या समुद्रामुळें पंजाब एका बाजूला व दक्षिण हिंदुस्थान दुसऱ्या बाजूला असे हिंदुस्थानचे दोन तुकडे त्या काळीं पडलेले असावे. पण पुढें हिमालयांतून उगम पावणाऱ्या नद्यांमधून वाहत येणाऱ्या मातीनें हलकें हलकें हा समुद्र भरून जाऊन तेथें जमीन झाली असावी. अर्थात् इतकें रूपांतर होण्यास कालावधीहि फार लागणार व तो दासबाबूंच्या मतें ५०००० ते ३०००० पर्यंत होय. अर्थात् ज्या वेदांत सरस्वती नदी समुद्राला मिळण्याचा उल्लेख आहे, त्या वेदांचा काळहि इतका मागें जातो. तेव्हां दासबाबूंच्या मतें वेदांचा काळ निदान ख्रि. पू. ३०००० वर्षें होय व अर्थातच वेदांची आर्यभूमि हिंदुस्थानांतील पंजाबप्रांत हीच होय.

भूगर्भशास्त्राच्या काल्पनिक अनुमानापेक्षा या उपपत्तींत अधिक बळवान् पुरावा नसल्यानें, हिला विशेष महत्त्व प्राप्त होऊं शकत नाहीं. शिवाय, ज्योतिषात्मक पुरावा, सुमेरी इतिहासाचा पुरावा, वगैरे सर्व या अनुमानाच्या विरुद्धच असल्यानें एक ' आश्चर्यात्मक प्रमेय ' या पलीकडे दासबाबूंच्या म्हणण्याला अधिक महत्त्व प्राप्त होत नाहीं.

वेदांचें मूलस्थान हिंदच मानणारे दुसरे गृहस्थ म्हणजे रा. नानासाहेब पावगी हे होत. यांचें मत थोडक्यांत येणेंप्रमाणें आहे:—भूगर्भशास्त्राप्रमाणें उत्तरध्रुवाजवळील प्रदेश सुमारें ख्रि. पू. ८००० वर्षांच्या पूर्वी वस्तियोग्य होता. त्यानंतर त्या काळाच्या सुमारास तेथें एक हिमप्रलय होऊन तो प्रदेश वस्तीला अयोग्य झाला, हें मत रा. पावगी यांना ग्राह्य आहे. पण ते म्हणतात कीं " या हिमप्रलयाचा वेदांतील आद्य जो ऋग्वेद, त्यांत कोठेंहि उल्लेख नाहीं; परंतु तो उल्लेख अथर्ववेदांत प्रत्यक्ष केला आहे; यावरून ऋग्वेदांतील सर्व ऋचा प्रलयपूर्वकालांत रचिल्या गेल्या, याविषयीं

शंका रहात नाहीं. अथर्ववेदांत प्रलयकालाचा स्पष्ट उल्लेख आहे, व त्या वेळीं मनूला तारणारी नौका, हिमालयाच्या शिखरावर सोमकुष्ट वनस्पतीच्या उद्गमस्थानाजवळ लागली, असेंहि वर्णन तेथें आहे. ती ऋचा येणेंप्रमाणें:—

**हिरण्ययी नौरचरद्धिरण्यबंधना दिवि ।**
**तत्रामृतस्यचक्षणं ततः कुष्टोऽजायत ॥**
**यत्र नावप्रभ्रंशनं यत्र हिमवतः शिरः ।**
**तत्रामृतस्यचक्षणं ततः कुष्टोऽजायत ॥**

( अथर्व वेद १९-३९-८ ).

तेव्हां रा. पावगींच्या मतें ऋग्वेदांत जलप्रलयाचें वर्णन नाहीं, तें अथर्ववेदांत आहे; अथर्व वेदाहून ऋग्वेद प्राचीन आहे, त्या अर्थी ऋग्वेदाचा उगम जलप्रलयकाल-पूर्वी म्हणजे ख्रि. पू ८००० वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतच झाला. त्यानंतर वैदिक लोक हिंदुस्थानांतून उत्तर ध्रुवाजवळ गेले! तेथें जलप्रलय झाला. ( जलप्रलय उत्तर ध्रुवा-जवळ झाला, तो दुसरीकडे कोठें झाला नाहीं, हें रा. पावगी यांना मान्य आहे. ) जलप्रलयामुळें आर्यांनीं ध्रुवप्रदेश सोडला व ते परत हिंदुस्थानांत आले. तेथें अथर्व-वेदाचा उद्गम झाला. अर्थात् या अथर्ववेदापूर्वी ध्रुवप्रदेशीं झालेल्या जलप्रल-याचें वर्णन त्यांत आलें आहे, हें उघड आहे. येणेंप्रमाणें रा. पावगी यांचें मत आहे.

परंतु या रा. पावगींच्या विवेचनांत दोन गोष्टी अगदीं निराधार मानल्या गेल्या आहेत. हिंदुस्थान कोठें व ध्रुवप्रदेश कोठें! तेव्हां हिंदुस्थानांतून वैदिक लोक एकदम उठून ध्रुवप्रदेशीं कां गेले? त्या काळीं पंजाबची हवा हल्लींहून थंड आहे अशी मानली, तरी तो प्रांत कसें झालें तरी समशीतोष्ण कटिबंधांतला आहे. तेव्हां तेथल्या हवेपेक्षां ध्रुवप्रदेशी हवा—ती हल्लींपेक्षां कितीहि उष्ण व वस्तियोग्य मानली तरी—कितीतरी पट अधिक थंड असली पाहिजे. तेव्हां आर्यलोक येथून तेथें कां गेले? शिवाय ते तेथें हिंदुस्थानांतून गेले यालाहि कांहीं आधार रा. पावगी देऊं शकत नाहींत. उलट यावरून ते केव्हां तरी ध्रुवप्रदेशीं होते ही गोष्ट जर रा. पावगी स्वतः कबूल करितात, तर मग आर्यलोक हिंदुस्थानांतून ऋग्वेदकालानंतर उत्तरध्रुवप्रदेशीं गेले असा द्राविडी प्राणायाम मानण्यापेक्षां ते प्रथमपासूनच तेथें होते, व जलप्रलया-नंतर तो प्रदेश वस्तीला अयोग्य झाल्यामुळें हिंदुस्थानांत आले, हेंच म्हणणें अधिक सयुक्तिक होणार नाहीं काय? याला रा. पावगींच्या मतें अडचण काय ती एवढीच कीं, ऋग्वेदांत जलप्रलयाचा स्पष्ट उल्लेख नाहीं. परंतु तो नसला तरी ऋग्वेदांतील एकंदर ऋतुमान, हवामान इत्यादि अंतर्गत पुराव्यांवरून जर उत्तर ध्रुवप्रदेशीय परिस्थितीचाच मेळ पडूं शकला, तर मग प्रत्यक्ष उल्लेखाचा अभाव हा कांहीं फारसें बाधक प्रमाण होऊं शकत नाहीं. तेव्हां एकंदरीनें विचार करितां रा. पावगी यांची ही उपपत्ति कसोटीवर टिकण्यासारखी नाहीं. अर्थात् हिंदी संस्कृतीचा सुमेरी संस्कृतीशीं अस-

लेल्या व नवीनच ज्ञात झालेल्या संबंधाच्या दृष्टीनें प्रो. अविनाशचंद्र दास अगर रा. पावगी या दोघांनींहि आपली उपपत्ति मांडलेली नसल्यानें, या उभयसंस्कृतींचें आद्यस्थान कोणतें, हा प्रश्न त्यांच्यापुढें नव्हताच. फक्त वैदिक आर्यांचें मूलस्थान कोणतें, इतक्याच प्रश्नाचा विचार करून त्याचें उत्तर हिंदुस्थान असें या दोघांनीं दिलें आहे. परंतु तें वरील विवेचनावरून टिकण्यासारखें नाहीं, असें आतांपर्यंत दाखविलें आहे.

याप्रमाणें पहिल्या दोनहि पक्षांची वासलात लावल्यावर आतां फक्त तिसरा पक्ष उरला. तो हा कीं, सुमेरी व हिंदी या दोनहि संस्कृतींचें सामान्य मूल व स्थान तिसरेंच एक आहे, व तेथून या दोनहि शाखा दोन निरनिराळ्या देशांत गेल्या. या पक्षाचा मोघम पुरस्कार प्रो. मॅकेंझी सारख्या पंडितांनीं केला आहे. परंतु हा उभयसामान्य देश कोठें असावा याबद्दलची चिकित्सा त्यांनीं केली नाहीं. दुसऱ्या अनेक पंडितांनीं या संबंधीं चर्चा केली आहे. त्याबद्दलचें त्रोटक विवेचन सारांशरूपानें 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'च्या 'बुद्धपूर्व जगत्' या भागांत केलें आहे, तें आटोपशीर असल्यानें येथें साभार उद्धृत करीत आहों, तें येणेंप्रमाणें:—

" आर्यन् वंश—ज्याला काकेशिअन वंश असेंहि म्हणतात—त्या मानववंशापासून निघालेल्या अनेक शाखा आज युरोप व आशियांत उतरलेल्या आहेत, असें भाषादिशास्त्रांच्या तौलनिक अभ्यासानें सिद्ध झाल्यावर हा मूळ आर्यवंश शाखा फुटण्यापूर्वी कोठें रहात होता, या प्रश्नासंबंधानें विविध मतें पुढें आलीं आहेत. त्यांत कांहीं विद्वान् मध्ययुरोप हें मूलगृह मानतात, तर कांहीं मध्य आशिया हें मानतात. "

" या संबंधानें प्रथम अडॉल्फ् पिक्टेट यानें १८५९ मध्यें आपलें मत पुढें मांडलें. आशियांतील बॅक्ट्रिया नामक प्रदेशांत मूळ आर्य लोक रहात होते, असं त्याचें म्हणणें आहे. मूलगृहाचा निश्चय करतांना ऋतुमानाचा पुरावा आधाराला घेण्यांत आला. इंडो-युरोपियनांना हिंवाळा, वसंतऋतु व उन्हाळा, हे फक्त तीन ऋतु माहीत होते. आपण जों जों उत्तरेकडे जातों, तों तों तेथें फक्त उन्हाळा व हिंवाळा असे दोनच ऋतु असतात. तर उलट पक्षीं दक्षिणेकडे तीन, चार किंवा पांच ऋतूहि होतात. तेव्हां तीन ऋतू ज्या अक्षांशावर असतात, अशा बॅक्ट्रिया देशांत ऑक्सस नदीनजीक आर्यांचें मूलगृह असावें, असें पिक्टेटचें म्हणणें आहे. या मताला पुष्टि म्हणून बॅक्ट्रियांत आढळणारे खनिज पदार्थ, वनस्पती व प्राणी, इंडो-युरोपियनांना माहीत होते, असें त्यानें सिद्ध केलें. "

" याच्या अगदीं उलट इंडो-युरोपीय लोकांचें मूलगृह यूरोपमध्यें होतें, असें लॅथम्, बेनफी, व्हिटने वगैरे विद्वानांनीं मत दिलें. लॅथम्चें म्हणणें असें कीं, संस्कृत भाषेचा लिथुएनियन्, स्लॅव्होनिक, लॅटिन्, ग्रीक व जर्मन या भाषांशीं फार संबंध आहे. म्हणून लिथो स्लॅव्होनिक भाषांचा देश जो मध्ययुरोप, तेथून संस्कृतभाषा बोलणारे लोक हिंदुस्थानाकडे आले असणें अधिक संभवनीय आहे. गायजर यानें तर

जर्मनी—विशेषतः मध्य व पश्चिम जर्मनी—हेंच इंडो–युरोपियन लोकांचें मूलगृह होय, असें प्रतिपादन केलें. व त्यामुळें या मूळ आर्यवंशाला इंडो–जर्मानिक असें म्हणण्याचा प्रघात पडला. गायजरनें आपला पुरावा मुख्यतः तीन झाडांच्या नांवावर उभारला आहे. **बर्च ( सं० भूर्ज ) बीच् व ओक** हे तीन वृक्ष इंडो-युरोपिअनांस माहीत होते, व या तीन झाडांपैकीं बीच् झाडाचें मूलस्थान प्रशिअम् बाल्टिक प्रदेशांच्या पश्चिम भागांत असल्यामुळें हा प्रदेशच इंडो-जर्मानिक् लोकांचें मूलगृह होय. वयूनो नांवाच्या एका पंडितानें मध्ययूरोपाविषयक मतालाच पुष्टि दिली. यांप्रमाणें मध्य आशियावादी व मध्य यूरोपवादी अशा मूलगृहाविषयक दोन पक्षांमध्यें बरींच वर्षें झगडा चालू होता. या वादाचा निकाल कांहीं काल **सिंह** या प्राण्यावर अवलंबून राहिला होता. तो असा कीं, मूलगृहाविषयक संस्कृतींतलि लोकांना सिंह हा प्राणी माहीत होता, हें भाषाविषयक पुराव्यानें सिद्ध झालें. पण मध्य यूरोपांत सिंह तर अलीकडे आढळत नाहीं! तेव्हां प्राचीन काळीं तेथें सिंह हा प्राणी रहात असे, हें सिद्ध होईपर्यंत मध्य युरोपवाद लंगडा पडला. उलट मध्यआशियामत वादाला बळकटी घेण्यास असें एक सबळ कारण होमेल् यांनीं पुढें मांडलें कीं, प्राचीन सेमेटिक लोकांचा व इंडो-युरोपिअनांचा परस्पर दळणवळण संबंध होता, असें भाषाविषयक साम्यामुळें सिद्ध होत असल्यामुळें व प्राचीन काळीं सेमेटिक लोक पश्चिम आशियांत मेसापोटेमिया प्रांतांत रहात असल्यामुळें इंडो–युरोपीय लोक तेथें शेजारींच मध्य आशियांत रहात होते, हें अधिक ग्राह्य मानणें जरूर आहे. यानंतर कोणी दक्षिण-युरोप, कोणी पश्चिम युरोपीय रशिया, तर कोणी स्कँडिनेव्हिया याप्रमाणें युरोपीय मूल गृह-मतवाले विद्वान् निघाले. मध्य आशिया मतवादाच्या बाजूच्या विद्वानांपैकीं एक सुप्रसिद्ध संस्कृतज्ञ विद्वान् म्हटले म्हणजे आपल्या विशेष परिचयाचे मॅक्सम्युलर साहेब हे होत. ”

“ याप्रमाणें मूलगृहविषयक वाद मध्यआशिया व मध्ययुरोप यांच्यांमध्यें हेलकावे खात बरींच वर्षें राहिला. त्यांत विशेष गोष्ट ही कीं, मध्यआशियाविषयक मताचा पुरस्कार करणारे सर्व विद्वान् युरोपिअनच होते. त्यामुळें स्वखंडाभिमानाचा आक्षेप घऊन त्यांच्या प्रामाणिकपणावर शिंतोडे उडविणें शक्य नव्हतें. या अत्यंत महत्त्वाच्या व बिकट प्रश्नावर युरोपीय विद्वानांत माजलेल्या रणकंदनांत कोणीहि भारतीयच काय, पण आशियाटिक विद्वान्हि, सन १८९० पर्यंत उतरला नव्हता. प्रश्न मोठा गहन असून, तौलनिक भाषाशास्त्र, गाथाशास्त्र, मानव–वंश–शास्त्र, वगैरे अनेक शास्त्रें जाणणाऱ्या अष्टपैलू विद्वानांखेरीज एकांगी विद्वत्ता असलेल्या इतरेजनांना या वादांत लुडबुड करणें शक्यच नव्हतें. अशा अनेक बाजूंनीं अवघड होऊन बसलेल्या या वादांत सन १८९० च्या सुमारास लो. टिळक यांनीं उडी घातली, व त्यांनीं प्रथम मूलगृहाच्या कालविषयक प्रश्नासंबंधानें ‘ ओरायन् ’ नामक ग्रंथ १८९३ सालीं व नंतर मूलगृहाच्या स्थलविषयक प्रश्नासंबंधानें ‘ आर्टिक होम इन् दि वेदाज् ’ हा दुसरा ग्रंथ १९०३ सालीं प्रसिद्ध केला. याप्रमाणें या वादाचा सारांश आहे. ”

तथापि ' आर्टिक् होम् इन् दि वेदाज् ' व ' ओरायन ' या दोनहि ग्रंथांत टिळकांनीं भारतीय आर्यांच्या सुमेरी आर्यांशीं आढळून येणाऱ्या संबंधाविषयीं विशेष उल्लेख केलेला नाहीं. परंतु त्यानंतर त्यांनीं सन १९०४ सालीं बॉंबे प्रेसिडेन्सी ऍसोसिएशन् या संस्थेच्या जागेंत ' ग्रॅज्युएट्स् एसोशिअशन् ' च्या विद्यमानें ' खाल्डियन् व हिंदी वेद ' या विषयावर एक व्याख्यान दिलें. तें पुढें भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनसंस्थेच्या भांडारकर-स्मारक-ग्रंथांत सन १९१७ सालीं—व त्यानंतर ' Vedic chronology and Vedanga Gyotish ' या स्वतंत्र पुस्तकांत सन १९२५ सालीं प्रसिद्ध झालें आहे. त्यांत टिळकांनीं, **तैमात, आलिगी, विलिगी उरूगुला, यव्हे. अप्सु, मना** इतक्या वेदांत आढळणाऱ्या शब्दांचा खाल्डियन् म्हणजेच सुमेरी वाङ्मयांत पत्ता लागतो असें दाखवून, या दोनहि वाङ्मयांचा परस्पर संबंध असावा, असें अनुमान काढलें. परंतु या लेखमालेच्या मागील अंकांत आम्हीं म्हटल्याप्रमाणें, त्यांना समग्र सुमेरी वाङ्मय: उपलब्ध न झाल्यामुळें असो, अगर तें तसें झालें असलें तरी, त्यांच्या अनेक इतर उद्योगांमुळें त्यांना त्याचें संपूर्ण परीक्षण करण्यास सवड न मिळाल्यानें असो, पण सुमेरी व हिंदी वेदांतील आम्ही या लेखमालेंत दाखविलेलीं अत्यंत महत्त्वाचीं अशीं समानस्थलें दाखवून त्यांनीं त्यांचें विवेचन केलें नाहीं. तो प्रयत्न साकल्यानें या लेखमालेंत आम्ही केला आहे, व त्या प्रयत्नाअंतीं लो. टिळकांनीं काढलेल्या निष्कर्षाला विलक्षण पुष्टि मिळत असल्याचें दाखविलें आहे. बाकाचीं महत्त्वाचीं साम्यें तर स्वतंत्र रीतीनें त्यांच्या सिद्धांताला पोषक होत आहेतच, परंतु तीं बाजूला ठेऊन टिळकांनीं आपल्या ग्रंथांत जीं उत्तरध्रुवप्रदेशीं अनुभविल्या जाणाऱ्या ऋतुमानाबद्दलचीं व इंद्रवृत्रयुद्धाच्या खऱ्या अर्थाबद्दलचीं जीं प्रमाणें दिलीं आहेत, तेवढींच जरी विचारांत घेतलीं, तरी टिळकांनीं अकल्पित अशा रीतीनें, सुमेरी वाङ्मयांतील उल्लेख भारतीय वेदांतील प्रमाणांचें आश्चर्यकारक रीतीनें समर्थन करितात असें दाखविलें आहे. वैदिक वाङ्मयांतील सर्व प्रमाणांचा निर्देश लो० टिळकांनीं आपल्या 'Arctic Home in the Vedas' या ग्रंथांत केला आहे.तेथें त्यांनीं जीं अनेक प्रमाणें दिलीं आहेत, त्या सर्वांचें विवेचन करण्याचें प्रयोजन नाहीं. परंतु त्यांच्या मतें इंद्रवृत्रयुद्धकथेच्या खऱ्या अर्थोपलब्धीनें मूलगृहनिश्चयास फार महत्त्वाची मदत होत आहे. ते म्हणतात कीं, या युद्धाचें भारतीय वेदांत चार महत्त्वाचे परिणाम झालेले वर्णिले आहेत, ते असेः—( १ ) वृत्राच्या अटकेंत असलेल्या गाईंची मुक्तता, ( २ ) त्याच्याच बंदींत पडलेल्या जलप्रवाहांची मुक्तता, ( ३ ) उषेचा उदय, व ( ४ ) सूर्याची प्राप्ति. अर्थात् ज्या उपपत्तीनें हे चारहि परिणाम झाल्याचा समाधानकारक खुलासा मिळेल, ती उपपत्ति अधिक ग्राह्य होय. टिळकांच्या मतें ती उपपत्ति कोणती आहे हें समजण्यापूर्वी उत्तरध्रुवाजवळील ऋतुमानात्मक परिस्थिति कशी आहे हें पाहिलें पाहिजे.

उत्तरध्रुवप्रदेशीं उभे राहिलेल्या मनुष्यास आकाशस्थ ज्योतींचें भ्रमण एका

विशेष प्रकारचें दिसेल. तदितर ठिकाणीं सर्व ग्रह व तारका पूर्वेकडे उगवून आपल्या डोक्यावरून पश्चिमकडे जातात व त्यानंतर रात्रीं आपल्या पायाखालून बाकीचा वर्तु-लार्ध फिरून पुन्हां दुसऱ्या दिवशीं पूर्वेकडे उगवतात, असें दिसतें. परंतु खुद्द ध्रुवप्रदेशीं तसें होत नसून, आपल्या डोक्यावर जर आपण एखादी छत्री आपल्या शरीराशीं समांतर अशी धरून वाटोळी फिरविली तर ती ज्याप्रमाणें फिरते, त्याप्रमाणें ग्रह व तारका फिरलेल्या दिसतात. आपण अशी कल्पना करूं कीं आपली छत्री बारा काड्यांची




वाचनः—गु–दमु–गु–ति–मर्–दक्ष ( तक्ष ) गु.

अर्थः—दक्षपुत्र दमु ( याची मुद्रा. )

आहे, तर त्यांपैकीं दरेक काडी एकेक महिना दर्शविते. या बाराहि काड्या एकाच पातळींत फिरतील, याचा अर्थ असा कीं बाराहि महिने जे ग्रह व तारका क्षितिजावरच असतील त्या तशाच वर्षभर राहून वाटोळ्या फिरत राहतील. आतां ही छत्री आपल्या शरीराशीं अगदीं समांतर न धरितां तिचा दांडा जर किंचित् वाकडा धरला, तर सरळ धरली असतां ती छत्री ज्या पातळींत फिरेल तिच्याशीं कांहीं अंशांचा कोन करणाऱ्या पातळींत तिच्या काड्या फिरतील. म्हणजे त्यांपैकीं कांहीं क्षितिजाखालीं गेलेल्या दिसतील. ज्या मानानें या स्थलांचें खुद्द ध्रुवापासूनचें अंतर अधिक, त्या मानानें छत्रीच्या अधिक काड्या मूळच्या पातळीच्या खालीं जातील, व त्याचाच अर्थ हा कीं, तितके अधिक महिने सूर्यादि ज्योती क्षितिजाखालीं राहतील. आर्यलोकांची वस्ति ध्रुवाच्या आसपासच्या प्रदेशांत असल्यानें तेथें तीन चार महिने सूर्यादि ज्योति क्षितिजाखालीं अस्तंगत असत. त्या वेळीं त्या मुळींच क्षितिजावर दिसत नसल्यानें त्या हरवल्याची कल्पना तेथल्या लोकांनीं करणें स्वाभाविक आहे व अर्थात् जितके दिवस सूर्य दिसत नाहीं, तितके दिवसहि पंचांगांतून हरवल्यासारखे त्यांना वाटत. या दिवसांनाच त्यांनीं गाईंची उपमा दिली, व हिंवाळा संपून वसंत-ऋतु प्राप्त झाल्यावर जेव्हां सूर्य पुन्हां क्षितिजावर येई, तेव्हां, त्या गाई इंद्रानें वृत्रवधः

केल्यामुळें, त्याच्या बंदिवासांतून सुटून आपल्याला परत मिळाल्या अशा अर्थाचें वर्णन त्यांनीं ऋग्वेदांत केलें आहे.

या विवेचनांतील गाई—अथवा दिवस—ह्या हिंवाळ्यांतच चोरल्या जातात, असें जें वेदांत वर्णन आहे, तें ध्रुवाभोंवतालच्या प्रदेशाला जुळण्यासारखें आहे. वेदांत या गाई शंभर होत्या असें वर्णिलें आहे. याचाच अर्थ सूर्य हा त्या प्रदेशांत शंभर दिवस दिसत नसे, हा होय. अखेर इंद्रानें वृत्राशीं शरदृतूपासूनच्या ४० व्या दिवशीं ( चत्वारिंश्यां शरदि ) युद्ध सुरू करून त्या गाई सोडविल्या, असा ऋग्वेदांत स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां या दिवशीं सूर्य क्षितिजाखालीं गेला असें निष्पन्न होतें. हें ऋतुमान अर्थात्च सायनगणनेनें खरें असणार व तसें तें टिळकांना मान्यच होतें. किंबहुना वेदकालनिर्णयाच्या त्यांच्या सिद्धान्ताचा मूळ पायाच सायनगणनेवर अवलंबून आहे. अर्थात् हीच गणितपद्धति शास्त्र, परंपरा व पूर्वेतिहास यांनीं सिद्ध होते, व त्या पद्धतीनें शरदृतूच्या ४० व्या दिवशीं इंद्र-वृत्रयुद्धाला सुरुवात झाली.

या गाई सोडवण्याबरोबरच सूर्याचा उदय झाल्याचाहि परिणाम वृत्रहननानें झाल्याचें ऋग्वेदांत वर्णिलें आहे. वरील उपपत्तीनें हें अगदीं सहज समजण्यासारखें आहे. किंबहुना सूर्य उगवल्यामुळेंच दिवस मोजतां येऊं लागले; म्हणजेच सूर्योदयामुळेंच गाई उपलब्ध झाल्या हें उघड आहे. वृत्रहननापासून सूर्योदय होणाऱ्या या परिणामाचें वर्णन वेदांत स्पष्ट ऋचांनीं केलें आहे, व आम्हीहि तें या मालेच्या दुसऱ्या लेखांकांतील इंद्रवृत्रकथेच्या प्रसंगीं सुमेरी कथेच्या साम्यानें वर्णिलें आहे, म्हणून त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.

तथापि, हिंवाळ्यांत सूर्य नाहींसा होऊन तो वसंतारंभीं उदय पावण्याच्या या कथेवर वेदांत दुसरें एक रूपक बसविलें आहे, त्याचा येथें खास उल्लेख करावयाचा आहे. कारण–अत्यंत आश्चर्याची गोष्ट कीं–त्याच रूपकाची कथा हुबेहूब तशीच सुमेरीवाङ्मयांत वर्णिली आहे. त्यासाठीं प्रथमतः आपण वैदिक कथा काय आहे तें पाहूं. वेदांत **अश्विनौ** म्हणून जे दोन देव वर्णन केले आहेत, त्यांचे पराक्रम वर्णन करतांना अशी कथा सांगितली आहे कीं, एकदां रेभ नांवाचा एक दैदीप्यमान ऋषि कांहीं दिवस व रात्रीं समुद्रांत बुडून गेला, तेव्हां त्याच्या माणसांनीं शोक केला व **अश्विनौ** देवांची प्रार्थना केली, तेव्हां त्यांनीं रेभाला समुद्रांतून बाहेर काढिलें.

‘ अप्स्वंतः विप्रुतं रेभमुदनि प्रवृक्तम् ।
उन्निन्यथुः सोममिव स्रुवेण ॥

( ऋ. वे. १–११६–२४ )

त्याचप्रमाणें भृज्यु हा ऋषी,

‘ अवविद्धं तौग्र्यमप्स्वंतः अनारंबणे तमसि प्रविद्धं ।
उदाश्विभ्या मिषिताः पारयंति ॥

( ऋ. वे. १८२–६ )

अनारंबण ( निरालंब ) व तमसि ( अंधकारमय ) अशा जलांत बुडला असतां त्याच अश्विनौंनीं त्याला बाहेर काढलें.

त्याचप्रमाणें खुद्द सूर्य हाहि अंधकारांत बुडल्याचा उल्लेख ऋग्वेदांत केला आहेः-

**सूर्यं विवेद् तमसि क्षियन्तम् ।**

**सूर्यं न दस्त्रा तमसि क्षियन्तम् ॥**

अशा अर्थाचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें सूर्याचें एक चक्र इंद्रानें हरण केलें असें वर्णन करून, सूर्य हेंच तें सूर्याचें एक चक्र, असें सांगितलें आहे; व तें चक्र पुन्हां मिळाल्यावर सर्वत्र प्रकाश पडल्याचा उल्लेख,

**मुषाय सूर्यं कवये चक्रमीशान ओजसा ।**

ऋ. वे. १-१७५-४

इत्यादि सूक्तांत केला आहे त्याचप्रमाणें दुसऱ्या एका ठिकाणीं सूर्यस्वरूपी विष्णूला एक प्रकारचा असाध्य असा त्वचारोग झाल्यामुळें त्याला '**शिपिविष्ट**' म्हणजे कुष्टरोगी असें म्हटलें आहे व पुढें तो त्याचा रोग हिमकालानंतर बरा झाल्यावर पुन्हां तेजःपुंज अशा त्वचेचा होतो, असें ऋग्वेदाच्या सातव्या मंडलाच्या १०० व्या सूक्तांत म्हटलें आहे.

या सर्व सूक्तांतून समुद्रांत बुडलेल्या अगर त्वचारोग झाल्यामुळें विवर्ण झालेल्या व्यक्तींचें केलेलें वर्णन म्हणजे वस्तुतः हिमकालीं ध्रुवप्रदेशीं अदृश्य असलेल्या अथवा




वाचनः-कण्व-गु-शि-कि-अस्.

अर्थः-शिकी येथील कण्व ( याची मुद्रा ).

त्यापैकींच्या थोड्या काळपर्यंत निस्तेज झालेल्या सूर्याचें वर्णन आहे. अर्थात् वसंतागमीं हा सूर्य उदय पावला म्हणजे त्याला समुद्रांतून वर काढलें अथवा त्याचा त्वचारोग जाऊन तो कांतिमान झाला, असाच या कथांचा अर्थ आहे, व हा चमत्कार फक्त ध्रुवप्रदेशींच संभवतो, अशी टिळकांची उपपत्ति आहे.

हाच चमत्कार सुमेरी वाङ्मयांतहि रूपकानें अज्ञाचा तसा वर्णिला आहे हें किती विलक्षण आहे ! सुमेरी वाङ्मयांत वसंतऋतूंतील सूर्याला 'तम्मूझ' असें नांव असे. हिंवाळ्यांत हा तम्मूझ मारला जातो व पाताळांत तो नाहींसा होतो व प्रतिवर्षी वसंतागमीं इश्तर देवी त्याच्या शोधार्थ पाताळांत जाते व त्याला वर घेऊन येते, असें वर्णन आहे. तम्मूझ हिंवाळ्याच्या आरंभीं मेल्यावर इश्तर शोक करितेः—

Oh Tammuz, the spouse of thy youth,
Thou didst lay affliction every year.

( हे तम्मुझ्, तुझ्या यौवनावस्थेंतील या तुझ्या भार्येवर प्रतिवर्षी तूं संकट आणतोस )

Oh hero, my lord, ah me! I will say;
Food I eat not, water I drink not,
Because of the exalted one of the nether-world.

( हे वीरा, हे स्वामी, हायरे! माझ्यावर पाताळाधिपतीनें आणलेल्या या संकटामुळें दुःखानें मी अन्न अथवा पाणी कांहीं ग्रहण करणार नाहीं. )

He has gone, he has gone, to the bosom of the earth,
And the dead are numerous in the land,
Men are filled with sorrows, **they stagger by day in gloom**
**In the month of thy year which brings not peace, thou hast gone.**

( हाय, हाय ! तो ( तम्मूझ ) गेला ! तो पृथ्वीच्या उदरांत ( पाताळांत ) गेला ! त्या प्रदेशांत असंख्य मृत लोक आहेत. पण इकडे पृथ्वीवर त्याच्या जाण्यानें सर्व लोक दुःखांत मग्न झाले आहेत. भर दिवसां ते अंधेरांत चांचपडत आहेत. हे तम्मूझ, प्रतिवर्षी ज्या महिन्यांत लोकांना सुख मिळत नाहीं, त्याच महिन्यांत तूं गेलास. )

**The wailing is for the h[illegible]bs; the first lament is [illegible]hey are not produced,**
**The wailing is for the gr[illegible]n, ears are not produced.**

( दुःखाचें कारण हें कीं, त्या काळीं वनस्पती उत्पन्न होत नाहींत, धान्यासाठीं दुःख होतें, कारण धान्याचीं कणसें उत्पन्न होत नाहींत, )

तेव्हां,

How long shall the springing of Verdure be restrained? How long shall the putting forth of leaves be held back?

( हिरवेंगार असें कोंवळें गवत उगवण्याला अजून किती अवधि लागणार ? वृक्षांना नवपल्लव येण्याचें अजून किती लांबणीवर पडणार ? )

परंतु अशा रीतीनें शोकभूमि झालेला तम्मूझ् थोड्याच दिवसांत पुन्हां जिवंत झाला ! कवि म्हणतोः—

( Apparently, it was believed that Tammuz returned and grew into full manhood in a comparitively brief period ! A couplet from the Tammuz hymn says tersely:—

In his infancy in a sunken boat he lay,
In his manhood in the Submerged grain he lay.

( बालपणीं पातालांतल्या होडींत बुडून गेलेला तम्मूझ्, यौवनांत सर्वत्र धान्य-समृद्धि झाल्यामुळें धान्याच्या आगरांत बसला ! )

इतके उतारे पुरे आहेत. यांवरून प्रतिवर्षी हिमकाळीं सूर्य हा पाताळांत बुडून गेल्याप्रमाणें ( वैदिक कथेंतील " अप्स्वंतः अनारंबणे तमसि प्रविद्धं । ) नाहींसा होत असे. **त्या वेळीं लोक दिवसाढवळ्या अंधारांत चांचपडत** व दुःखमग्न होत, धान्य वनस्पति उगवत नसत; व मग वसंतारंभीं तो सूर्य पुन्हां क्षितिजावर येतो. त्या वेळीं सर्व सृष्टीला नवचैतन्य येतें, असा या तम्मूझच्या कथेचा अर्थ आहे. याच कथेवरून पुढें ग्रीक वाङ्मयांत ' डिमीटर व पर्सिफोनी ' ची कथा व स्कँडेनेव्हि-अन् वाङ्मयांतील ' डायरमीड ' ची कथा यांचा उद्भव झाला आहे. पहिल्या कथेंत भूमिदेवता **डिमीटर** हिची अत्यंत सुंदर कन्या **पर्सिफोनी उर्फ प्रॉसर्पाइन** हिला पाताळाच्या देवानें पाताळांत उचलून नेलें. तिचा पत्ता डिमीटरला लागेना तेव्हां ती ( डिमीटर ) फार दुःखी झाली. त्यामुळें तो भूमिभाग तिच्या शापानें शुष्क होऊन गेला, सर्व झाडें मरून गेलीं व तेथील सर्व जीवहि मरूं लागले. पुढें तिला आपली मुलगी पाताळांत असल्याची खबर मिळाल्यावरून तिनें स्वर्गाधिपति ज्यूपिटरची प्रार्थना केली. त्यावरून ज्यूपिटरनें पाताळांत प्लूटोकडे मर्क्युरी ( बुध ) व वसंत ( —ऋतु ) यांना पाठविलें. ते पाताळांत जाऊन पहातात, तों पर्सिफोनीनें तेथें जरी अन्नग्रहण केलें नव्हतें, तरी त्या ठिकाणच्या एका डाळिंबाचे चार दाणे तिनें खाल्ले होते. यामुळें तिची पाताळांतून कायमची सुटका होणें अशक्य झालें, पण अशी तडजोड करण्यांत आली कीं, **तिनें वर्षांतून सहा महिने पृथ्वीवर आपल्या आईजवळ रहावें व बाकीचा वेळ तिनें पाताळांत आपल्या नवऱ्या-बरोबर घालवावा.** या कथेंतील जाड अक्षरांचें वाक्य फार महत्त्वाचें आहे. डिमीटर म्हणजे पृथ्वीदेवता व पर्सिफोनी म्हणजे ' मधुमासश्री ' हें सर्व युरोपीय गाथा-शास्त्रज्ञांनीं मान्य केलें आहे. परंतु ' पर्सिफोनीनें सहा महिने पृथ्वीवर रहावें व बाकीचा काळ पाताळांत काढावा ' असा करार झाल्याचें या कथेंत कां दर्शविलें आहे, त्याचा खुलासा त्यांच्यापैकीं कोणालाहि करतां आलेला नाहीं. आमच्या मतें याचा खुलासा स्पष्ट आहे कीं **या कथेंत ध्रुवप्रदेशाची ऋतुमानाची स्थिति वर्णिली आहे.** तेथेंच हा सहा महिने रात्र व सहा महिने दिवस असा चमत्कार दिसूं शकतो. टिळक म्हणतात त्याप्रमाणें,

' According to the Vernal theory, the sun may be supposed to be below the horizen for any period varying from one to one hundred nights, or even **six months** ( Arctic Home, pg. 306 )

तेथें एक दिवसापासून शंभर दिवसांपर्यंत—फार काय सहा महिनेपर्यंतहि—सूर्य क्षितिजाखालीं राहूं शकेल. केवळ या उपपत्तीनेंच हा चमत्कार उकलतां येण्यासारखा असल्यामुळें, या कथेचें महत्त्व फार आहे व म्हणून आर्यसंस्कृतीच्या मूलस्थानाचा निदर्शक असाच तो निःसंशय पुरावा आहे. हिंवाळ्यांत ' पर्सिफोनी ' ला प्लूटो या पाताळाधिपतीनें चोरून नेलें व मग वसंतऋतु तिला घेऊन आला, याचा अर्थहि हाच आहे. या विषयावरच्या टेनिसन् कवीच्या सुंदर काव्यांत डिमीटर ही स्वतःच्या पर्सिफोनीच्या विरहामुळें झालेल्या स्थितीचें वर्णन करतांना म्हणतेः—

" My quick tea·s killed the flower, my ravings hushed
The bird, and lost in utter grief I failed
To send my life through olive yard and vine,
And golden grain, my gift to helpless man.
**Rain-rotten died the wheet**, the barley spears
Were hollow husked, the leaf failed, **and the sun**
**Pale at my grief drew before his time**
Sicking, and Ætna kept her winter snow.

( अर्थः——माझ्या अश्रूंमुळें सर्व फुलें मरून गेलीं, माझ्या आक्रांतामुळें पक्षी स्तब्ध झाले, दुःखातिशयानें मी निरनिराळ्या फलांत व वनस्पतींत व धान्यांत जीवन-

वाचनः—तव्-मेरु-गिम्-उस्-इझ्-सामस्-उर-इ-की-अस्.

अर्थः—उरिकी येथील सूर्यदेवाची परिचारिका भगिनी मेरु.

रसच घातला नाहीं. **पावसांत गहूं कुजून गेले**, वृक्षांचीं पानें झडलीं, व माझ्या दुःखानें **फिका व विवर्ण झालेला तो सूर्यहि अकालीं पाताळांत गेला व हिंवाळा तसाच कायम राहिला.** )

वरील जाड टाइपांतील शब्द फार महत्त्वाचे आहेत. सूर्य फिका पडला

म्हणजे वैदिक कथेप्रमाणें तो ' शिपिविष्ट ' झाला, पावसाळ्यांत गहूं कुजून गेले तोंच थोड्या दिवसांनीं, म्हणचे अर्थात्‌च वर्षाकाळ संपून शरत्काल सुरू झाल्यावर थोड्या दिवसांनीं ' पर्सिफोनी ' ला प्लुटोनें पाताळांत नेलें, अथवा सूर्य पाताळांत गेला.

वाचनः—सुख-ख-अस्-तत्र्-मिद्-अस्-मतु-कुसू-जिनू-तुम्.

अर्थः-हे मावळणाऱ्या सूर्यदेवा, मृत झालेल्या सूर्य द्रष्ट्या मिदासला पुनरपि सजीव कर ऋग्वेदांतहि उत्तरध्रुवसन्निध सूर्य ' अनारंबणे तमसि ' जाण्याचा काळ हाच वर्णिला आहे. ' चत्वारिंश्यां शरदि अन्वविंदत् । ' म्हणजे शरत्काल सुरूं झाल्यावर चाळिसाव्या दिवशीं इंद्राला वृत्र आढळला व त्या दिवशीं इंद्राचें वृत्राशीं युद्ध सुरूं झालें असें त्यांत वर्णन आहे. ग्रीक कथेंत हाच काळ दाखविला आहे. पावसाळा संपल्यावर धान्य काढून शेतांत ठेवण्याचा काळ सुमारें शरदृतू सुरू झाल्यावर एक महिन्याच्या सुमारासच येतो व त्याच सुमारास सूर्याचें पातालगमन झाल्यानें तें धान्य तेथें तसेंच कुजलें, असा हा स्पष्ट कालदर्शक संदर्भ वैदिक कथेशीं जुळता येत आहे. याच काळाच्या सुमारास तो सूर्य अकालीं पाताळांत गेला व हिंवाळा तसाच कायम राहिला, हीं सर्व ध्रुवस्थलीन चमत्काराचीं चिन्हें आहेत. पुढें ' पर्सिफोनी ' सांपडल्याबरोबर तिची आई म्हणतेः—

' Persephone, Queen of the dead no more,
My child thine eyes were again human-God-like
**And the sun burst from a swimming fleece of winter gray,**
**And robed thee in his day from head to foot.** '

( अर्थः-पर्सिफोनी, तूं आतां पाताळाच्या राजाच्या कचाट्यांतून सुटल्यामुळें तुझे डोळे कर्मदेवाप्रमाणें दिसूं लागले आहेत व सूर्यहि, हिंवाळ्यांत त्यानें परिधान केलेलें उर्णावस्त्र फेंकून देऊन, विभ्राजमान होऊन आपल्या त्या प्रकाशानें तुला आपादमस्तक प्रक्षाळीत आहे. )

स्कँडिनेव्हिअन् वाङ्मयांतील ' डायरमिड् ' ची कथाहि याचप्रमाणें आहे. डायरमिड् हा प्रकाशाचा देव असून तो फार सुंदर होता. त्याचा आवाज कोमल असून नेत्र तेजस्वी होते ('God of tender voice and shining eyes.'). त्याला एका हिरव्या डुकरानें ठार मारलें. त्या डुकराचें वर्णन,

That Venomous boar and he so fierce,
That gray Eyebrows had with her herd of swine.

( तो भयंकर व विषारी रानडुक्कर असून त्याच्या भिवया करड्या रंगाच्या होत्या व त्याच्याबरोबर इतर डुकरांचा एक मोठा कळप होता. )

त्यानें डायरमिडला मारल्याबरोबर फिन्नें शोक केला:--

No maiden will raise her eye
Since the mould has gone over thy visage fair,
Blue without rashness in thine eye,
Passion and beauty behind thy curls.
**Oh yesterday it was green, the hillock,**
Red is it this day with Diarmid's blood,

( हे डायरमिड् तुझी रम्य मुखश्री म्लान झाल्यापासून कोणीहि कुमारी आपली दृष्टि ( सुंदर मुख अवलोकन करण्याच्या इच्छेनें ) वर करणार नाहीं. तुझ्या त्या सौम्य नेत्रांत नीलिमा भरलेला होता व तुझ्या कुरळ्या केसांत प्रेम व सौंदर्य भरलेलें होतें. अरे, कालपर्यंत या टेकड्या हिरव्या गार होत्या ना ! त्या आतां तुझ्या रक्तानें पहा कशा लाल झाल्या त्या ! ) याच कथेंत पुढें हा डायरमिड् वसंतारंभीं जिवंत झाल्याचें वर्णिलें आहे. म्हणजे जशी तम्मूझची कथा व पर्सिफोनीची कथा या वैदिक कथेच्याच अनुवाद आहेत, त्याचप्रमाणें ही कथाहि वैदिक कथेचाच पर्याय आहे, हें स्पष्ट होत आहे. या सर्व कथांचा अर्थ पाश्चात्यांनीं केवळ ऋतूंच्या बदलाच्या खुलाशानें केला आहे, परंतु वस्तुतः या सर्व कथांतून ध्रुवाजवळचीच परिस्थिति वर्णित होत असल्यानें हिंदी-सुमेरी आर्यसंस्कृतीचें आद्यस्थान ध्रुवसंन्निधदेश हेंच होय, हें सिद्ध होतें.

याप्रमाणें स्थलनिर्णय करतांनाच कालनिर्णयाचें बहुतेक विवेचन येऊन गेलें आहे. तथापि स्पष्टतेनें तें थोडक्यांत आपण देऊं.

प्रथम अविनाशचंद्र दास यांच्या मतें हा काल खि. पू. २५००० वर्षें होय. या संबंधानें ते म्हणतातः—

" In the light of the opinions of some Modern geologists, I have consistently brought down the age of a different distribution of land and water, and hence of the real beginings of the Rig-Vedic culture itself, to about 20000/25000 B. C.;a date which following the method adopted by Prof. Flinders Petrie in calcu'ating earliest age of Egyptian culture, can be reached back, approximately by assigning 1500 years to the duration of each of the ten different epochs of Vedic culture, that I have pointed out in this book.

( अलीकडील भूगर्भशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें हिंदुस्थानांतील जमीन व पाणी

यांच्या हयांहून भिन्न रीतीनें असलेल्या वाटणीचा काल मी शक्य तितका कमी केला आहे. इजिप्तच्या आद्यकालाचा निर्णय करितांना प्रो. फ्लिंडर्स पेट्रिक यांनीं अंगिकारलेल्या पद्धतीप्रमाणें, ऋग्वेदांत प्रतीत होणाऱ्या दहा भिन्न अवस्थांपैकीं दरेकीला १५०० वर्षांचा काल देऊन मी ऋग्वेदाचा आद्यकाल २५००० वर्षांपूर्वीचा निश्चित केला आहे. )

ही प्रो. दास यांची सर्वच विचारपरंपरा अध्रुव अशा अनुमानांवर उभारलेली असल्यामुळें,

' यो ध्रुवांहि परित्यज्य अध्रुवं परिषेवते ।
ध्रुवं तस्य विनष्टं च अध्रुवं नष्टमेवच ॥

अशी त्यांची स्थिति होऊन, त्यांच्या हातचें आर्यांच्या आद्यसंस्कृतीचें मूलस्थान जें ( उत्त'--) ध्रुव तेंहि नष्ट झालें आहे !

प्रो. दासांच्या नंतर रा. पावगींचा पक्ष. ते हिमप्रलयपूर्व ऋग्वेदकालीन आर्यसंस्कृति हिंदुस्थानांतलीच म्हणतात. हिमप्रलय ख्रि. पू. ८००० च्या सुमारास झाला तेव्हां त्या पूर्वी या संस्कृतीचा त्यांच्या मतें उगम असला पाहिजे. पण तो किती व कां, यांचें विवेचन करण्याच्या भानगडींत ते फारसे पडलेच नाहींत ! त्यांच्या मताबद्दल डॉ. केतकर यांच्या ज्ञानकोशांत ' बुद्धपूर्व जगत् ' या भागांत म्हटलें आहे:-- " ...पावगी यांच्या विचारांचें विधान हेंच त्याचें खंडण होय. मनुष्य जातीची किंवा चैतन्याची उत्पत्ति हिंदुस्थानांत झाली, हें दाखविण्यासाठीं कोणत्या प्रकारचा पुरावा दिला पाहिजे याची या सात्त्विक ब्राह्मणाला कल्पनाहि नसावी असें दिसतें ! आप्तवाक्यानें पृथ्वी सपाट आहे असें सिद्ध करूं पाहणाऱ्या प्राचीन व अर्वाचीन कोशाप्रमाणें मनोरंजक म्हणून पावगी यांचें ' आर्यावर्तिक होम ऍण्ड आर्टिक कॉलनीज् ' हें पुस्तक वाचण्यास हरकत नाहीं. " हा डॉ० केतकर यांचा विनोद बाजूला ठेवला, तरी या उताऱ्याचाच पुढचा भाग पावगींच्या खंडनार्थ समर्पक आहे. या भागांत डॉ० केतकर म्हणतात:--" उत्तरध्रुवाजवळ जाऊन वसाहत करण्याचा हेतु आणि परत येण्याचीं कारणें यांवर पावगी कांहींच सांगत नाहींत. वसाहत करण्यास जाऊन राहिल्यानंतर परत येईपर्यंत त्यांनीं आपली भाषा व संस्कृति बदलली नसेल काय या विषयीं पावगींनीं विचार केला नाहीं. "

यानंतर वेदकालविषयक पाश्चात्य विचारसरणीचा नमुना म्हणून प्रो. मॅक्डोनेल् यांच्या संस्कृत वाङ्मयावरील ग्रंथाचा उतारा दिला म्हणजे पुरे. ते म्हणतातः--

2000 B. C. is commonly represented as the starting point. Supposing this to be correct, the truly vast period of 1500 years is required to account for a development of language and thought hardly greater than, that between the Homeric and the Attic age of Greece. Maxmullers earlier estimate of 1200 B. C., formed forty

years ago, appears to be much nearer the mark. A lapse of three centuries, say from 1300-1000 B. C. would amply account for the difference between what is oldest and newest in Vedic hymn poetry ......It is impossible to believe that the Indian branch must have seperated from the Iranian only a short time before the beginings of Vedic literature, and can therefore have hardly entered the North-west of India even as early as 1500 B. C.

( **अर्थः**—साधारणतः ख्रि. पू. २००० वर्षे हा वैदिक संस्कृतीचा आद्यकाल समजला जातो. तो जर खरा मानला तर, तेथून बुद्धकालापर्यंतचा १५०० वर्षांचा **अजस्र** काल, ग्रीसमधील होमेरिअन् व अँटिक यांमधील संस्कृतीइतक्या बदलाला द्यावा लागेल! तेव्हां हा समज खरा नसून मॅक्सम्युलरनें केलेला अंदाजच खरा आहे. त्याच्यामतें वैदिक संस्कृतीचा आद्यकाल ख्रि. पू. १२०० वर्षे हा होय. हा अवधि वेदांतलि अत्यंत प्राचीन व अत्यंत अर्वाचीन भागांतलि फरक होण्यास पुरा आहे. वैदिक संस्कृतीच्या पूर्वी थोडाच काळ हिंदी शाखा इराणी शाखेपासून विभक्त झाली असेल, हें मानणें अशक्य आहे, व म्हणून या हिंदी शाखेचा हिंदुस्थानांतील प्रवेश ख्रि. पू. १५०० पूर्वी होणेंहि अशक्य आहे. )

या उताऱ्यावरून युरोपीय लोकांनीं केवळ अनुमानधक्क्यावरून कालनिर्णय कसा केला आहे हें दिसून येईल. यांत गणितात्मक प्रमाणांचा, ज्योतिर्विषयक उल्लेखांचा, तुलनात्मक दंतकथांचा वगैरे विचारहि केला नाहीं. त्यामुळें त्यांचा निर्णय मुळींच स्वीकारण्यासारखा नाहीं. व विशेषतः सुमेरी वाङ्मयाच्या अध्ययनानें या लेखमालेंत दर्शविलेल्या साम्यामुळें तर तो अगदींच त्याज्य होतो. हें सुमेरी वाङ्मयाचें पुष्टिदर्शक प्रमाण उपलब्ध नसतांनाहि ज्या लो. टिळकांनीं केवळ आपल्या बुद्धिप्रभावानें वैदिक संस्कृतीच्या उद्गमांचा आद्य काल व स्थल ठरविलें, त्यांचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे!

येणेंप्रमाणें जलप्रलयापूर्वीं हिंदी-सुमेरी आर्य शाखेचें वसतिस्थान ध्रुवसान्निध-प्रदेश होता हें निश्चित झालें. पुढें प्रलयानंतर तेथून वस्ति हलली व दक्षिणेकडे उतरली. त्यांपैकीं एक शाखा सुमेरीयांत गेली व दुसरी प्रथम कदाचित् हिंदुस्थानच्या माथ्यावरील पामीर पठारावर राहून नंतर वायव्य सरहद्दीवरून हिंदुस्थानांतील पंचनद-प्रांतांत आली. हें परिभ्रमण होण्यास शेंकडों वर्षें लागल्यानें उत्तरध्रुवस्थ परंपरा सुमेरियांतील व हिंदुस्थानांतील वंशजांना फार प्राचीन वाटूं लागली होती. कारण ऋग्वेदांतच कित्येक जुन्या आचारांना ' तानि धर्माणि प्रथमान्यसन् ॥ ' ( हे आचार-धर्म प्राचीन काळीं प्रचारांत होते ) असें म्हटलें आहे, व म्हणून कै. महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं म्हटल्याप्रमाणें:—

" The same myths were understood at different periods of History in different ways, until at last the myths ceased to be originated and to grow up and the mythology became stereotyped. "

प्राचीन आख्यायिकांचा निरनिराळ्या काळीं निरनिराळा अर्थ करण्यांत येऊं

लागतां, अखेर त्या वज्रलेप झाल्या व मग त्यांच्यांत नवीन भर पडेनाशी झाली. अशा या वज्रलेप झालेल्या आख्यायिकांचा खरा अर्थ तत्कालीन परिस्थितीच्या सत्य ज्ञानानेंच समजण्यासारखा असतो व म्हणून हिंदी व सुमेरी लोकांत प्रचलित असलेल्या आख्यायिकांचा अर्थ लावून वर म्हटल्याप्रमाणें त्यांच्या कालस्थलाचा निर्णय करतां आला आहे.

या एकवंशीयत्वामुळेंच या मालेंतील लेखांकांत वर्णिल्याप्रमाणें या उभय समाजांत आख्यायिका, आचारविचार, देवता, धार्मिक समजुती, शास्त्रीयज्ञान-फलित व गणित असें उभय प्रकारचें ज्योतिष, कलाज्ञान, वेशपद्धति, इत्यादि अनेक प्रकारचें ऐकांतिक सांस्कृतिक साम्य प्रतीत होतें. या एकंदर अध्ययनानें गतकालाच्या इतिहासज्ञानाचें क्षितिज किती तरी दूर गेलें आहे!

असो. प्रथमतः एका लेखांकाच्या मर्यादेचें मानसिक नियंत्रण घातलेलें विवेचन इतकें लांबलें पण त्यामुळेंच या विषयाचा सर्वांगांनीं विचार करतां आला. तो करण्यांत मनास एक प्रकारचा आनंद वाटतो. म्हणून अशाच अर्थाचे उद्गार मि. वॅडेल् यांनीं काढले आहेत ते देऊन या विषयाचा आपण समारोप करूं. वॅडेल् म्हणतातः—

There is after all a real, if not very often attained pleasure in helping on the progress of the world, without hope of added reward in promoting by researches into what has been happening in the past—the longdrawn effort of our race towards a higher level of health and happiness......For in all true progress .........

The message for the Future
Is the message of the past.

आपल्या वंशाच्या प्राचीन पूर्वजांनीं 'आयुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थ' जे दीर्घ प्रयत्न केले त्यांचें संशोधन कोणत्याहि लाभाची अपेक्षा न ठेवतां करण्यानें सांप्रत-कालींच्या जागतिक प्रगतीला आपण मदत करीत असल्यानें, अशा संशोधनानें एक प्रकारचा सात्त्विक आनंद होतो. कारण खऱ्या प्रगतीच्या दृष्टीनें पाहिलें असतां, **भूतकालाचें सत्यज्ञान हाच भविष्यकाळचा संदेश होय.**

( समाप्त )

चुनखडीच्या दगडाचा ( Limestone ) बनविलेला आहे. रुंदीपेक्षा लांबी अधिक असलेला शीर्षभाग, लंबगोल चेहरा, उंच व सरळ कपाळ, भिवयांच्यामधील जागेपासून कपाळाच्या जवळजवळ सपाटीपासून निघालेलें नासामूल, सरळ, बारीक व धार असलेकें नाक, मध्यम आकाराचे माशाप्रमाणें कानाच्या बाजूला निमुळते होत, गेलेले डोळे, कमानदार भिंवया, लहान जेवतें, पातळ अधरोष्ठ, गालाचीं हाडें ( Cheek-bones ) पुढें न आलेलीं, मध्यमाकृति कान, अशा प्रकारचें या पुतळ्याचें अवयवावस्थान आहे. हा पुतळा लगश येथें सांपडला आहे. मूळ शरीरापासून मस्तक फुटून निराळें झालें आहे, व तें हल्लीं बर्लिन येथील म्यूझिअममध्यें ठेवलेलें आहे.

यानंतर लगश येथेंच सांपडलेला दुसरा एक पुतळा या खालीं चित्ररूपानें दिला आहे. त्याचें हें चित्र वॉल्काझिन्स् या चित्रकारानें काढलेलें आहे. वरील पुतळ्याच्या वर्णनांत दिलेलें सर्व वर्णन याहि पुतळ्याला तंतोतंत लागूं पडतें. हा पाहून तर, तो अगदीं दोन चार दिवसापूर्वीं काढलेल्या एखाद्या युरोपिअन अथवा उच्चवर्णीय हिंदूंचा नसेल असें कोण म्हणूं शकेल ?

**सात हजार वर्षांपूर्वींचा सुमेरिअन पुरुष.**

( यांतील लंबशीर्ष, लांब व बारीक नाक, उंच कपाळ, लांबट चेहरा हीं सर्व त्याचा आर्यवंश दर्शवितात. )

यांत केसांचा भाग वरील चित्रापेक्षां अधिक स्पष्टतेनें दिसत आहे, व त्यावरून त्याचे केश, मृदु, व ‘ जललहरीवत् ’ अथवा नागमोडी ( wavy ) असे दिसत आहेत. हनुवटी उत्तरोष्ठाच्या पातळींत आलेली, गोल व घोटलेली; भरदार असल तरी हनुवटीपासून निमुळता होत आलेला शंखाकृति गळा, हे अवयवहि या चित्रांत अगदीं स्पष्ट दिसत आहेत.

सुदैवानें या दोन पुरुषाकृतीप्रमाणें एका सुमेरी स्त्रीचाहि पुतळा सांपडला आहे.

हा पुतळा ‘ टेलो ’ या गांवीं उत्खननांत सांपडलेला आहे. वंशविचाराच्या दृष्टीनें, त्याचप्रमाणें तत्कालीन वेशभूषादृष्टीनेंहि हा पुतळा वरील दोनहि पुतळ्यांपेक्षां मनोरंजक आहे. या पुतळ्याची चेहरेपट्टी व अवयव हे सर्व वरील दोन्ही पुतळ्यांशीं बरोबर मिळते आहेत. गळ्यांत मोत्याच्यासारखा चार पांच पदरी दागिना घातलेला